॥ श्री ॥

# सार्थ उपनिषत्संग्रह.

भाग चवथा.

संपादक

हरि रघुनाथ भागवत, बी. ए.

आवृत्ति पहिली.

शके १८४४ सन १९२२.

अष्टेकर कंपनी, पुणें.

किंमत दोन रुपये.

Printed by Mr. A. S. GOKHALE at his "VIJAYA PRESS"
570 Shaniwar Peth, Poona City,

AND

Published by Mr. H. R. BHAGAVAT, at 620 Sadashiva Peth,
Poona City, for THE ASHTEKAR COMPANY.

# अर्पणपत्रिका.



या भागांतील उपनिषदें मीं वाचलीं तेव्हां मला तुझें सान्निध्य होतें. या कारणानें यांचें भाषांतर लिहितांना व तपासतांना तुझी आठवण वारंवार झाली. ह्मणून हें पुस्तक तुझ्या स्मृतीला अर्पण करण्याचा मोह मला आवरतां आला नाहीं.

ह. र. भागवत.

# प्रस्तावना.

सार्थ उपनिषत्संग्रह—भाग पहिला या नांवाचें पुस्तक मीं १९१३ सालीं लिहून १९१४ सालीं छापवून प्रकाशित केलें. त्यामध्यें ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य आणि बृहदारण्यक या दहा प्रमुख उपनिषदांचें मराठी भाषांतर मूळासुद्धां दिलें होतें. त्याची दुसरी आवृत्ति १९१६ सालीं निघाली, व तीहि आजमित्तीस खलास आहे. सार्थ उपनिषत्संग्रहाचे पुढील भाग काढण्याची तेव्हांपासून इच्छा होती. परंतु मनुष्याच्या इच्छेप्रमाणें या जगांत सर्वच गोष्टी वेळच्या वेळीं घडून येत नाहींत. अनेक कारणांमुळें दुसरा भाग लिहिण्याचें काम लांबलें. हें काम यंदां ईश्वरी इच्छेनें पुरें होऊन छापील प्रती वाचकांच्या हातांत पडत आहेत. या पुस्तकास सार्थ उपनिषत्संग्रहाचा दुसरा भाग न म्हणतां चवथा भाग म्हटलें आहे. याचें कारण असें कीं, आतां पहिल्या दहा उपनिषदांची नवी आवृत्ति छापतेवेळीं पहिल्या सात किंवा आठ लहान उपनिषदांचा एक भाग, छांदोग्याचा दुसरा आणि बृहदारण्यकाचा तिसरा याप्रमाणें तीन भागांत तीं उपनिषदें—भाषांतराला स्पष्टीकरणार्थ टीपांची जोड देऊन—विभागण्याचा विचार मीं केला आहे. अर्थातच प्रस्तुत पुस्तकाला चवथा भाग म्हणणें ओघानें प्राप्त झालें.

या पुस्तकांत कैवल्य, कौषीतकि, जाबाल, मैत्रायणीय आणि

श्वेताश्वतर या पांच उपनिषदांचें टीपांसुद्धां भाषांतर दिलें आहे. पहिल्या दहा उपनिषदांचें भाषांतर बाईनें झालें होतें. तशी घाई या भाषांतराचे वेळीं झालेली नाहीं. भाषांतर साधारणतः काळजीपूर्वक केलें, आणि विशेष माहितीकरितां मधून मधून टीपाहि जोडल्या. ठळक टाइपांत मंत्र, त्यानंतर साध्या पण मोठ्या टाईपांत भाषांतर आणि त्याखालीं बारीक टाईपांत टीपा अशी व्यवस्था ठेवली आहे. प्रत्येक उपनिषदाचे आरंभीं त्या उपनिषदाबद्दल उपोद्घातादाखल दोन शब्द लिहिले आहेत. ही सर्व व्यवस्था वाचकांस पसंत पडेल अशी माझी समजूत आहे.

या भागांत हींच उपनिषदें कां घेतलीं तें आतां सांगतों. मुख्य दहा उपनिषदांवर श्रीशंकराचार्यांनीं भाष्य लिहिलें; यामुळें त्यांचें भाषांतर मीं प्रथम केलें. या दहा उपनिषदांच्या बरोबरीनें कौषीतकि आणि श्वेताश्वतर यांची योग्यता मानली जाते. दोहोंचेहि आधार श्रीशंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रभाष्यामध्यें घेतलेले आहेत. अर्थात् या दोन उपनिषदांचा समावेश या भागांत करणें सयुक्तिक वाटलें. मैत्रायणीय उपनिषत् जरी श्रीशंकराचार्यांनं आधाराला घेतलेलें दिसत नाहीं तरी महत्त्वाच्या, विषयप्रतिपादनाच्या व कालाच्या दृष्टीनें त्याला तेरावा नंबर देणें योग्य दिसल्यामुळें त्याचाहि समावेश केला. जाबालोपनिषत् लहान असलें तरी श्रीशंकराचार्यांनीं तें आधाराला घेतलें असल्याकारणानें तेंहि या भागांत घेतलें. नारायण हें एक मोठें उपनिषत् पुढल्या भागाकरितां ठेवून लहान उपनिषदांपैकीं कैवल्य अधिक पसंत पडल्यानें तें येथें घेऊन एकंदर पांच उपनिषदें पुरीं केलीं. उप-

निषदें याप्रमाणें घेण्याचें ठरल्यानंतर त्यांचा क्रम केवळ वर्णानुक्रमानेंच धरला. त्यांत दुसरा हेतु कांहीं नाहीं.

कैवल्योपनिषदावर नारायणस्वामी आणि शंकरानंदस्वामी यांनीं टीका केलेल्या आहेत. मद्रासचे प्रो. ए. महादेवशास्त्री यांनीं याचें एक सटीप इंग्रजी भाषांतर केलेलें आहे. कौषीतकि उपनिषदावर शंकरानंदांची टीका आहे. जाबालोपनिषदावर नारायण आणि शंकरानंद या दोघांच्याहि टीका आहेत. मैत्रायणीयोपनिषदावर रामतीर्थाची टीका आहे. वरील सर्व टीका पुण्याच्या आनंदाश्रमानें छापलेल्या ३२ उपनिषदांच्या पुस्तकांत असून, भाषांतर करते वेळीं त्यांचें मीं साहाय्य घेतलें. श्वेताश्वतरावर श्रीशंकराचार्यांचें म्हणून एक भाष्य आनंदाश्रमांत छापलेलें आहे, पण तें श्रीशंकराचार्यांचें नव्हे अशी माझी खात्री झाल्यामुळें त्याचा भाषांतराचे कामीं उपयोग केलेला नाहीं. इंग्रजीमध्यें तेरा प्रमुख उपनिषदांचें भाषांतर मि. ह्यूम नांवाच्या गृहस्थांनीं केलेलें अलीकडे प्रकाशित झालें असून त्याचें मीं साहाय्य घेतलें. हें इंग्रजी भाषांतर बरेंच काळजीपूर्वक केलेलें आहे असें येथें नमूद करणें मला योग्य दिसतें. याशिवाय कलकत्याच बंगाली पंडित सीतानाथ तत्त्वभूषण आणि इंग्रज पंडित प्रो. कॉवेल या दोघांचींहि कौषीतकि व श्वेताश्वतर या उपनिषदांवरील (दोघांनींहि स्वतंत्रपणें केलेलीं) इंग्रजी भाषांतरें, कै. शंकर मोरो रानडे यांचें कौषीतकि उपनिषदाचें मराठी भाषांतर आणि कै. प्रो. रा. रा. भागवत यांचें श्वेताश्वतराचें मराठी भाषांतर हींहि मधून मधून पाहिलीं. या सर्व टीकाकारांचा व भाषांतरकारांचा अर्थातच मी आभारी आहें. परंतु

यांतल्या कोणत्याहि एका भाषांतरावर किंवा टीकेवर मी सर्वस्वीं अव-लंबून राहिलों नाहीं. जसें भाषांतर योग्य वाटलें तसें केलें, एवढें येथें सुचविणें जरूर आहे. कौषीतकि उपनिषदांत पाठभेद आहेत; त्यांपैकीं जो पाठ जेथें योग्य दिसला तो स्वीकारला. इतर उपनिषदांत म्हण-ण्यासारखे पाठभेद आढळले नाहींत.

यापुढें आणखी कांहीं उपनिषदें या पुस्तकाच्या पद्धतीनें भाषांतर करून छापण्याची आणि पहिल्या दहा उपनिषदांची नवी आवृत्ति याच पद्धतीनें तीन भागांत छापण्याची, इच्छा आहे. परंतु अशा प्रकारचीं पुस्तकें लिहून छापण्याचें व विकण्याचें आधींच कठिण असलेलें काम हल्लीं अधिक कठिण झालें असल्यानें, या भागाला जर लोकाश्रय नीट मिळेल, तरच वरील उद्योग उमेदीनें हातीं घेतां येतील.

आतां हें पुस्तक छापून देण्याचें कार्य ज्यांनीं केलें त्यांचे येथें आभार मानणें माझें कर्तव्य आहे. येथील 'विजय' छापखान्याचे मालक रा. अनंत सखाराम गोखले यांचेजवळ मीं हें पुस्तक छापण्या-संबंधीं गोष्ट काढतांच त्यांनीं आनंदपूर्वक व आपलेपणानें काम हातीं घेऊन तें अत्यंत अल्प अवधींत सुबक रीतीनें छापून दिलें. इतक्या अल्प अवधींत आणि अशा प्रकारें पुण्यांतल्या इतर कोण-त्याहि छापखान्याकडून हें काम झालें नसतें. या सौजन्याबद्दल रा. गोखले यांचा मी ऋणी आहें.

असो. यापुढेंहि उपनिषदांचें व इतर वेदान्तपर पुस्तकांचें लेखन व प्रकाशन करण्याचा योग ईश्वरानें लवकर आणावा अशी त्याला प्रार्थना करून आणि

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
संपश्यन्ब्रह्म परमं याति नान्येन हेतुना ॥

या कैवल्योपनिषदांतील [१.१०] मंत्राचें नित्य मनन करण्याची वाचकांस विनंती करून ही अल्प प्रस्तावना पुरी करतों.

पुणें.
६ जून १९२२.

हरि रघुनाथ भागवत.

# अनुक्रमाणिका.



# सार्थ उपनिषत्संग्रह.

## भाग चवथा.

### कैवल्योपनिषत्.

हें लहानसें उपनिषत् अथर्ववेदापैकीं आहे. लहान असलें तरी गहन तत्त्व-विचारांनीं परिपूर्ण असल्यामुळें गौण उपनिषदांपैकीं महत्वाच्या उपनिषदांत याची गणना होते. कैवल्य म्हणजे मोक्ष = जन्ममृत्यूपासून मुक्तता=ब्रह्मप्राप्ति.

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः॥

अथ प्रथमः खंडः ॥

अथाऽऽश्वलायनो भगवन्तं परमेष्ठिनमुपसमेत्योवाच–
अधीहि भगवन्ब्रह्मविद्यां वरिष्ठां
सदा सद्भिः सेव्यमानां निगूढाम् ॥
यथाऽचिरात्सर्वपापं व्यपोह्य
परात्परं पुरुषं याति विद्वान् ॥१॥

**भाषांतर**—त्यानंतर आश्वलायन ऋषि भगवान् ब्रह्मदेवाकडे जाऊन म्हणाला–हे भगवन्, साधुजन जिचा सदा आश्रय करतात, जिला जाणल्याबरोबर जाणणारा सर्व पापापासून मुक्त होऊन परात्पर पुरुषाप्रत म्हणजे ब्रह्माप्रत प्राप्त होतो, जी गूढ आहे व सर्व विद्यांमध्यें श्रेष्ठ आहे, अशी ब्रह्मविद्या मला शिकवा.

**टीपा**–अथ=साधनचतुष्टयानें युक्त झाल्यानंतर. नित्यानित्यवस्तुविवेक, इहामुत्रार्थभोगविराग, शमदमादिसाधनसंपत् आणि मुमुक्षुत्व हें साधनचतुष्टय होय. परात्परं= पर ह्मणजे प्रकृति आणि परात्पर ह्मणजे प्रकृतीहून श्रेष्ठ, पुरुष, अर्थात् ब्रह्म.

तस्मै स होवाच पितामहश्च
श्रद्धाभक्तिध्यानयोगादवेहि ॥
न कर्मणा न प्रजया धनेन
त्यागेनैके अमृतत्वमानशुः ॥२॥

त्याला पितामह ब्रह्मदेव म्हणाला– श्रद्धा, भक्ति आणि ध्यान या साधनांनीं ती ब्रह्मविद्या तूं शीक. संन्यासानें कित्येकांना अमृतत्वाची प्राप्ति झाली, कर्मांनीं झाली नाहीं, संततीनें झाली नाहीं, किंवा धनानेंहि झाली नाहीं.

श्रद्धा, भक्ति व ध्यान हीं ब्रह्मविद्या शिकण्याचीं साधनें ह्मणून येथें सांगितलीं आहेत, ब्रह्मप्राप्तीचीं साधनें ह्मणून नव्हेत, ब्रह्मप्राप्तीला संन्यासच अवश्य सांगितला आहे. फलेच्छायुक्त श्रौतस्मार्त कर्मे इष्ट फल देतील, संततीपासून व तिच्या पुण्यकर्मांपासून कांहीं काल स्वर्गवास मिळेल, आणि द्रव्यदानादिकांनीं पुण्यप्राप्ति होईल. परंतु हीं कांहीं ब्रह्मप्राप्तीचीं साधनें नव्हेत.

परेण नाकं निहितं गुहायां
विभ्राजते यद्यतयो विशन्ति ॥
वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः
संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ॥
ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले
परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥३॥

यति म्हणजे संन्यासी लोकांना जें प्राप्त होतें तें स्वर्गाहून श्रेष्ठ असें ब्रह्म बुद्धीच्या ठिकाणीं स्थित आहे. संन्यासानें ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे, आणि वेदान्तज्ञानानें ज्यांनीं (प्राप्तव्य) अर्थ

ब्रह्म सुनिश्चित केला आहे (म्हणजे ज्यांना ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे), ते याच जन्मीं ब्रह्मरूप होत्साते मरणसमयीं ब्रह्मामध्यें मुक्त होतात.

या सहा चरणांच्या श्लोकापैकीं अखेरचे चार चरण मुंडकोपनिषदांत [३. २.६] आलेले आहेत. कैवल्योपनिषदाच्या छापील प्रतींमध्यें व शंकरानंदांच्या टीकेंत 'परामृताः' याऐवजीं 'परामृतात्' असा पाठ आहे व शंकरानंदांनीं अर्थहि शंकराचार्यांच्या अर्थाहून वेगळा केला आहे. मुंडकोपनिषदांतील श्लोकांच्या शंकराचार्यांच्या अर्थाला अनुसरून मीं येथें अर्थ दिला आहे. शंकरानंदांनीं यतींचे दोन वर्ग केले असून ब्रह्मसाक्षात्कार न झालेले यति ब्रह्मलोकांत राहून प्रलयकालीं मुक्त होतात असा अर्थ केला आहे.

विविक्तदेशे च सुखासनस्थः
शुचिः समग्रीवशिरःशरीरः ॥४॥
अत्याश्रमस्थः सकलेंद्रियाणि
निरुध्य भक्त्या स्वगुरुं प्रणम्य ॥
हृत्पुंडरीकं विरजं विशुद्धं
विचिंत्य मध्ये विशदं विशोकम् ॥५॥
अचिंत्यमव्यक्तमनंतरूपं
शिवं प्रशान्तममृतं ब्रह्मयोनिम् ॥
तथादिमध्यांतविहीनमेकं
विभुं चिदानंदमरूपमद्भुतम् ॥६॥
उमासहायं परमेश्वरं प्रभुं
त्रिलोचनं नीलकंठं प्रशान्तम् ॥
ध्यात्वा मुनिर्गच्छति भूतयोनिं
समस्तसाक्षिं तमसः परस्तात् ॥७॥

एकान्तस्थलीं, सुखासनस्थ, अंतर्बाह्य शुद्ध, मान—मस्तक—व शरीर समान म्ह० एका रेषेंत करून, परमहंस संन्यासाची दीक्षा घेतलेला, सर्व इंद्रियांचा निरोध केलेला असा होत्सात्या मुनीनें आपल्या गुरूला

भक्तिपूर्वक वंदन करून आपल्या हृदयकमलाचे ठिकाणीं ब्रह्माचें ध्यान करावें. तें असें— कलंकरहित, शुद्ध, स्वच्छ, आनंदपूर्ण, अचिंत्य, अव्यक्त, अनंतरूप, कल्याणरूप, शान्त, मरणरहित, ब्रह्मदेवाचा जनक, आदि–मध्य–अंत–रहित, एक, सर्वव्यापी, चैतन्यरूप, आनंदरूप, रूपरहित, अद्भुत, उमा म्ह० प्रकृति ज्याला साहाय्य करते, परमेश्वर, प्रभु, त्रिलोचन, नीलकंठ, शान्तचित्त, भूतमात्राचें कारण, सर्वांचा साक्षी व अविद्येच्या पलीकडे असलेला,— अशा स्वरूपांत ध्यान केलें असतां ध्याता त्याप्रत प्राप्त होतो.

उमा=ब्रह्मविद्या. त्रिलोचन=सूर्य, चंद्र व अग्नि हे तीन ज्याचे नेत्र आहेत असा, नीलकंठ=तम अथवा अविद्या गिळल्यानें कंठ काळा झालेला. शिव, उमासहाय आणि नीलकंठ या शब्दांचा निर्गुण–ब्रह्मपर अर्थ जरी लावतां येतो, तरी शंकर-स्वरूपांत सगुण ब्रह्मच येथें विवक्षित आहे असेंहि म्हणतां येतें.

स ब्रह्मा स शिवः सेंद्रः सोऽक्षरः परमः स्वराट् ॥
स एव विष्णुः स प्राणः स कालोऽग्निः स चंद्रमाः ॥८॥

हें ब्रह्मच ब्रह्मदेव, शिव व इंद्र होय. हेंच अविनाशी, परमेश्वर, स्वयंप्रकाश होय. हेंच विष्णु, प्राण, काल, अग्नि आणि चंद्र होय.

स एव सर्वं यद्भूतं यच्च भव्यं सनातनम् ॥
ज्ञात्वा तं मृत्युमत्येति नान्यः पंथा विमुक्तये ॥९॥

जें कांहीं झालेलें आहे व जें कांहीं होणारें आहे तें सर्व ब्रह्मच होय. ब्रह्मच सनातन आहे. ब्रह्माचें ज्ञान झालें असतां ज्ञाता मृत्यूच्या पलीकडे जातो. मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं.

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥
संपश्यन्ब्रह्म परमं याति नान्येन हेतुना ॥१०॥

आत्मा सर्व भूतांचे ठिकाणीं आहे व सर्व भूतें आत्म्याचे ठिकाणीं

आहेत असें पहाणारा परम ब्रह्म पावतो; दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें नाहीं.

आत्मानमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ॥
ज्ञाननिर्मथनाभ्यासात्पाशं दहति पंडितः ॥११॥

आत्मा ही खालची अरणि व ॐकार ही वरची अरणि करून ज्ञानरूपी सतत घर्षणानें शहाणा मनुष्य अविद्यारूपी पाश दहन करतो.

घर्षणानें अग्नि उत्पन्न करण्याकरितां जीं काष्ठें घेतात त्यांना अरणि म्हणतात. आत्मा=जीव, आणि ॐकार=ब्रह्म. जीवब्रह्मैक्यज्ञानाच्या सतत घर्षणानें अविद्येचा नाश होतो.

स एव मायापरिमोहितात्मा
शरीरमास्थाय करोति सर्वम् ॥
स्त्रियन्नपानादिविचित्रभोगैः
स एव जाग्रत्परितृप्तिमेति ॥१२॥

तोच आत्मा मायेनें मोहित होत्साता शरीराशीं एकरूप होऊन सर्व व्यवहार करतो. जागृतीमध्यें तोच स्त्री, अन्न, पान इत्यादि अनेक प्रकारच्या तृप्ति अथवा अतृप्ति पावतो.

स्वप्ने स जीवः सुखदुःखभोक्ता
स्वमायया कल्पितजीवलोके ॥
सुषुप्तिकाले सकले विलीने
तमोऽभिभूतः सुखरूपमेति ॥
पुनश्च जन्मांतरकर्मयोगा-
त्स एव जीवः स्वपिति प्रबुद्धः ॥१३॥

तोच जीव स्वप्नकालीं आपल्या मायेनें कल्पनेनें उत्पन्न केलेल्या लोकांत सुखदुःख भोगतो. सुषुप्तिकालीं सर्व वस्तूंचा लय झाला

असतां जीव एकरूप होतो, (पण) तमानें आच्छादित असतो. तोच जीव पूर्वजन्मींच्या कर्मानुरोधानें पुनः स्वप्न अथवा जागृति पावतो.

पुरत्रये क्रीडति यश्च जीव-
स्ततस्तु जातं सकलं विचित्रम् ॥
आधारमानंदमखंडबोधं
यस्मिंल्लयं याति पुरत्रयं च ॥१४॥

आणि या तीन नगरांमध्यें ह्मणजे अवस्थांमध्यें क्रीडा करणाऱ्या त्याच जीवापासून हें सर्व वैचित्र्य उत्पन्न झालें. सर्वांचा आधार, आनंदरूप व संतत—ज्ञानस्वरूप अशा त्याच जीवामध्यें हीं तीनहि नगरें लय पावतात.

या श्लोकांत जीवाच्या चवथ्या तुरीयावस्थेचें वर्णन असून जीवाचें ब्रह्माशीं ऐक्यस्व दर्शविलें आहे.

एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च ॥
खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥१५॥

यापासून म्हणजे ब्रह्मापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, तेज, उदक आणि प्राणिमात्राला धारण करणारी पृथिवी हीं उत्पन्न होतात.

यत्परं ब्रह्म सर्वात्मा विश्वस्यायतनं महत् ॥
सूक्ष्मात्सूक्ष्मतरं नित्यं तत्त्वमेव त्वमेव तत् ॥१६॥

जें परम ब्रह्म सर्वांचा आत्मा, विश्वाचा म्ह० प्राणिमात्राचा मोठा आधार, सूक्ष्माहून सूक्ष्म, आणि शाश्वत असें आहे, तें तूंच आणि तूंच तें.

जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादि प्रपंचं यत्प्रकाशते ॥
तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥१७॥

जागृति, स्वप्न, सुषुप्ति इत्यादि पसारा जें भासमान करतें तें ब्रह्म मीच आहें असें ज्ञान झालें म्हणजे ज्ञाता सर्व बंधनांपासून मुक्त होतो.

त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् ॥
तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः ॥१८॥

तीन स्थानांमधील भोग्य, भोक्ता आणि भोग यांहून निराळा असा मी साक्षी, चिन्मात्र म्ह० ज्ञानस्वरूप, आणि सर्वथा कल्याण-रूप आहें.

मय्येव सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितम् ॥
मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहम् ॥१९॥

माझ्यामध्येंच सर्व उत्पन्न होतें, स्थित रहातें आणि लय पावतें. असें द्वयरहित ब्रह्म मी आहें.

अणोरणीयानहमेव तद्वन्-
महानहं विश्वमहं विचित्रम् ॥
पुरातनोऽहं पुरुषोऽहमीशो
हिरण्मयोऽहं शिवरूपमस्मि ॥२०॥

मी लहानाहून लहान आहें, तसाच सर्वांत मोठाहि आहें. हें विविध विश्व मी आहें. पुरातन पुरुष मी, ईश्वर मी, हिरण्मय पुरुष मी आणि मीच शिवरूप अथवा कल्याणरूप आहें.

अपाणिपादोऽहमचिंत्यशक्तिः
पश्याम्यचक्षुः स शृणोम्यकर्णः ॥
अहं विजानामि विविक्तरूपो
न चास्ति वेत्ता मम चित्सदाऽहम् ॥
वेदैरनेकैरहमेव वेद्यो
वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥२१॥

मला हात नाहींत, पाय नाहींत, पण माझी शक्ति अचिंत्य आहे. मला चक्षु नाहींत पण मी (सर्व) पहातों, कान नाहींत पण ऐकतों. मी सर्वांहून निराळा असून मी सर्व जाणतों, पण मला जाणणारा कोणी नाहीं. मी सर्वदा चित् म्हणजे ज्ञानस्वरूप आहें. सर्व वेदांचें ज्ञातव्य मीच आहें, वेदान्ताचा कर्ता मीच आणि वेदांचा ज्ञाताहि मीच.

न पुण्यपापे मम नास्ति नाशो
न जन्मदेहेंद्रियबुद्धिरस्ति ॥
न भूमिरापो न च वह्निरस्ति
न चानिलो मेऽस्ति न चांबरं च ॥२२॥

मला पुण्य नाहीं, पाप नाहीं, मला मरण नाहीं, जन्म नाहीं, शरीर माझें नव्हे, इंद्रियें माझीं नव्हेत, बुद्धिहि माझी नव्हे. पृथ्वी उदक, तेज, वायु आणि आकाश यांपैकीं कांहींहि मी नव्हे.

एवं विदित्वा परमात्मरूपं
गुहाशयं निष्कलमद्वितीयम् ॥
समस्तसाक्षिं सदसद्विहीनं
प्रयाति शुद्धं परमात्मरूपम् ॥२३॥

बुद्धीचे ठिकाणीं स्थित, अवयवरहित, अद्वितीय, सर्वांचा साक्षी सत् व असत् यांच्या पलीकडचा,–अशा परमात्म्याचें स्वरूप याप्रमाणें जाणणारा शुद्ध परमात्मरूप पावतो.

इति प्रथमः खंडः ॥

---

## अथ द्वितीयः खंडः ॥

यः शतरुद्रियमधीते सोऽग्निपूतो भवति सुरापानात्पूतो भवति ब्रह्महत्यात्पूतो भवति कृत्याकृत्यात्पूतो भवति तस्मादविमुक्तमाश्रितो भवति अत्याश्रमी सर्वदा सकृद्वा जपेत् ॥१॥

शतरुद्रियाचें ह्मणजे रुद्राध्यायाचें अध्ययन करणारा श्रौतस्मार्त अग्नींपासून मिळणारें पावित्र्य मिळवितो; सुरापान, ब्रह्महत्या, कृत्य, अकृत्य इत्यादि पापांपासून मुक्त होतो व अखेरीस त्यापासून शिवपदाला जातो. परमहंस आश्रमी यांनीं सर्वदा अथवा एकदा जप करावा.

अविमुक्त=शिव, विमुक्त=जीव. 'अविमुक्त' हें काशी क्षेत्राचें एक नांव आहे. दोन भुवयांचा मध्य व नासिकेचें मूलस्थान यालाहि अविमुक्त अशी संज्ञा आहे. योग्यांनीं तेथें दृष्टि लावली असतां सर्व बाह्य विषयांपासून मन निवृत्त होऊन ईश्वराचे ठिकाणीं लीन होतें. पहिल्या खंडामध्यें सांगितलेलें निर्गुण ब्रह्माचें ज्ञान ज्यांना अगम्य त्यांच्याकरितां पहिली पायरी ह्मणून यजुर्वेदांतर्गत रुद्राध्यायाचें पठन येथें सांगितलें आहे.

अनेन ज्ञानमाप्नोति संसारार्णवनाशनम् ॥
तस्मादेवं विदित्वैनं कैवल्यं फलमश्नुते
कैवल्यं फलमश्नुते इति ॥२॥ इति द्वितीयः खंडः ॥

याचे योगानें ह्मणजे रुद्राध्यायपठनानें संसारसमुद्राचा नाश करणारें ज्ञान प्राप्त होतें. त्या ज्ञानापासून वर सांगितल्या प्रकारचें ब्रह्माचें ज्ञान प्राप्त होऊन मोक्षरूपी फळ मिळतें.

इति अथर्ववेदीया कैवल्योपनिषत्समाप्ता ॥

---

# कौषीतकि उपनिषत् ॥

—:०:—

हें उपनिषत् ह्मणजे ऋग्वेदाच्या कौषीतकिं ब्राह्मणाचे ६–९ अध्याय होत. ह्मणजे उपनिषदाचे चार अध्याय होतात. पहिल्या अध्यायांत प्राण हा ब्रह्माचा पर्यंक [ह्मणजे चौरंग किंवा आसन] सांगितला असून उत्तर व दक्षिण अशा दोन मार्गांचें वर्णन दिलें आहे. दुसऱ्या अध्यायांत प्राणाची उपासना सांगून पुढें तिसऱ्यांत व चवथ्यांत आत्मविद्या सांगितली आहे.

ॐ वाङ्मे मनसि प्रतिष्ठिता मनो मे वाचि प्रतिष्ठितमाविरावीर्म एधि वेदस्य म आणीस्थः श्रुतं मे मा प्रहासीरनेनाधीतेनाहोरात्रात्संदधाम्यृतं वदिष्यामि सत्यं वदिष्यामि । तन्मामवतु । तद्वक्तारमवतु । अवतु माम् । अवतु वक्तारमवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

अथ प्रथमोऽध्यायः ॥

## अध्याय पहिला—पर्यंकविद्या.

—:०:—

१ अमृतत्वाचा मार्ग कोणता?—

चित्रो ह वै गार्ग्यायणिर्यक्ष्यमाण आरुणिं वव्रे, स ह पुत्रं श्वेतकेतुं प्रजिघाय याजयेति, तं हाऽऽसीनं पप्रच्छ । गौतमस्य पुत्र, अस्ति संवृतं लोके यस्मिन्मा धास्यसि, अन्यतमो वाध्वा तस्य मा लोके धास्यसीति । स होवाच नाहमेतद्वेद हन्ताऽऽचार्यं पृच्छानीति, स ह पितरमासाद्य पप्रच्छेतीति मा प्राक्षीत्कथं प्रतिब्रवाणीति । स होवाचाहमप्येतन्न वेद सदस्येव वयं स्वाध्यायमधीत्य हरामहे यन्नः परे ददत्येह्युभौ गमिष्याव इति । स ह समित्पाणिश्चित्रं गार्ग्यायणिं प्रतिचक्रम उपायानीति, तं होवाच ब्रह्मार्होऽसि गौतम यो न मानमुपागा, एहि व्येव त्वा ज्ञपयिष्यामीति ॥१॥

गार्ग्यगोत्रज चित्राच्या मनांत यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न होऊन त्यानें उद्दालक आरुणीला मुख्य याजक पसंत केला. आरुणीनें '(माझ्याऐवजीं) तूं यज्ञकर्म चालव' असें सांगून आपल्या श्वेतकेतु नामक पुत्रास पाठविलें. श्वेतकेतु येऊन आसनस्थ झाल्यावर चित्रानें त्याला प्रश्न केला—हे गौतमपुत्रा, (यज्ञ करवून) मला ज्या लोकीं नेऊन ठेवणार आहेस तेथें जन्ममृत्यूचा अंत झाला आहे काय? अथवा त्याहून निराळा एखादा मार्ग आहे आणि त्या मार्गाच्या लोकीं तूं मला ठेवणार आहेस?

श्वेतकेतु ह्मणाला, हें कांहीं मला माहीत नाहीं. मी माझ्या गुरू-कडे जाऊन विचारतों. असें ह्मणून तो पित्याकडे परत आला आणि ह्मणाला, असेंअसें मला चित्रानें विचारलें. मी त्याला काय उत्तर देऊं?

आरुणि ह्मणाला, हें मला देखील माहीत नाहीं. चित्राच्या घरींच आपण स्वाध्यायाचें अध्ययन करूं. आपणांहून श्रेष्ठ पुरुष जें ज्ञान देतील तें घेऊं. चल आपण दोघेहि जाऊं.

समिधा हातांत घेऊन तो (उद्दालक) चित्र गार्ग्यायणीकडे येऊन ह्मणाला, मला आपणांकडे शिष्यभावानें येऊं द्या.

तो चित्र ह्मणाला, गौतमा, ब्रह्मज्ञान संपादन करण्यास तूं योग्य आहेस, कारण तूं गर्व धरला नाहींस. ये मी त्याचें पूर्ण ज्ञान सांगतों.

२. चंद्रलोक स्वर्गाचें द्वार—तेथून परत फिरणें अथवा पुढें जाणें.

स होवाच ये वै के चास्माल्लोकात्प्रयान्ति चंद्रमसमेव ते सर्वे गच्छन्ति। तेषां प्राणैः पूर्वपक्ष आप्यायते तानपरपक्षेण प्रजनयति। एतद्वै स्वर्गस्य लोकस्य द्वारं यश्चंद्रमाः। तं यः प्रत्याह तमतिसृजतेऽथ य एनं न प्रत्याह तमिह वृष्टिर्भूत्वा वर्षति। स इह कीटो वा पतंगो वा शकुनिर्वा शार्दूलो

वा सिंहो वा मत्स्यो वा परश्वा वा पुरुषो वाऽन्यो वैतेषु स्थानेषु प्रत्याजायते यथाकर्म यथाविद्यम् । तमागतं पृच्छति कोऽसीति । तं प्रतिब्रूयाद्विचक्षणादृतवो रेत आभृतं पंचदशात्प्रसूतात्पित्र्यवतस्तन्मा पुंसि कर्तर्येरयध्वम् । पुंसा कर्त्रा मातरि मा निषिक्त, स जाय उपजायमानो द्वादशत्रयोदशोपमासो द्वादशत्रयोदशेन पित्राऽऽसं तद्विदे प्रतितद्विदेऽहं, तन्म ऋतवो अमर्त्यव आभरध्वम् । तेन सत्येन तेन तपसा ऋतुरस्म्यार्तवोऽस्मि, कोऽसि त्वमस्मीति तमातिसृजते ॥२॥

नंतर चित्र ह्मणाला, जे जे ह्मणून या लोकीं मरण पावतात ते सर्व चंद्रलोकीं जातात, त्यांच्या प्राणांनीं चंद्र पूर्वपक्षांत वृद्धि पावतो. दुसऱ्या पक्षांत तो त्यांना पुनः जन्माला पाठवितो. हा चंद्र हेंच स्वर्गाचें द्वार होय. जो चंद्राला योग्य उत्तर देऊं शकतो त्याला चंद्र पुढें जाऊं देतो. ज्याला नीट उत्तर देतां येत नाहीं त्याला वृष्टिरूपानें पुनः पृथ्वीवर पाठवितो. तो किडा, पतंग, पक्षी, वाघ, सिंह, मत्स्य, सर्प, पुरुष अथवा इतर कोणत्या तरी प्रकारानें पुनः या लोकीं आपल्या कर्मानुरूप व ज्ञानानुरूप जन्म पावतो.

जो चंद्राला योग्य उत्तर देऊं शकतो त्याला चंद्र विचारतो—"तूं कोण आहेस ?" त्यानें उत्तर द्यावें— "प्रकाशमान, यज्ञापासून उत्पन्न झालेला, पंधरा रूपें असलेला व पितरांचा स्वामी जो चंद्र त्यापासून रेत घेऊन, हे ऋतूंनों, तुह्मीं तें पुरुषाचे ठिकाणीं आणलें. त्यानें तें माझ्या मातेचे ठिकाणीं स्थापलें. ब्रह्माच्या ज्ञानाकारितां पुनः जन्म घेण्यासाठीं मी बारा तेरा महिने पित्याशीं एकरूप होऊन राहिलों होतों. म्हणून हे ऋतूंनों, तुह्मी मला अमरत्वाप्रत न्या. या सत्यानें व या तपानें मी ऋतुच आहें, ऋतूंचाच आहें."

"तूं कोण आहेस?" म्हणून पुनः विचारतो. "मी तूंच आहें" असें उत्तर मिळाल्यावर चंद्र त्याला पुढें पाठवितो. २

या मंत्राचा अर्थ सुलभ रीतीनें लागला नाहीं. टीकाकार शंकरानंद व इतर भाषांतरकार यांनीं कांहीं शब्दांचा व वाक्यांचा अर्थ व संदर्भ किंचित् निराळ्या तऱ्हेनें लावलेला आहे. तथापि त्यांना देखील सुलभ रीतीनें अर्थ लागलेला दिसत नाहीं.

३ ब्रह्मलोकाचा मार्ग—

स एतं देवयानं पंथानमासाद्याग्निलोकमागच्छति स वायुलोकं स आदित्यलोकं स वरुणलोकं स इंद्रलोकं स प्रजापतिलोकं स ब्रह्मलोकम्। तस्य ह वा एतस्य ब्रह्मलोकस्य आरो ह्रदो मुहूर्ता येष्टिहा विजरा नदी इल्यो वृक्षः सालज्यं संस्थानमपराजितमायतनामिंद्रप्रजापती द्वारगोपौ विभु प्रमितं विचक्षणाऽऽसंदी अमितौजाः पर्यंकः, प्रिया च मानसी प्रतिरूपा च चाक्षुषी पुष्पाण्यादायावयतौ वै च जगंत्यंबाश्वांबायवाश्वाप्सरस अंबया नद्यः। तमित्थंविदागच्छति तं ब्रह्माऽऽह आभिधावत मम यशसा विजरां वा अयं नदीं प्रापन्न वा अयं जरयिष्यतीति ॥३॥

याप्रमाणें देवयान मार्ग प्राप्त होऊन (त्या मार्गानें) चालूं लागल्यानंतर तो अग्निलोकीं येतो, नंतर वायुलोकीं, नंतर आदित्यलोकीं, नंतर वरुणलोकीं, नंतर इंद्रलोकीं, नंतर प्रजापतिलोकीं, नंतर ब्रह्मलोकीं. त्या या ब्रह्मलोकामध्यें आर नामक सरोवर आहे, तसेंच येष्टिहा मुहूर्त, विजरा नदी, इल्य वृक्ष, सालज्य राजधानी, अपराजित राजवाडा, इंद्र व प्रजापति हे त्याचे द्वारपाळ, विभु दिवाणखाना, विचक्षणा सिंहासन, अमितौजा पर्यंक, ब्रह्मदेवाची पत्नी मानसी आणि तिचेंच दुसरें रूप चाक्षुषी या दोघी फुलें घेऊन जगें गुंफीत बसलेल्या, तशाच माता, उपमाता, अप्सरा आणि अंबया नद्या हीं सर्व आहेत.

हें जाणणारा येथें येतो. त्याला पाहून ब्रह्मदेव सेवकांस म्हणतो—"अरे याला सामोरे जा आणि याचा माझ्याप्रमाणें जयजयकार करा. हा विजरा नदीप्रत आला आहे, याला कधीं जरा येणार नाहीं."

आर=कामक्रोधादि शत्रूंनीं युक्त. फुलें=कर्मफळें.

४ ब्रह्मलोकांतील मार्ग—

तं पंच शतान्यप्सरसां प्रतियन्ति शतं चूर्णहस्ताः शतं वासोहस्ताः शतं फलहस्ताः शतमांजनहस्ताः शतं माल्यहस्ताः तं ब्रह्मालंकारेणालंकुर्वन्ति, स ब्रह्मालंकारेणालंकृतो ब्रह्म विद्वान्ब्रह्माभिप्रैति स आगच्छत्यारं ह्रदं तं मनसाऽत्येति। तमित्वा संप्रतिविदो मज्जन्ति, स आगच्छति मुहूर्तान्येष्टिहांस्तेऽस्मादपद्रवान्ति, स आगच्छति विजरां नदीं तां मनसैवात्येति। तत्सुकृतदुष्कृते धुनुते। तस्य प्रिया ज्ञातयः सुकृतमुपयन्त्यप्रिया दुष्कृतं, तद्यथा रथेन धावयन्रथचक्रे पर्यवेक्षत एवमहोरात्रे पर्यवेक्षत एवं सुकृतदुष्कृते सर्वाणि च द्वंद्वानि, स एष विसुकृतो विदुष्कृतो ब्रह्म विद्वान्ब्रह्मैवाभिप्रैति ॥४॥

त्याला पांचशें अप्सरा सामोऱ्या जातात. शंभर सुवासिक चूर्णें हातांत घेतलेल्या, शंभर वस्त्रें घेतलेल्या, शंभर फळें घेतलेल्या, शंभर उटणीं घेतलेल्या, आणि शंभर माळा घेतलेल्या, अशा त्या त्याला ब्रह्मदेवाला योग्य अशा अलंकारांनीं, भूषित करतात. ब्रह्मदेवाच्या अलंकारांनीं भूषित होत्साता तो ब्रह्मज्ञ ब्रह्माकडे चालूं लागतो. तो आर सरोवराप्रत येतो; तें मनानें तरतो. जे केवळ वर्तमान काळाचाच विचार करणारे असतात तें येथें आल्यावर त्यांत बुडतात. नंतर तो येष्टिहा मुहूर्तांकडे येतो; ते त्याच्यापासून दूर पळतात. नंतर तो विजरा नदीप्रत येतो; तीहि केवळ मनानेंच तरतो. येथें तो पुण्य आणि पाप सोडून देतो. त्याच्या ज्या नातलगांना तो प्रिय असतो त्यांना त्याचीं पुण्यकर्में मिळतात. ज्याप्रमाणें रथ चालविणारा

मनुष्य रथाच्या दोन चाकांकडे पहातो, तद्वत् तो दिवस व रात्र, पुण्य व पाप, (इतरहि शीतोष्णादि) सर्वच द्वंद्वें यांच्याकडे पहातो. असा तो पुण्यातीत व पापातीत ब्रह्मज्ञ ब्रह्माकडेच चालूं लागतो.४.

'फलहस्ताः' याच्याऐवजीं 'फणहस्ताः' असा एक पाठ आहे. तेथें फण= अलंकार. 'संप्रतिविदः' याचा अर्थ पूर्ण ज्ञानी असाहि होतो. या अर्थी 'तामित्वाऽसंप्रतिविदः असा पाठ घ्यावयास पाहिजे. 'प्रिया ज्ञातयः' त्याला प्रिय व अप्रिय कोणीच नाहीं; ह्मणून वर दिल्याप्रमाणें अर्थ केला आहे.

५ ब्रह्मदेवाच्या सिंहासनाजवळ येणें—

स आगच्छतील्यं वृक्षं तं ब्रह्मगंधः प्रविशति, स आगच्छति सालज्यं संस्थानं तं ब्रह्मरसः प्रविशति, स आगच्छत्यपराजितमायतनं तं ब्रह्मतेजः प्रविशति, स आगच्छतींद्रप्रजापती द्वारगोपौ तावस्मादपद्रवतः, स आगच्छति विभुप्रमितं तं ब्रह्मयशः प्रविशति। स आगच्छति विचक्षणामासंदीं बृहद्रथंतरे सामनी पूर्वौ पादौ श्यैतनौधसे चापरौ वैरूपवैराजे अनूच्ये शाक्वररैवते तिरश्ची, सा प्रज्ञा, प्रज्ञया हि विपश्यति। स आगच्छत्यमितौजसं पर्यंकं स प्राणः, तस्य भूतं च भविष्यच्च पूर्वौ पादौ श्रीश्चेरा चापरौ, बृहद्रथंतरे अनूच्ये भद्रयज्ञायज्ञीये शीर्षण्ये, ऋचश्च सामानि च प्राचीनातानानि, यजूंषि तिरश्चीनानि, सोमांशव उपस्तरणमुद्गीथमुपश्रीः, श्रीरुपबर्हणं तस्मिन्ब्रह्माऽऽस्ते, तमित्थंवित्पादेनैवाग्र आरोहति। तं ब्रह्मा पृच्छति कोऽसीति तं प्रतिब्रूयात्॥५॥

तो इल्य वृक्षाजवळ येतो; तेव्हां ब्रह्मदेवाचा (ह्मणजे ब्रह्मलोकींचा) गंध त्याच्यामध्यें (नासिकेच्या द्वारें) शिरतो. तो अपराजित राजवाड्याजवळ येतो; ब्रह्मदेवाचें तेज त्याच्यामध्यें प्रविष्ट होतें. तो इंद्र व प्रजापति या द्वाररक्षकांजवळ येतो, ते त्याजपासून दूर पळतात. तो विभुनामक दिवाणखान्याजवळ येतो; त्याच्यामध्यें ब्रह्मदेवाचें यश प्रविष्ट होतें. नंतर तो विचक्षणा सिंहासनापाशीं येतो. बृहद्

व रथंतर साम हे त्या सिंहासनाचे पुढील पाय होत. श्यैत व नौधस साम हे मागचे पाय होत. वैरूप व वैराज साम हे पाय जोडणारे अनुक्रमें दक्षिणेकडील व उत्तरेकडील तुकडे होत. शाक्कर व रैवत साम हे पाय जोडणारे तिरकस तुकडे होत. हें सिंहासन हीच प्रज्ञा. कारण प्रज्ञेनें पूर्ण ज्ञान होतें.

नंतर तो (सिंहासनावरील) अमितौजस पर्यंकाजवळ येतो. हा पर्यंक ह्मणजेच प्राण होय. भूत व भविष्य हे त्याचे पुढील पाय. श्री व पृथ्वी हे मागील पाय. बृहत् व रथंतर साम हे दोन उजवीकडील व डावीकडील आडवे सांधे. भद्र व यज्ञायज्ञीय साम हे दोन मुख्य (पुढील व मागील) सांधे. ऋग्वेद व सामवेद या दोन पूर्वपश्चिम चादरी होत. यजुर्वेद ही उभी चादर. चंद्राचे किरण ही गादी, उद्गीथ हें तीवरील शुभ्र मुदु वस्त्र, आणि ब्रह्मज्ञानाचें तेज ही गिरदी. अशा या पर्यंकावर ब्रह्मदेव बसतो. हें जाणणारा एका पायानेंच त्यावर चढतो तेव्हां ब्रह्मदेव त्याला विचारतो, तूं कोण आहेस?" तेव्हां त्याला पुढील उत्तर द्यावें—

६ सत्याशीं तादात्म्य—

ऋतुरस्म्यार्तवोऽस्म्याकाशाद्योनेः संभूतो भार्यायै रेतः एतत्संवत्सरस्य तेजो, भूतस्य भूतस्य भूतस्य भूतस्याऽऽत्मा, त्वमात्माऽसि यस्त्वमसि सोऽहमस्मीति। तमाह कोऽहमस्मीति सत्यमिति ब्रूयात्किं तत्सत्यमिति यदन्यद्देवेभ्यश्च प्राणेभ्यश्च तत्सदथ यद्देवाश्च प्राणाश्च तत्त्यं, तदेतया वाचाऽभिव्याह्रियते सत्यमिति, एतावदिदं सर्वमिदं सर्वमसि। इत्येवैनं तदाऽऽह। [तदेतदृक्श्लोकेनाभ्युक्तम्। यजूदरः सामशिरा असावृङ्मूर्तिरव्ययः। स ब्रह्मेति स विज्ञेय ऋषिर्ब्रह्ममयो महानिति ॥] ॥३॥

"मी ऋतु आहें, आकाशरूपी गर्भापासून उत्पन्न झालों. संवत्सराचें जें तेज तेंच हें रेत. भूतकाल, चर भूतें, अचर भूतें, पंच महाभूतें या सर्वांचा हाच आत्मा. तूं असा आत्मा आहेस. जो तूं तोच मी."

नंतर ब्रह्मदेव विचारतो, "मी कोण?" त्याला उत्तर द्यावें—"सत्यं." "सत्यं म्हणतात तें काय?" "जें इंद्रियांहून व प्राणांहून वेगळें तें सत् आणि इंद्रियें व प्राण हे त्यं. याचाच सत्य शब्दानें व्यवहार करतात. हें सत्य म्हणजेच हें सर्व विश्व. तूं हें सर्व विश्व आहेस.

याप्रमाणें त्यानें ब्रह्मयाला उत्तर द्यावें. पुढील ऋचेचाहि असाच अर्थ आहे—"यजु उदर, साम शिर, आणि ऋक् शरीर असा हा अव्यय आहे. ब्रह्ममय महान् ऋषि ब्रह्म तो हाच. याला जाणावें."

अखेरची ऋचा कांहीं प्रतींमध्यें नाहीं.

७ ब्रह्मलोकप्राप्ति—

तमाह केन मे पौंस्यानि नामान्याप्नोषीति प्राणेनेति ब्रूयात् । केन स्त्रीनामानीति वाचेति, केन नपुंसकानीति मनसेति, केन गंधानिति घ्राणेनेत्येव ब्रूयात् । केन रूपाणीति चक्षुषेति, केन शब्दानिति श्रोत्रेणेति, केनान्नरसानिति जिह्वयेति, केन कर्माणीति हस्ताभ्यामिति, केन सुखदुःखे इति शरीरेणेति, केनाऽऽनंदं रतिं प्रजातिमित्युपस्थेनेति, केनेत्या इति पादाभ्यामिति, केन धियो विज्ञातव्यं कामानिति प्रज्ञयेति ब्रूयात् । तमाह—आपो वै खलु मे लोकोऽयं ते लोक इति । सा या ब्रह्मणो जितिर्या व्यष्टिस्तां जितिं जयति तां व्यष्टिं व्यश्नुते य एवं वेद य एवं वेद ॥७॥

इति कौषीतकिब्राह्मणोपनिषदि प्रथमोऽध्यायः ॥

ब्रह्मदेव पुनः विचारतो "माझीं पुल्लिंगी नांवें तुला कशानें प्राप्त होतात?" त्यानें उत्तर द्यावें— "प्राणानें." "स्त्रीलिंगी नामें कशानें?"

"वाचेनें." "नपुंसक नामें कशानें?" "मनानें." "गंध कशानें?" "घ्राणेंद्रियानें." "रूपें कशानें?" "चक्षुरिंद्रियानें." "शब्द कशानें?" "श्रवणेंद्रियानें." "अन्नाचे रस कशानें?" "जिव्हेनें" "कर्मे कशानें?" "हातांनीं." "सुखें व दुःखें कशानें?" "(सर्व) शरीरानें." "विषयानंद, रति व संतति कशानें?" "जननेंद्रियानें." "गति कशानें?" "पायांनीं." "विचार, ज्ञानाचा विषय आणि इच्छा हीं कशानें?" "प्रज्ञेनें."

नंतर ब्रह्मदेव म्हणतो— "आप म्ह० आपप्रभृति पंचभूतें हा सर्व माझा लोक आहे. हा लोक तुला प्राप्त होवो." ब्रह्मदेवाचा जेवढा कांहीं जय आणि जेवढी कांहीं व्याप्ति तेवढी सर्व हें जाणणाराला प्राप्त होतात. ७.

---

अथ द्वितीयोऽध्यायः ॥

## अध्याय दुसरा—प्राणोपासना.

—:०:—

प्राणो ब्रह्मेति ह स्माऽऽह कौषीतकिः। तस्य ह वा एतस्य प्राणस्य ब्रह्मणो मनो दूतं चक्षुर्गोप्तृ श्रोत्रं संश्रावयितृ वाक्परिवेष्ट्री । स यो ह वा एतस्य प्राणस्य ब्रह्मणो मनो दूतं वेद दूतवान्भवति, यश्चक्षुर्गोप्तृ गोप्तृमान्भवति, यो वाचं परिवेष्ट्रीं परिवेष्ट्रीमान्भवति । तस्मै वा एतस्मै प्राणाय ब्रह्मण एताः सर्वा देवता अयाचमानाय बलिं हरन्ति, तथो एवास्मै सर्वाणि भूतान्ययाचमानायैव बलिं हरन्ति य एवं वेद । तस्योपनिषन्न याचेदिति । तद्यथा ग्रामं भिक्षित्वाऽलब्ध्वोपविशेन्नाहमतो दत्तमश्नीयामिति, य एवैनं पुरस्तात्प्रत्याचक्षीरंस्त एवैनमुपमंत्रयन्ते ददाम त इति । एष धर्मो याचतो भवति । अन्यथा त्वेवैनमुपमंत्रयन्ते ददाम त इति ॥१॥

कौषीतकि म्हणत असे, प्राण [=जीवन वायु] हेंच ब्रह्म. त्या या प्राणरूपी ब्रह्माचा मन हा दूत आहे, चक्षुरिंद्रिय हा पहारेकरी

आहे, श्रवणेंद्रिय हा (इतर कोणी आल्याची) बातमी पुरविणारा प्रतीहारी आहे, आणि वाणी ही दासी आहे.

या प्राणरूपी ब्रह्माचा मन हा दूत असें जो जाणतो त्याला दूत मिळतात, चक्षुरिंद्रिय हा पहारेकरी असें जाणतो त्याला पहारेकरी मिळतात, श्रवणेंद्रिय हा प्रतीहारी असें जाणतो त्याला प्रतीहारी मिळतात. आणि वाणी ही दासी असें जाणतो त्याला दासी मिळतात.

त्या या प्राणरूपी ब्रह्माला या सर्व (इंद्रियरूपी) देवता न मागतां बलि आणतात. त्याचप्रमाणें जो हें जाणतो त्याला सर्व माणसें न मागतां बलि आणतात. 'याचना करूं नये' हें त्याचें गूढ तत्त्व होय. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य एखाद्या गांवांत भिक्षा मागून, कांहीं मिळालें नाहीं म्हणजे स्वस्थ बसतो, आणि 'मी आतां यांनीं दिलें तरी खाणार नाहीं' असा निश्चय करतो, म्हणजे मग त्याला नकार लावणारे देखील 'आह्मी तुला देतों' असें ह्मणून बोलावतात त्याच्याप्रमाणें हें आहे. याचना करणाराशीं वागण्याची (लोकांची) ही रीत आहे. एरवीं म्ह० आधींपासूनच याचना न करणाराला लोक 'आम्ही तुला देतों' असें म्हणून बोलावतात.

'अन्यथा त्वेवैनं' हा पाठ मी सुचवितों. छापील प्रतींमधून 'अन्यदास्त्वेवैनं' आणि 'अन्यतस्त्वेवैनं' हे दोन पाठ आढळतात.

प्राणो ब्रह्मेति ह स्माऽऽह पैंग्यः । तस्य ह वा एतस्य प्राणस्य ब्रह्मणो वाक्परस्ताच्चक्षुरारुन्धे, चक्षुःपरस्ताच्छ्रोत्रमारुन्धे, श्रोत्रंपरस्तान्मन आरुन्धे, मनःपरस्तात्प्राण आरुन्धे । तस्मै वा एतस्मै प्राणाय ब्रह्मण एताः सर्वा देवता अयाचमानाय बलिं हरन्ति । तथो एवास्मै सर्वाणि भूतान्ययाचमानायैव बलिं हरन्ति य एवं वेद । तस्योपनिषन्न याचेदिति ।

तद्यथा ग्रामं भिक्षित्वाऽलब्ध्वोपविशेन्नाहमतो दत्तमश्नीयामिति, य एवैनं पुरस्तात्प्रत्याचक्षीरंस्त एवैनमुपमंत्रयन्ते ददाम त इति। एष धर्मो याचतो भवति। अन्यथा त्वेवैनमुपमंत्रयन्ते ददाम त इति ॥२॥

पैंग्य म्हणत असे, प्राण हेंच ब्रह्म. त्या या प्राणरूपी ब्रह्माच्या वाणीला (म्हणजे शब्देंद्रियाला) व्यापून चक्षुरिंद्रिय राहिलें आहे, चक्षुरिंद्रियाला व्यापून श्रवणेंद्रिय राहिलें आहे, श्रवणेंद्रियाला व्यापून मन राहिलें आहे, आणि मनाला व्यापून प्राण राहिला आहे.

त्या या प्राणरूपी ब्रह्माला या सर्व (इंद्रियरूपी) देवता न मागतां बलि आणतात. त्याचप्रमाणें जो हें जाणतो त्याला सर्व माणसें न मागतां बलि आणतात. 'याचना करूं नये' हें त्याचें गूढ तत्त्व होय. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य एखाद्या गांवांत भिक्षा मागून कांहीं मिळालें नाहीं म्हणजे स्वस्थ बसतो, आणि 'मी आतां यांनीं दिलें तरी खाणार नाहीं' असा निश्चय करतो, म्हणजे मग त्याला नकार लावणारे देखील 'आम्ही तुला देतों' असें म्हणून बोलावतात, त्याप्रमाणें हें आहे. याचना करणाराशीं वागण्याची (लोकांची) ही रीत आहे. एरवीं म्ह० आधींपासूनच याचना न करणाराला लोक 'आम्ही तुला देतों' असें म्हणून बोलावतात. २.

अथात एकधनावरोधनम्। यदेकधनमभिध्यायात्पौर्णमास्यां वाऽमावास्यायां वा शुद्धपक्षे वा पुण्ये नक्षत्रेऽग्निमुपसमाधाय परिसमू(मु)ह्य परिस्तीर्य पर्युक्ष्योत्पूय पाक्षिणं जान्वाच्य स्रुवेण वा चमसेन वा कंसेन वैता आज्याहुतीर्जुहोति। 'वाङ्नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंध्यात्तस्यै स्वाहा। प्राणो नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंध्यात्तस्यै स्वाहा। चक्षुर्नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंध्यात्तस्यै स्वाहा। श्रोत्रं नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदमवरुंध्यात्तस्यै स्वाहा। मनो नाम देवताऽवरोधिनी सा मेऽ मुष्मादिद-

मवरुंध्यात्तस्यै स्वाहा । प्रज्ञा नाम देवताऽवरोधिनी सा मेऽमुष्मादिदम-वरुंध्यात्तस्यै स्वाहेति । अथ धूमगंधं प्रजिघ्रायाऽऽज्यलेपेनांगान्यनु विमृज्य वाचंयमोऽभिप्रव्रज्यार्थं ब्रुवीत दूतं वा प्रहिणुयाल्लभते हैव ॥३॥

आतां एखादी इष्ट वस्तु प्राप्त करून घेण्याविषयीं— जर अमुक एखादी वस्तु प्राप्त करून घेण्याविषयीं इच्छा झाली असेल तर— पूर्णिमेचे दिवशीं, अथवा अमावास्येचे दिवशीं, अथवा शुद्ध पक्षांतील एखाद्या दिवशीं पुण्य नक्षत्र असतां, अग्नीची स्थापना करून परिसमूहन (=सर्व बाजू स्वच्छ) करून, परिस्तरण करून (=सर्व बाजूंस दर्भ ठेवून), सर्वत्र मंत्रोक्त उदक शिंपडून, आज्य [तूप] मंत्रांनीं पावन करून, उजवा गुडघा खालीं टेकून, पळीनें अथवा चमसानें अथवा कंसानें, पुढीलप्रमाणें आज्याहुती द्याव्या—

वाणी नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

प्राण नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

चक्षु नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

श्रोत्र नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

मन नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

प्रज्ञा नामक देवता (इष्टार्थ) संपादन करून देणारी आहे. अमुक मनुष्याकडून अमुक वस्तु ती मला प्राप्त करून देवो. तिला ही आहुति स्वाहा.

नंतर धूमाचा वास घेऊन (उरलेलें) तूप अंगास लावून व चोंळून मुकाटयानें (इष्ट वस्तु ज्याच्यापाशीं असेल त्याच्याकडे) चालत जाऊन आपली इच्छा सांगावी. अथवा दूत पाठवावा. इष्ट वस्तु खात्रीनें प्राप्त होते. ३.

टीप—स्रुव, चमस आणि कंस हीं यज्ञिय पात्रें आहेत. स्रुव=वटपत्राकार लांकडाची पळी.

अथातो दैवः स्मरः । यस्य प्रियो बुभूषेद्यस्यै वा, येषां वा यासां वा, एतेषामेवैकस्मिन्पर्वणि अग्निमुपसमाधाय एतयैवावृता एता आज्याहुतीर्जुहोति । वाचं ते मयि जुहोम्यसौ स्वाहा । प्राणं ते मयि जुहोम्यसौ स्वाहा । चक्षुस्ते मयि जुहोम्यसौ स्वाहा । श्रोत्रं ते मयि जुहोम्यसौ स्वाहा । मनस्ते मयि जुहोम्यसौ स्वाहा । प्रज्ञां ते मयि जुहोम्यसौ स्वाहेति । अथ धूमगंधं प्रजिघ्रायाऽऽज्यलेपनांगान्यनुविमृज्य वाचंयमोऽभिप्रव्रज्य संस्पर्शं जिगमिषेदपि वाताद्वा संभाषमाणस्तिष्ठेत्प्रियो हैव भवति स्मरन्ति हैवास्य ॥४॥

आतां इंद्रियांनीं तृप्त करण्याच्या इच्छांविषयीं—

जर अमुक पुरुषाला, किंवा स्त्रीला, किंवा पुरुषांना, किंवा स्त्रियांना, आपण प्रिय व्हावें अशी इच्छा झाली असेल, तर—वर

सांगितल्यापैकींच एका शुभ दिवशीं अग्नीची स्थापना करून, आणि वर सांगितलेल्याच प्रकारानें पुढीलप्रमाणें आज्याहुति द्याव्या——

तुझ्या वाचेचें मी माझ्यामध्यें हवन करतों! हा मी आणि ही आहुति, स्वाहा.

तुझ्या प्राणाचें मी माझ्यामध्यें हवन करतों! हा मी आणि ही आहुति, स्वाहा.

तुझ्या चक्षूचें मी माज्यामध्यें हवन करतों! हा मी आणि ही आहुति, स्वाहा.

तुझ्या श्रोत्राचें मी माझ्यामध्यें हवन करतों! हा मी आणि ही आहुति, स्वाहा.

तुझ्या मनाचें मी माझ्यामध्यें हवन करतों! हा मी आणि ही आहुति, स्वाहा.

नंतर धूमाचा वास घेऊन, (उरलेलें) तूप अंगास लावून व चोळून मुकाट्यानें (त्या पुरुषाकडे अथवा स्त्रीकडे) जाऊन स्पर्श करण्याची इच्छा करावी. अथवा (जर हें शक्य नसेल तर) हवेंतूनच (जणूं काय) त्याजबरोबर किंवा तिजबरोबर संभाषण करावें. तो खात्रीनें प्रिय होतो; आणि त्यांनाहि त्याची इच्छा होते.४

"वाचं ते मयि जुहोमि." म्हणजे तुझ्या अप्रीतीचा मी माझ्यामध्यें होम करतों.

५ अतरहित हवन—

**अथातः संयमनं प्रातर्दनमान्तरमग्निहोत्रमिति चाऽऽचक्षते । यावद्वै पुरुषो भाषते न तावत्प्राणितुं शक्नोति, प्राणं तदा वाचि जुहोति । यावद्वै पुरुषः प्राणिति न तावद्भाषितुं शक्नोति, वाचं तदा प्राणे जुहोति । एते अनंते अमृताहुती जाग्रच्च स्वपंश्च संततमव्यवाच्छिन्नं जुहोति । अथ या**

अन्या आहुतयोऽन्तवत्यस्ताः कर्ममय्यो हि भवन्ति। एतद्ध वै पूर्वे विद्वांसोऽग्निहोत्रं न जुहवांचक्रुः ॥५॥

आतां प्रतर्दनानें सांगितलेलें संयमन सांगतात. यालाच आंतर अग्निहोत्र म्हणतात.

जोंपर्यंत मनुष्य बोलत असतो, तोंपर्यंत त्याला श्वासोच्छ्वास करतां येत नाहीं. त्या वेळीं तो वाणीमध्यें प्राणाचें हवन करीत असतो. जोंपर्यंत तो श्वासोच्छ्वास करीत असतो, तोंपर्यंत त्याला बोलतां येत नाहीं. त्या वेळीं तो प्राणामध्यें वाणीचें हवन करीत असतो.

मनुष्य जागा असो वा झोंपेंत असो, तो या दोन अंतरहित व मरणराहित आहुति एकसारख्या न थांबतां हवन करीत असतो. यांहून ज्या इतर आहुति असतात, त्या अंतयुक्त असतात, कारण त्या कर्मरूपी असतात. पूर्वींच्या काळीं (देखील) जे ही गोष्ट (म्हणजे कर्मांचें अंतवत्त्व) जाणणारे होते त्यांनीं अग्निहोत्राचें हवन केलें नाहीं (म्हणजे संन्यास घेतला).

प्रतर्दनाची हकीगत पुढील अध्यायांत आहे.

६. उक्थ हेंच ब्रह्म—

उक्थं ब्रह्मेति ह स्माऽऽह शुष्कभृंगारः। तदृगित्युपासीत, सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्यायाभ्यर्चन्ते। तद्यजुरित्युपासीत, सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय युज्यन्ते। तत्सामेत्युपासीत, सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्यायाभ्यर्चन्ते। तद्यजुरित्युपासीत, सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय युज्यन्ते। तत्सामेत्युपासीत, सर्वाणि हास्मै भूतानि श्रैष्ठ्याय संनमन्ते। तच्छ्रीरित्युपासीत तद्यश इत्युपासीत तत्तेज इत्युपासीत, तद्यथैतच्छस्त्राणां श्रीमत्तमं यशस्वितमं तेजस्वितमं भवति, तथो एवैवं विद्वान्सर्वेषां भूतानां श्रीमत्तमो यशस्वितमस्तेजस्वितमो भवति। तमेतमैष्टिकं कर्ममयमात्मा-

नमध्वर्युः संस्करोति, तस्मिन्यजुर्मयं प्रवयति, यजुर्मय ऋङ्मयं होत, ऋङ्मये साममयमुद्गाता । स एष सर्वस्यै त्रयीविद्याया आत्मा । एष उ एवास्यात्मा । एतदात्मा भवति य एवं वेद ॥६॥

शुष्कभृंगार म्हणत असे, उक्थ हेंच ब्रह्म. त्या उक्थाची ऋक् म्हणून उपासना करावी; त्याच्या (म्ह० उपासकाच्या) श्रेष्ठत्वाकरितां सर्व प्राणी त्याचें अभ्यर्चन करतात. त्या उक्थाची यजु म्हणून उपासना करावी; त्याच्या श्रेष्ठत्वाकरितां सर्व प्राणी त्याच्याशीं युक्त होतात. त्या उक्थाची साम म्हणून उपासना करावी; त्याच्या श्रेष्ठत्वाकरितां सर्व प्राणी त्याला नमन करतात.

त्या उक्थाची श्री [वैभव] म्हणून उपासना करावी, यश म्हणून उपासना करावी, तेज म्हणून उपासना करावी; ज्याप्रमाणें उक्थ हें शस्त्र सर्व शस्त्रांत अत्यंत वैभवयुक्त, अत्यंत यशस्वी व अत्यंत तेजस्वी शस्त्र आहे, त्याप्रमाणें उक्थ हें ब्रह्म असें जाणणारा सर्व प्राण्यांमध्यें अत्यंत वैभवयुक्त, अत्यंत यशस्वी व अत्यंत तेजस्वी होतो.

यज्ञाशीं संबद्ध व कर्मांनीं पूर्ण अशा त्या या आत्म्याला म्हणजे यजमानाला अध्वर्यु (ब्रह्मज्ञानासाठीं) संस्कारयुक्त करतो. तो त्यावर यज्ञांतील यजुर्भाग विणतो. यजुर्भागावर होता ऋग्भाग विणतो. ऋग्भागावर उद्गाता सामभाग विणतो.

हा उक्थ सर्व त्रयीविद्येचा (म्ह० तीन वेदांचा) आत्मा आहे. खरोखर हा [=उक्थ=प्राण=ब्रह्म] याचा म्ह० यजमानाचा आत्माच होय. हें जो जाणतो तो याच्याशीं म्ह० ब्रह्माशीं एकरूप होतो.

टीप—उक्थ ह्मणजे प्राण असें बृहदारण्यकोपनिषदांतहि [५.१३.१] सांगितलें आहे. श्री, यश व तेज हे 'शस्त्र' शब्दाचे येथें भाग कल्पिले आहेत. 'शस्त्र' हा यज्ञप्रसंगीं म्हणावयाच्या देवस्तुतिपर ऋचांचा समूह होय.

७ सूर्याची उपासना—

अथातः सर्वजितः कौषीतकेस्त्रीण्युपासनानि भवन्ति। सर्वजिद्ध स्म कौषीतकिरुद्यन्तमादित्यमुपतिष्ठते, यज्ञोपवीतं कृत्वाऽप आचम्य त्रिरुदपात्रं प्रसिच्योद्यन्तमादित्यमुपतिष्ठते, वर्गोऽसि पाप्मानं मे वृङ्धीति। एतयैवाऽऽवृता मध्ये सन्तमुद्वर्गोऽसि पाप्मानं म उद्वृङ्धीति। एतयैवाऽऽवृताऽस्तं यन्तं संवर्गोऽसि पाप्मानं मे संवृङ्धीति। तद्यदहोरात्राभ्यां पापं करोति सं तद्वृङ्क्ते। तथो एवैवं विद्वानेतयैवाऽऽवृताऽऽदित्यमुपतिष्ठेत। यदहोरात्राभ्यां पापं करोति सं तद्वृङ्क्ते ॥७॥

आतां सर्वजित् कौषीताकि मुनीनें सांगितलेल्या तीन उपासना—

यज्ञोपवीत (योग्य प्रकारें) धारण करून, उदक आचमन करून उदकपात्रावर तीनदां उदक शिंपडून "तूं दूर करणारा आहेस, माझें पाप दूर कर" या शब्दांनीं सर्वजित् कौषीताकि उगवत्या सूर्याची उपासना करीत असे; याच प्रकारें मध्यान्हींच्या सूर्याची आणि अस्त पावणाऱ्या सूर्याची उपासना करीत असे. तो जें दिवसास व रात्रीं पाप करी तें सूर्य दूर करी. जो हें जाणतो त्यानें याच प्रकारें आदित्याची उपासना करावी. तो दिवसास व रात्रीं जें पाप करतो तें सूर्य दूर करतो.

८ चंद्राची उपासना—

अथ मासि मास्यमावास्यायां वृत्तायां पश्चाच्चंद्रमसं दृश्यमानमुपतिष्ठेतैतयैवाऽऽवृता, हरिततृणाभ्यां वाचं प्रत्यस्यति, यत्ते सुसीमं हृदयमधि चंद्रमसि श्रितं तेनामृतत्वस्येशाने माऽहं पौत्रमघं रुदमिति। न हास्मात्पूर्वाः प्रजाः प्रैति। इति नु जातपुत्रस्य, अथाजातपुत्रस्य। आप्यायस्व समेतु ते, सं ते पयांसि समु यन्तु वाजा, यमादित्या अंशुमाप्याययन्तीति। एतास्तिस्र ऋचो जपित्वा, माऽस्माकं प्राणेन प्रजया पशुभिरा-

प्याययिष्ठा, योऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मस्तस्य प्राणेन प्रजया पशुभिराप्यायस्वेति दैवीमावृतमावर्त, आदित्यस्याऽऽवृतमन्वावर्त, इति दक्षिणं बाहुमन्वावर्तते ॥८॥

दर महिन्यास अमावास्या होऊन गेल्यावर चंद्र पश्चिमेस दिसला म्हणजे त्याची उपासना वर सांगितलेल्याच प्रकारें करावी, आणि दोन हिरवे दूर्वांकुर फेंकून पुढील मंत्र म्हणावा—

"हे अमृतत्वाच्या स्वामिनि, चंद्राचे ठिकाणीं असलेल्या तुझ्या सुंदर हृदयाच्या योगानें, मला पुत्रनिमित्त दुःख कधीं प्राप्त न होवो."

त्याचीं मुलें त्याच्या अगोदर कधीं मरण पावत नाहींत. ज्याला पुत्र झालेला आहे त्यानें हा मंत्र म्हणावयाचा. ज्याला पुत्र झालेला नाहीं त्यानें पुढील तीन ऋचा म्हणाव्या— [१] 'आप्यायस्व०'[२] 'सं ते पयांसि०' आणि [३] 'यमादित्या०'

या तीन ऋचा म्हटल्यावर म्हणावें— "आमच्या प्राणानें, संततीनें व पशूंनीं तूं वृद्धि पावूं नकोस, जो आमचा द्वेष करतो व ज्याचा आम्ही द्वेष करतों त्याच्या प्राणानें संततीनें व पशूंनीं तूं वृद्धि पाव. मी प्रदक्षिणा करतों. आदित्याच्या मार्गानें प्रदक्षिणा करतों." असें म्हणून उजवा बाहु प्रदक्षिणक्रमानें फिरवावा.

'अमृतत्वस्य ईशाने' यांत चंद्र ही स्त्रीलिंगी अमृतत्वाची स्वामिनी असें म्हटलें आहे. चंद्राला सुधांशु म्हणतात हें प्रसिद्ध आहे. 'न हास्मात्पूर्वा प्रजाः प्रैति' या ठिकाणीं 'न हास्मात्पूर्वा प्रजा प्रैति' किंवा 'न हास्मात्पूर्वाः प्रजाः प्रयान्ति' असें पाहिजे होतें.

'आप्यायस्व०' इत्यादि तीन संपूर्ण मंत्र पुढें दिल्याप्रमाणें आहेत— (१) 'आप्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यं भवा वाजस्य संगथे [ऋग्वेद १.९१.१६] (२) 'सं ते पयांसि समुयन्तु वाजा संपृष्ण्यान्यभिमातिषाहः । आप्यायमानो अमृताय सोम दिविश्रवांस्युत्तमानि धिष्व ॥' [ऋग्वेद १०-९१.१८]. (३) 'यमादित्या अंशुमाप्याययन्ति यमक्षितमक्षितयः पिबन्ति

तेन नो राजा वरुणो बृहस्पतीराप्याययन्तु भुवनस्य गोपाः ॥' [तैत्तिरीयसंहिता २.४.१४.१]. यांचें अर्थ येणेंप्रमाणें— (१) हे सोमदेवते, तूं वृद्धि पाव, तुला सर्वतः सामर्थ्य प्राप्त होवो, तूं मला सर्वतः अन्न दे. (२) हे सोमदेवते, शक्ति देणारे व शत्रूंचा नाश करणारे तुझे दुग्धाचे प्रवाह आमच्या मुलांकडे येवोत, अमृताकरितां वर्धमान होणाऱ्या तुला स्वर्गांतील उत्तम यशें प्राप्त होवोत. (३) ज्या किरणाला आदित्य वाढवितात आणि ज्या अमृताला अमर पितात असा जो सोम त्या सोमानें राजा वरुण, बृहस्पति आणि प्रजापति आह्मांला वर्धमान करोत.

९ पूर्णिमेच्या चंद्राची उपासना—

अथ पौर्णमास्यां पुरस्ताच्चंद्रमसं दृश्यमानमुपतिष्ठेतैतयैवाऽऽवृता । सोमो राजाऽसि विचक्षणः पंचमुखोऽसि प्रजापतिः, ब्राह्मणस्त एकं मुखं तेन मुखेन राज्ञोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु, राजा त एकं मुखं तेन मुखेन विशोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु, श्येनस्त एकं मुखं तेन मुखेन पक्षिणोऽत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु, अग्निष्ट एकं मुखं तेन मुखेनेमं लोकमत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु, त्वयि पंचमं मुखं तेन मुखेन सर्वाणि भूतान्यत्सि तेन मुखेन मामन्नादं कुरु । माऽस्माकं प्राणेन प्रजया पशुभिरवक्षेष्ठा, योऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मस्तस्य प्राणेन प्रजया पशुभिरवक्षीयस्वेति, दैवीमावृतमावर्त आदित्यस्याऽऽवृतमन्वावर्त इति दक्षिणं बाहुमन्वावर्तते ॥९॥

तसेंच पूर्णिमेच्या दिवशीं पूर्वेकडे चंद्र दिसला ह्मणजे त्याच प्रकारानें त्याची उपासना करावी, व ह्मणावें, "तूं सोम राजा आहेस. प्रकाशमान, पांच मुखांचा, प्रजापति तूं आहेस. ब्राह्मण हें तुझें एक मुख, त्या मुखानें तूं राजे खातोस, त्या मुखानें मला अन्न खाणारा कर. राजा हें तुझें एक मुख आहे, त्या मुखानें तूं प्रजा खातोस, त्या मुखानें मला अन्न खाणारा कर. श्येन हें तुझें एक मुख आहे, त्या मुखानें तूं पक्षी खातोस, त्या मुखानें मला अन्न खाणारा कर. अग्नि हें तुझें एक मुख आहे, त्या मुखानें तूं हा

लोक खातोस, त्या मुखानें मला अन्न खाणारा कर. पांचवें मुख स्वतः तुझ्या ठिकाणीं आहे, त्या मुखानें तूं सर्व प्राणी खातोस, त्या मुखानें मला अन्न खाणारा कर. आमचा प्राण, आमची प्रजा आणि आमचे पशु यांचा क्षय करूं नकोस. जो आमचा द्वेष करतो व ज्याचा आम्ही द्वेष करतों, त्याचा प्राण, त्याची प्रजा व त्याचे पशु यांचा क्षय कर. मी प्रदक्षिणा करतों. मी आदित्याच्या मार्गानें प्रदक्षिणा करतों" असें ह्मणून उजवा बाहु प्रदक्षिण क्रमानें फिरवावा.

१० संततीला दीर्घायुष्य—

अथ संवेश्यञ्जायायै हृदयमभिमृशेत् 'यत्ते सुसीमे हृदये हितमंतः प्रजापतौ, मन्येऽहं मां तद्विद्वांसं तेन माऽहं पौत्रमघं रुदमिति । न हास्मात्पूर्वाः प्रजाः प्रैतीति ॥१०॥

पत्नीबरोबर गमन करण्याचे अगोदर तिचे हृदयाला स्पर्श करून म्हणावें—"हे शोभनगात्रि, तुझ्या हृदयाच्या अंतर्भागीं, संततीला कारण, असें जें (अमृत) स्थित आहे तें मी जाणतों असें मला वाटतें. म्हणून मला पुत्रनिमित्त दुःख कधीं प्राप्त न होवो." त्याचीं मुलें त्याच्या अगोदर मरण पावत नाहींत.

कांहीं प्रतींमध्यें "मन्येऽहं मां." या ऐवजीं "तेनामृतत्वस्येशाने मा त्वं पुत्र्यामघं निगा इति" असा पाठ आहे. पत्नीचे हृदयांत स्थित असलेलें अमृत म्हणजे परस्पर प्रेम.

११ पुत्राला पित्याचे आशीर्वाद—

अथ प्रोष्याऽऽयन्पुत्रस्य मूर्धानमभिमृशेत् । अंगादंगात्संभवासि हृदयादधिजायसे । आत्मा त्वं पु माऽऽविथ स जीव शरदः शतमिति । नामास्य गृह्णाति । अश्मा भव परशुर्भव हिरण्यमस्तृतं भव । तेजो वै पुत्र नामासि स जीव शरदः शतमिति । नामास्य गृह्णात्यथैनं परिगृह्णाति ।

येन प्रजापतिः प्रजाः पर्यगृह्णादरिष्टयै तेन त्वा परिगृह्णाम्यसाविति नामास्य गृह्णाति । अथास्य दक्षिणे कर्णे जपत्यस्मै प्रयंधि मघवन्नृजीषिन्निति, इंद्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहीति सव्ये, मा च्छिथा मा व्यथिष्टाः शतं शरद आयुषो जीव पुत्र ते नाम्ना मूर्धानमवजिघ्राम्यसाविति, त्रिर्मूर्धानमव जिघ्रेद्गवां त्वा हिंकारेणाभि हिं करामीति त्रिर्मूर्धानमभि हिं कुर्यात् ॥११॥

पिता दूरदेशीं राहून (अथवा प्रवासानंतर ) परत आला म्हणजे त्यानें पुत्राच्या मस्तकाला स्पर्श करावा आणि ह्मणावें—माझ्या प्रत्येक अवयवापासून तूं उत्पन्न झाला आहेस, माझ्या हृदयापासून तूं झाला आहेस, माझा आत्माच आहेस, कारण हे पुत्रा; तूं माझें (नरकापासून) रक्षण केलेंस. तूं शंभर वर्षें जग.” असें म्हणून पुत्राचें नांव घ्यावें.

“तूं दगड (ह्मणजे दगडाप्रमाणें कणखर) हो, परशु (म्हणजे परशूप्रमाणें तीक्ष्ण) हो, सर्व लोक जें जोडतात तें सुवर्ण (म्हणजे सुवर्णाप्रमाणें प्रिय) हो. पुत्रा, तूं खरोखर तेज आहेस. तूं शंभर वर्षें जग.” असें म्हणून पुत्राचें नांव घ्यावें व त्याला आलिंगन द्यावें.

“ज्या अर्थी प्रजापतीनें प्रजांच्या कल्याणाकरितां त्यांना आलिंगन दिलें, त्या अर्थी मी देखील तुला आलिंगन देतों” असें म्हणून पुत्राचें नांव घ्यावें व त्याच्या उजव्या कानांत “अस्मै प्रयंधि०” [ऋग्वेद ३.३६.१०] हा मंत्र म्हणावा व डाव्या कानांत “इंद्र श्रेष्ठानि द्रविणानि धेहि०” [ऋग्वेद २.२१.६] हा मंत्र म्हणावा. पुढें “(माझा वंश) तोडूं नकोस, तुला व्यथा न होवो, आयुष्याचीं शंभर वर्षें जग. हे पुत्रा, तुझें नांव घेऊन तुझें मस्तक मी

हुंगतों" असें म्हणून तीन वेळां मस्तक हुंगावें. "गाईच्या हिंकारा-प्रमाणें मी तुजकरितां हिंकार करतों" असें म्हणून पुत्राच्या मस्तकावर तीन वेळां हिंकार करावा. ११.

हिंकार=हम्माऽऽ असा शब्द. लहान मुलांस हा गाईचा शब्द प्रिय असतो, हें सर्वांस माहीत आहे.

१२ ब्रह्माचें आधिदैविक स्वरूप—

अथातो दैवः परिमरः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यदग्निर्ज्वलत्यथैतन्म्रियते यन्न ज्वलति तस्याऽऽदित्यमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यदादित्यो दृश्यतेऽथैतन्म्रियते यन्न दृश्यते तस्य चंद्रमसमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्चंद्रमा दृश्यतेऽथैतन्म्रियते यन्न दृश्यते तस्य विद्युतमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यद्विद्युद्विद्योततेऽथैतन्म्रियते यन्न विद्योतते तस्य वायुमेव तेजो गच्छति वायुं प्राणः। ता वा एताः सर्वा देवता वायुमेव प्रविश्य वायौ मृत्वा न मृच्छन्ते तस्मादेव उ पुनरुदीरते। इत्यधिदैवतम् ॥१२॥

आतां देवतांचें मरण सांगतात—

अग्नि ज्वलन पावतो तेव्हां हेंच (प्राणरूपी) ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां ज्वलन पावत नाहीं, तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज सूर्याप्रत जातें आणि प्राण वायूमध्यें जातो.

सूर्य दिसतो तेव्हां हेंच ब्रह्म प्रकाश पावतें; जेव्हां दिसत नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज चंद्राप्रत जातें आणि प्राण वायूमध्यें जातो.

चंद्र दिसतो तेव्हां हेंच ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां दिसत नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज वायूमध्यें जातें आणि प्राणहि वायूमध्येंच जातो.

खरोखर त्या या सर्व देवता वायूमध्यें प्रवेश करून व वायूमध्यें मरण पावून (देखील) मरत नाहींत; त्यापासूनच पुनः उद्भव पावतात.

——याप्रमाणें देवतांविषयीं विचार झाला.

१३ ब्रह्माचें आध्यात्मिक स्वरूप—

अथाध्यात्मम् । एतद्वै ब्रह्म दीप्यते यद्वाचा वदन्त्यथैतन्म्रियते यन्न वदति तस्य चक्षुरेव तेजो गच्छति प्राणं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्चक्षुषा पश्यत्यथैतन्म्रियते यन्न पश्यति तस्य श्रोत्रमेव तेजो गच्छति प्राणं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यच्छ्रोत्रेण शृणोत्यथैतन्म्रियते यन्न शृणोति तस्य मन एव तेजो गच्छति प्राणं प्राणः। एतद्वै ब्रह्म दीप्यते यन्मनसा ध्यायत्यथैतन्म्रियते यन्न ध्यायति तस्य प्राणमेव तेजो गच्छति प्राणं प्राणः। ता वा एताः सर्वा देवताः प्राणमेव प्रविश्य प्राणे मृत्वा न मृच्छन्ते तस्मादेव उ पुनरुदीरते। तद्यदि ह वा एवं विद्वांसमुभौ पर्वतावभिप्रवर्तेयातां तुस्तूर्षमाणौ दक्षिणश्चोत्तरश्च न हैवैनं स्तृण्वीयाताम्। अथ य एनं द्विषन्ति यांश्च स्वयं द्वेष्टि त एनं सर्वे परि म्रियन्ते ॥१३॥

आतां आत्म्याविषयीं सांगतात——

मनुष्य वाचेनें बोलतो तेव्हां हेंच (प्राणरूपी) ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां बोलत नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज चक्षूप्रत जातें आणि प्राण प्राणाप्रत जातो.

मनुष्य चक्षूनें पहातो तेव्हां हेंच ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां पहात नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज श्रोत्राप्रत जातें आणि प्राण प्राणाप्रत जातो.

मनुष्य श्रोत्रानें ऐकतो तेव्हां हेंच ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां ऐकत नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज मनाप्रत जातें आणि प्राण प्राणाप्रत जातो.

मनुष्य मनानें विचार करतो तेव्हां हेंच ब्रह्म प्रकाश पावतें; पण जेव्हां विचार करीत नाहीं तेव्हां हें मरण पावतें. त्याचें तेज प्राणामध्यें जातें आणि प्राणहि प्राणामध्येंच जातो.

खरोखर त्या या सर्व देवता प्राणामध्यें प्रवेश करून व प्राणामध्यें मरण पावून (देखील) मरत नाहींत, त्यापासूनच पुनः उद्भव पावतात.

खरोखर हें जो जाणतो त्याच्यावर जरी दक्षिणेकडचा [=विंध्य] व उत्तरेकडचा [=हिमालय] असे दोन पर्वत त्याला चिरडण्यासाठीं कोसळले तरी ते त्याला चिरडूं शकणार नाहींत. परंतु जे याचा द्वेष करतात व ज्यांचा हा स्वतः द्वेष करतो ते सर्व याच्या सभोंवतीं मरण पावतात. १३.

कौषीतकि उपनिषत् ज्या काळीं लिहिलें गेलें त्या काळीं आर्य लोक विंध्य पर्वत ओलांडून दक्षिणेकडे आले नसावे असें वरील वचनावरून दिसतें.

१४ प्राणाचें श्रेष्ठत्व.

अथातो निःश्रेयसादानम्। सर्वा ह वै देवता अहंश्रेयसे विवदमाना अस्माच्छरीरादुच्चक्रमुः। तद्दारुभूतं शिश्ये। अथैनद्वाक्प्रविवेश तद्वाचा वदच्छिश्य एव। अथैनच्चक्षुः प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छिश्य एव। अथैनच्छ्रोत्रं प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छ्रोत्रेण शृण्वच्छिश्य एव। अथैनन्मनः प्रविवेश तद्वाचा वदच्चक्षुषा पश्यच्छ्रोत्रेण शृण्वन्मनसा ध्यायच्छिश्य एव। अथैनत्प्राणः प्रविवेश तत्तत एव समुत्तस्थौ। ता वा एताः सर्वा देवताः प्राणे निःश्रेयसं विदित्वा प्राणमेव प्रज्ञात्मानमभिसंभूय सहैतैः सर्वैरस्माच्छरीरादुच्चक्रमुः। ते वायुप्रविष्टा आकाशात्मानः स्वरीयुः। तथो एवैवं विद्वान्सर्वेषां भूतानां प्राणमेव प्रज्ञात्मानमभिसंभूय सहैतैः सर्वैरस्माच्छरीरादुत्क्रामति, स वायुप्रविष्टः आकाशात्मा स्वरेति। स तद्गच्छति यत्रैते देवास्तत्प्राप्य तदमृतो भवति यदमृता देवाः ॥१४॥

आतां (प्राणाच्या) श्रेष्ठत्वाची (इंद्रियांनीं दिलेली) मान्यता (सांगतात)—

(प्राण व इंद्रियें) हीं सर्व स्वतःच्या श्रेष्ठत्वासंबंधानें विचार करीत असतां या शरीरांतून वर निघून गेलीं. (तेव्हां) तें (शरीर) लांकडासारखें पडून राहिलें.

नंतर त्यामध्यें वाचेनें प्रवेश केला. तरी वाचेनें बोलत तें पडूनच राहिलें.

नंतर त्यामध्यें दृष्टीनें प्रवेश केला. तरी वाचेनें बोलत आणि चक्षूनें पहात तें पडूनच राहिलें.

नंतर त्यामध्यें श्रवणानें प्रवेश केला. तरी वाचेनें बोलत, चक्षूनें पहात आणि कानानें ऐकत तें पडूनच राहिले.

नंतर त्यामध्यें मनानें प्रवेश केला. तरी वाचेनें बोलत, चक्षूनें पहात, कानानें ऐकत आणि मनानें विचार करीत तें पडूनच राहिलें.

नंतर त्यामध्यें प्राणानें प्रवेश केला. त्याबरोबर तें उठून उभें राहिलें.

त्या या सर्व देवता (ह्मणजे इंद्रियें) प्राणाचे ठिकाणीं श्रेष्ठत्व आहे असें जाणून आणि प्राण हाच प्रज्ञात्मा आहे असें ओळखून या शरीरांतून एकत्र वर उडून गेल्या वायूमध्यें प्रवेश करून व आकाशरूप होऊन त्या स्वर्गांत गेल्या. त्याचप्रमाणें जो हें जाणतो तो सर्व भूतांचा प्रज्ञात्मा प्राणच आहे असें ओळखून या सर्व इंद्रियांसह या शरीरांतून वर निघून जातो, आणि वायूमध्यें प्रवेश करून आकाशरूप होऊन स्वर्गांत जातो. हीं इंद्रियें जेथें जातात तेथेंच तो जातो. तेथें गेल्यावर जें अमरत्व देवांना प्राप्त झालें आहे तें अमरत्व त्याला प्राप्त होतें. १४.

'सहैतैः सर्वैरुच्चक्रमुः' म्हणजे काय तें नीट समजत नाहीं. शंकरानंदांनीं 'प्राणापानव्यानोदानसमानैर्निखिलैः' असा अर्थ केला आहे. प्राण व इंद्रियें यांमधील श्रेष्ठत्वाचा असाच वाद बृहदारण्यकोपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत व छांदोग्याच्या पांचव्या अध्यायांत आहे.

१५ अंतकाळीं पित्याचें पुत्राला देणें—

अथातः पितापुत्रीयं संप्रदानमिति चाऽऽचक्षते । पिता पुत्रं प्रेष्यन्नाह्वयति नवैस्तृणैरगारं संस्तीर्याग्निमुपसमाधायोदकुंभं सपात्रमुपनिधायाऽहतेन वाससा संप्रच्छन्नः । एत्य पुत्र अस्याऽभिमुखत एवाऽऽसीत । अथास्मै संप्रयच्छति वाचं मे त्वयि दधानीति पिता, वाचं ते मयि दध इति पुत्रः । प्राणं मे त्वयि दधानीति पिता, प्राणं ते मयि दध इति पुत्रः। चक्षुर्मे त्वयि दधानीति पिता, चक्षुस्ते मयि दध इति पुत्रः। श्रोत्रं मे त्वयि दधानीति पिता, श्रोत्रं ते मयि दध इति पुत्रः । अन्नरसान्मे त्वयि दधानीति पिता, अन्नरसांस्ते मयि दध इति पुत्रः। कर्माणि मे त्वयि दधानीति पिता, कर्माणि ते मयि दध इति पुत्रः । सुखदुःखे मे त्वयि दधानीति पिता, सुखदुःखे ते मयि दध इति पुत्रः । आनंदं रतिं प्रजातिं मे त्वयि दधानीति पिता, आनंदं रतिं प्रजातिं ते मयि दध इति पुत्रः । इत्या मे त्वयि दधानीति पिता. इत्यास्ते मयि दध इति पुत्रः । मनो मे त्वयि दधानीति पिता, मनस्ते मयि दध इति पुत्रः । प्रज्ञां मे त्वयि दधानीति पिता, प्रज्ञां ते मयि दध इति पुत्रः । धियो विज्ञातव्यं कामान्मे त्वयि दधानीति पिता, धियो विज्ञातव्यं कामांस्ते मयि दध इति पुत्रः । यद्यु वा उपाभिगदः स्यात्समासेनैव वदेत्प्राणान्मे त्वयि दधानीति पिता, प्राणांस्ते मयि दध इति पुत्र इति ।

अथ दक्षिणावृत्प्राङुपनिष्क्रामति, तं पिताऽनुमंत्रयते यशो ब्रह्मवर्चसमन्नाद्यं कीर्तिस्त्वा जुषतामिति । अथेतरः सव्यमंसमन्ववेक्षते पाणिनाऽन्तर्धाय वसनांतेन वा प्रच्छाद्य स्वर्गाँल्लोकान्कामानाप्नुहीति । स यद्यगदः स्यात्पुत्रस्यैश्वर्ये पिता वसेत्परि वा व्रजेद्यद्यु वै प्रेयात्तथैनं समापयेयुर्यथा समापयितव्यो भवति यथा समापयितव्यो भवति ॥१५॥ इति द्वितीयोऽध्यायः ॥

आतां पिता-पुत्रीय विधि सांगतात; यालाच संप्रदान म्हणतात-मरणसमयीं पिता पुत्राला बोलावतो. हिरवें गवत घरांत पसरून अग्नि तयार करून, जवळ उदकानें भरलेला कलश व त्यावर तांदु-

ळांनीं भरलेली पंचपात्री ठेवून, पिता ओल्या वस्त्रानें आच्छादित होतो. पुत्रानें जवळ येऊन त्याच्या सन्मुख बसावें. नंतर पिता पुत्राला पुढीलप्रमाणें म्हणून संप्रदान करतो—

पिता— "माझी वाचा मी तुजमध्यें ठेवतों," पुत्र उत्तर करतो— "तुझी वाचा मी मजमध्यें ठेवतों." "माझें घ्राण मी तुजमध्यें ठेवतों." "तुझें घ्राण मी मजमध्यें ठेवतों." "माझा चक्षु मी तुजमध्यें ठेवतों"— "तुझा चक्षु मी मजमध्यें ठेवतों." "माझें श्रोत्र मी तुजमध्यें ठेवतों,"— "तुझें श्रोत्र मी मजमध्यें ठेवतों." "माझे अन्नरस मी तुजमध्यें ठेवतों," " तुझें अन्नरस मी मजमध्यें ठेवतों." "माझीं कर्में मी तुजमध्यें ठेवतों,—" "तुझीं कर्में मी मजमध्यें ठेवतों." माझीं सुख-दुःखें मी तुजमध्यें ठेवतों,"—"तुझीं सुखदुःखें मी मजमध्यें ठेवतों. "माझें विषयसुख, रति आणि प्रजा मी तुजमध्यें ठेवतों,"— "तुझें विषयसुख, रति आणि प्रजा मी मजमध्यें ठेवतों." "माझीं गमनें मी तुजमध्यें ठेवतों,"— "तुझीं गमनें मी मजमध्यें ठेवतों." "माझें मन मी तुजमध्यें ठेवतों,"— "तुझें मन मी मजमध्यें ठेवतों." "माझी प्रज्ञा मी तुजमध्यें ठेवतों,"— तुझी प्रज्ञा मी मज-मध्यें ठेवतों." "माझे विचार, विज्ञान आणि इच्छा मी तुजमध्यें ठेवतों,"— "तुझे विचार, विज्ञान आणि इच्छा मी मजमध्यें ठेवतों." जर पिता आसन्नमरण असून प्रत्येक वाक्य बोलण्यास असमर्थ असेल तर त्यानें थोडक्यांत म्हणावें "माझे प्राण मी तुजमध्यें ठेवतों."— पुत्रानें उत्तर करावें—"तुझे प्राण मी मजमध्यें ठेवतों."

नंतर पुत्रानें पित्याला प्रदक्षिणा करून पूर्वेकडे चालूं लागावें.

त्याला पिता हांक मारून म्हणतो—– "यश, ब्रह्मतेज, खाण्याला योग्य असें अन्न आणि कीर्ति हीं तुझ्या ठिकाणीं आनंदानें वास करोत." नंतर पुत्र डाव्या खांद्यावरून मागें बघतो, व हातानें (तोंड) झांकून किंवा वस्त्राच्या पदरानें स्वतःला आच्छादन करून म्हणतो—– "स्वर्ग-लोक आणि स्वर्ग-काम तुला प्राप्त होवोत."

जर पिता पुनः दुखण्यांतून उठला तर त्यानें (घरांत) पुत्राच्या सत्तेखालीं रहावें, अथवा संन्यास घेऊन बाहेर पडावें. जर पिता मरण पावेल तर त्याची ज्या प्रकारें व्यवस्था करावयास पाहिजे त्या प्रकारें व्यवस्था करावी. १५.

बृहदारण्यकोपनिषदांत [१.५.१७-२०] याहून निराळें ज्ञानपर संप्रदान आहे. कौषीतकि हें ब्राह्मणोपनिषत् आहे, व त्यांतहि हा दुसरा अध्याय केवळ ब्राह्मणभाग आहे. ब्राह्मणोपनिषदापेक्षां आरण्यकोपनिषदाचा ज्ञानाकडे ओघ अधिक असावा हें कालदृष्ट्या साहजिक होय.

---

अथ तृतीयोऽध्यायः।

## अध्याय तिसरा—आत्मज्ञान.

१ मला जाणणें हेंच अत्यंत हितकर—–

ॐ प्रतर्दनो ह दैवोदासिरिंद्रस्य प्रियं धामोपजगाम युद्धेन च पौरुषेण च। तं हेंद्र उवाच प्रतर्दन वरं ते ददानीति। स होवाच प्रतर्दनः त्वमेव मे वरं वृणीष्व यं त्वं मनुष्याय हिततमं मन्यस इति। तं हेंद्र उवाच न वै वरं परोऽपरस्मै वृणीते त्वमेव वृणीष्वेति। एवमवरो वै किल म इति होवाच प्रतर्दनोऽथो खल्विंद्रः सत्यादेव नेयाय, सत्यं हींद्रः, स होवाच। मामेव विजानीह्येतदेवाहं मनुष्याय हिततमं मन्ये

यम्मां विजानीयात्। त्रिशीर्षाणं त्वाष्ट्रमहनं, अरुन्मुखान्यतीन्सालावृकेभ्यः प्रायच्छं, बह्वीः संधा अतिक्रम्य दिवि प्रह्लादीयानतृणमहमंतरिक्षे पौलोमान्पृथिव्यां कालखांजान्। तस्य मे तत्र नलोम च मा मीयते। स यो मां विजानीयान्नास्य केन च कर्मणा लोको मीयते। न स्तेयेन न भ्रूणहत्यया न मातृवधेन न पितृवधेन नास्य पापं चन चकृषो मुखान्नीलं वेतीति ॥१॥

दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन युद्धानें आणि पराक्रमानें इंद्राच्या प्रिय धामाला (म्ह० स्वर्गाला) गेला. त्याला इंद्र म्हणाला, प्रतर्दना, तुला मी वर देऊं इच्छितों. तो प्रदर्शन म्हणाला, मनुष्याला अत्यंत हितकर असा जो तुला वाटतो तो तूंच माझ्याकरितां पसंत कर आणि मला दे. त्याला इंद्र म्हणाला, दुसऱ्याकरितां कोणी वर पसंत करीत नसतों; तूंच पसंत कर. प्रतर्दन म्हणाला, तर मग हा वर मला नसल्यासारखाच होणार. परंतु इंद्र सत्यापासून ढळला नाहीं; कारण इंद्र सत्यरूप आहे. तो म्हणाला—

"मला जाण. मला मनुष्यानें जाणावें हेंच त्याला सर्वांत अधिक हितकर आहे असें मी समजतों. त्वष्ट्याचा तीन शिरें असलेला मुलगा मीं मारला; (सोंग घेऊन) यति झालेल्या अरुन्मुखांना लांडग्यांच्या हवालीं केलें; पुष्कळ सलोख्याचे करार उल्लंघून स्वर्गामध्यें प्रल्हादाच्या अनुयायांना मारलें, अंतरिक्षांत पुलोम्याच्या अनुयायांना मारलें, आणि पृथ्वीवर कालखंजांना मारलें. अशीं कर्में करणाऱ्या माझा तेथें एक केंस देखील वांकडा झाला नाहीं. जो मला जाणतो त्याचा (म्हणजे त्याला प्राप्त होणारा) लोक (म्हणजे कर्मफल) नष्ट होत नाहीं. चोरीनें, भ्रूणहत्येनें, मातृवधानें, पितृवधानें (देखील नष्ट होत) नाहीं. कोणतेंहि पाप तो करूं निघाला तरी त्याच्या मुखावरचें तेज नष्ट होत नाहीं. १.

कौषीतकि उपनिषदाचा वास्तविकरीत्या प्रारंभ याच अध्यायापासून होय. 'मामेव विजानीहि' याचा अर्थ "मला स्वतःला=आत्म्याला जाण" असाच समजावयाचा आहे. इंद्राच्या या पराक्रमांचीं वर्णनें ऋग्वेदांत आणि ऐतरेय व शतपथ ब्राह्मणांत आहेत. त्यांचा येथें संबंध एवढेंच सांगण्यापुरता कीं, मनुष्य एकदां आत्मज्ञानी अथवा जीवब्रह्मैक्य जाणणारा झाला म्हणजे तो पापपुण्याच्या पलीकडे जातो. त्याचें जीवत्व नष्ट होऊन तो ब्रह्मरूप झाल्यामुळें कोणतेंहि कृत्य त्याला बाधक होत नाहीं. वेति=व्येति.

२ मी प्राण आहें; प्राणानें अमृतत्वाची प्राप्ति—

स होवाच प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा तं मामायुरमृतमित्युपास्स्व । आयुः प्राणः । प्राणो वा आयुः । प्राण एवामृतम् । यावद्ध्यस्मिञ्छरीरे प्राणो वसति तावदायुः । प्राणेन ह्येवामुष्मिँल्लोकेऽमृतत्वमाप्नोति । प्रज्ञया सत्यं संकल्पम् । स यो मामाऽऽयुरमृतमित्युपास्ते सर्वमायुरस्मिँल्लोक एति, आप्नोत्यमृतत्वमक्षितिं स्वर्गे लोके ॥

तद्धैक आहुरेकभूयं वै प्राणा गच्छन्तीति, न हि कश्चन शक्नुयात्सकृद्वाचा नाम प्रज्ञापयितुं चक्षुषा रूपं श्रोत्रेण शब्दं मनसा ध्यातुमित्येकभूयं वै प्राणाः एकैकमेतानि सर्वाण्येव प्रज्ञापयन्ति । वाचं वदन्तीं सर्वे प्राणा अनुवदन्ति, चक्षुः पश्यत्सर्वे प्राणा अनु पश्यन्ति, श्रोत्रं शृण्वत्सर्वे प्राणा अनु शृण्वन्ति, मनो ध्यायत्सर्वे प्राणा अनु ध्यायन्ति, प्राण प्राणंतं सर्वे प्राणा अनु प्राणन्तीति ॥

एवमु हैतदिति हेंद्र उवाच । अस्ति त्वेव प्राणानां निःश्रेयसमिति ॥२॥

इंद्र म्हणाला—मी प्राण आहें, मी प्रज्ञात्मा आहें. त्या माझी आयुष्य आणि अमृतत्व म्हणून उपासना कर. आयुष्य हाच प्राण, प्राण हेंच आयुष्य. प्राण हेंच अमृतत्व. कारण जोंपर्यंत या शरीरांत प्राण रहातो तोंपर्यंतच आयुष्य असतें. प्राणानेंच (म्हणजे प्राणाच्या ज्ञानानें) परलोकीं अमृतत्व प्राप्त होतें. प्रज्ञेनें (ब्रह्माचें) सत्य ज्ञान प्राप्त होतें. आयुष्य आणि अमृतत्व अशा रूपानें जो माझी उपा-

सना करतो त्याला या लोकीं पूर्ण आयुष्य प्राप्त होतें, आणि स्वर्ग लोकामध्यें अमृतत्व व अविनाश हीं प्राप्त होतात.

(प्रतर्दन म्हणाला)— "कोणी म्हणतात कीं, प्राण (म्हणजे इंद्रियें व प्राण) हे एकत्र वर्तत असतात; कारण एकाच वेळीं वाचेनें नांव, चक्षूनें रूप व श्रोत्रानें शब्द समजविण्यास आणि मनानें विचार करण्यास समर्थ होत नाहीं; म्हणून हे सर्व प्राण (एकत्र) यांतली एकेक गोष्ट समजावीत असतात. वाचा बोलत असतां सर्व प्राण तिच्या बरोबर बोलत असतात; चक्षु पहात असतां सर्व प्राण त्याच्या बरोबर पहात असतात; श्रोत्र ऐकत असतां सर्व प्राण त्याच्या बरोबर ऐकत असतात; मन विचार करीत असतां सर्व प्राण त्याच्या बरोबर विचार करीत असतात; प्राण श्वासोच्छ्वास करीत असतां सर्व प्राण त्याच्या बरोबर श्वासोच्छ्वास करीत असतात."

इंद्र म्हणाला, " हें असें आहे; तथापि प्राणांमध्यें श्रेष्ठत्व (व कनिष्ठत्व) आहेच. २.

३. ४. प्राणाची सर्वाप्ति. प्राण व प्रज्ञात्मा एकच—

जीवति वागपेतो मूकान्हि पश्यामो, जीवति चक्षुरपेतोऽन्धान्हि पश्यामो, जीवति श्रोत्रापेतो बधिरान्हि पश्यामो, जीवति मनोपेतो बालान्हि पश्यामो, जीवति बाहुच्छिन्नो जीवत्यूरुच्छिन्न इत्येवं हि पश्याम इति। अथ खलु प्राण एव प्रज्ञात्मेदं शरीरं परिगृह्योत्थापयति। तस्मादेतदेवोक्थमुपासीत। सैषा प्राणे सर्वाप्तिः।

यो वै प्राणः सा प्रज्ञा, या वै प्रज्ञा स प्राणः। सह ह्येतावस्मिञ्शरीरे वसतः सहोत्क्रामतः। तस्यैषैव दृष्टिः। एतद्विज्ञानम्। यत्रैतत्पुरुषः सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति तदैनं— वाक्सर्वैर्नामभिः सहाप्येति, चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति, श्रोत्रं

सर्वैः शब्दैः सहाप्येति, मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति। स यदा प्रतिबुध्यते यथाग्नेर्ज्वलतः सर्वा दिशो विस्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठन्ते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः। स एष प्राण एव प्रज्ञात्मेदं शरीरं परिगृह्योत्थापयति, तस्मादेतदेवोक्थमुपासीतेति। सैषा प्राणे सर्वाप्तिः।

यो वै प्राणः सा प्रज्ञा या वै प्रज्ञा स प्राणः। तस्यैषैव सिद्धिः। एतद्विज्ञानं— यत्रैतत्पुरुष आर्तो मरिष्यन्नाबल्यं न्येत्य संमोहं न्येति तदाहुः। उदक्रमीच्चित्तम्। न शृणोति न पश्यति न वाचा वदति न ध्यायत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति। तदैनं वाक्सर्वैर्नामभिः सहाप्येति, चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति, श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति, मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति ॥३॥

स यदाऽस्माच्छरीरादुत्क्रामति सहैवैतैः सर्वैरुत्क्रामति। वागस्मिन्सर्वाणि नामान्यभिविसृजते वाचा सर्वाणि नामान्याप्नोति, घ्राणमस्मिन्सर्वान्गंधानभिविसृजते घ्राणेन सर्वान्गंधानाप्नोति, चक्षुरस्मिन्सर्वाणि रूपाण्यभिविसृजते चक्षुषा सर्वाणि रूपाण्याप्नोति, श्रोत्रमस्मिन्सर्वाञ्शब्दानभिविसृजते श्रोत्रेण सर्वाञ्शब्दानाप्नोति, मनोऽस्मिन्सर्वाणि ध्यानान्यभिविसृजते मनसा सर्वाणि ध्यानान्याप्नोति। सैषा प्राणे सर्वाप्तिः। यो वै प्राणः सा प्रज्ञा या वा प्रज्ञा स प्राणः, सह ह्येतावस्मिञ्शरीरे वसतः सहोत्क्रामतः ॥४॥

वाचा नसलेला मनुष्य जगतो, कारण आपण मुके पहातों; दृष्टि नसलेला मनुष्य जगतो, कारण आपण आंधळे पहातों; श्रोत्र नसलेला मनुष्य जगतो, कारण आपण बहिरे पहातों; मन नसलेला मनुष्य जगतो, कारण आपण पोरकट माणसें पहातों; बाहु तोडलेला मनुष्य जगतो, पाय तोडलेला मनुष्य जगतो, कारण आपण असे लोक पहातों. म्हणून खरोखर प्राण हाच प्रज्ञात्मा. हाच हें शरीर धरून उत्थापयति म्हणजे उभें करतो. म्हणून (हाच उक्थ

समजून) याच उक्थाची उपासना करावी (नेहमींच्या उक्थाची नको). ती हीच प्राणाची (म्हणजे प्राणामध्यें) सर्वाप्ति [=सर्व इंद्रियांचा प्राणामध्यें अंतर्भाव].

जो प्राण तीच प्रज्ञा, जी प्रज्ञा तोच प्राण. हीं दोन्ही या शरीरामध्यें जोडीनेंच रहातात, व (शरीरामधून) जोडीनेंच निघून जातात. त्याची ही दृष्टि झाली. आतां स्पष्टीकरण—— जेव्हां मनुष्य कोणतेंहि स्वप्न पहात नाहीं अशा प्रकारें झोंपीं गेलेला असतो, तेव्हां त्याच्यामध्यें [मनुष्यामध्यें] प्राण (इंद्रियांसह) एकवटित होतो. त्यावेळीं—— वाचा सर्व नामांसह त्याच्यामध्यें [=प्राणामध्यें] जाते, चक्षु सर्व रूपांसह त्याच्यामध्यें जातो, श्रोत्र सर्व शब्दांसह त्याच्यामध्यें जातें, मन सर्व विचारांसह त्याच्यामध्यें जातें. तो जेव्हां जागा होतो तेव्हां—— ज्याप्रमाणें ज्वलन पावणाऱ्या अग्नींमधून सर्व दिशांकडे ठिणग्या उडतात त्याप्रमाणेंच—या आत्म्यापासून सूक्ष्म इंद्रियें आपापल्या स्थानीं जातात, सूक्ष्म इंद्रियांपासून इंद्रियशक्ति बाहेर पडतात व त्यांपासून (शब्द, रूप इत्यादि) विषय निघतात. तो हा प्राण म्हणजेच प्रज्ञात्मा. हाच हें शरीर धरून उभें करतो. म्हणून याच उक्थाची उपासना करावी. ती हीच प्राणाची (म्हणजे प्राणामध्यें) सर्वाप्ति.

खरोखर, जो प्राण तीच प्रज्ञा, जी प्रज्ञा तोच प्राण. त्याची (आणखी) सिद्धि ही अशी व स्पष्टीकरण हें असें—— जेव्हां मनुष्य आजारी पडून आसन्नमरण होतो, आणि शक्तिरहित होऊन मूर्च्छा पावतो तेव्हां म्हणतात—— "त्याचें चित्त किंवा शुद्धि गेली." तो ऐकत नाहीं, पहात नाहीं, वाचेनें बोलत नाहीं, विचार करीत नाहीं;

त्याच्यामध्यें [=मनुष्यामध्यें] प्राण (इंद्रियांसह) एकवटित होतो. त्यावेळीं वाचा सर्व नामांसह त्याच्यामध्यें [=प्राणामध्यें] जाते, दृष्टि सर्व रूपांसह त्याच्यामध्यें जाते, श्रोत्र सर्व शब्दांसह त्याच्यामध्यें जातें, मन सर्व विचारांसह त्याच्यामध्यें जातें. ३.

तो (प्राण) जेव्हां या शरीरांतून वर निघून जातो तेव्हां तो या सर्वांसह जातो. वाचा याच्यामध्यें सर्व नामें सोडून देते, कारण वाचेनें नामें प्राप्त होतात; घ्राण याच्यामध्यें सर्व गंध सोडून देतें, कारण घ्राणानें सर्व गंध प्राप्त होतात; दृष्टि सर्व रूपें याच्यामध्यें सोडून देते, कारण दृष्टीनें सर्व रूपें प्राप्त होतात; श्रोत्र सर्व शब्द याच्यामध्यें सोडून देतें, कारण श्रोत्रानें सर्व शब्द प्राप्त होतात; मन सर्व विचार याच्यामध्यें सोडून देतें, कारण मनानें सर्व विचार प्राप्त होतात. याप्रमाणें प्राणाचे ठिकाणीं सर्वाप्ति होते. जो प्राण तीच प्रज्ञा, जी प्रज्ञा तोच प्राण. हीं दोन्ही या शरीरामध्यें जोडीनेंच रहातात व (शरीरामधून) जोडीनेंच निघून जातात. ४.

प्राण व प्रज्ञा हीं दोन्ही भिन्न रूपें असलीं तरी एकच होत. प्राण=क्रियाशक्ति व प्रज्ञा=ज्ञानशक्ति. 'उत्थापयति' म्हणून 'उक्थ' हा केवळ शाब्दिक खेळ. 'वागस्मिन्सर्वाणि नामान्यभिविसृजते वाचा सर्वाणि नामान्याप्नोति' या व पुढील वाक्यांचा शंकरानदांचें मतें असा अर्थ आहे— "वाचा........आणि तो प्राण वाचेसह सर्व नामें स्वतःमध्यें घेतो." शंकरानंदांनीं 'अस्मिन' ऐवजीं 'अस्मात्' असा पाठ घेतला आहे पण त्यानें अर्थ नीट लागत नाहीं.

५.७. शरीराचे व्यापार. प्रज्ञेचें श्रेष्ठत्व—

**वागेवास्या एकमंगमुदूढं तस्यै नाम परस्तात्प्रातिविहिता भूतमात्रा। घ्राणमेवास्या एकमंगमुदूढं तस्य गंधः परस्तात्प्रातिविहिता भूतमात्रा। चक्षुरेवास्या एकमंगमुदूढं तस्य रूपं परस्तात्प्रातिविहिता भूतमात्रा। श्रोत्रमे-**

वास्या एकमंगमुदूढं तस्य शब्दः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। जिह्वै-वास्या एकमंगमुदूढं तस्या अन्नरसः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। हस्ता-वेवास्या एकमंगमुदूढं तयोः कर्म परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। शरीरमे-वास्या एकमंगमुदूढं तस्य सुखदुःखे परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। उपस्थ एवास्या एकमंगमुदूढं तस्याऽऽनंदो रतिः प्रजातिः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। पादावेवास्या एकमंगमुदूढं तयोरित्याः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा। मन एवास्या एकमंगमुदूढं तस्यै धियो विज्ञातव्यं कामाः परस्तात्प्रतिविहिता भूतमात्रा ॥५॥

प्रज्ञया वाचं समारुह्य वाचा सर्वाणि नामान्याप्नोति। प्रज्ञया घ्राणं समारुह्य घ्राणेन सर्वान्गंधानाप्नोति। प्रज्ञया चक्षुः समारुह्य चक्षुषा सर्वाणि रूपाण्याप्नोति। प्रज्ञया श्रोत्रं समारुह्य श्रोत्रेण सर्वाञ्शब्दाना-प्नोति। प्रज्ञया जिह्वां समारुह्य जिह्वया सर्वानन्नरसानाप्नोति। प्रज्ञया हस्तौ समारुह्य हस्ताभ्यां सर्वाणि कर्माण्याप्नोति। प्रज्ञया शरीरं समारुह्य शरीरेण सुखदुःखे आप्नोति। प्रज्ञयोपस्थं समारुह्योपस्थेनाऽऽनंदं रतिं प्रजातिमाप्नोति। प्रज्ञया पादौ समारुह्य पादाभ्यां सर्वा इत्या आप्नोति। प्रज्ञयैव मनः-समारुह्य मनसा धियो विज्ञातव्यं कामानाप्नोति ॥६॥

न हि प्रज्ञाऽपेता वाङ्नाम किंचन प्रज्ञापयेत् अन्यत्र मे मनोऽभूदि-त्याह नाहमेतन्नाम प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतं घ्राणं गंधं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतं गंधं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतं चक्षू रूपं किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतद्रूपं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतं श्रोत्रं शब्दं कंचन प्रज्ञापये-दन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतं शब्दं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेता जिह्वाऽन्नरसं कंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतमन्नरसं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतौ हस्तौ कर्म किंचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतत्कर्म प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतं शरीरं सुखं दुःखं किंचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतत्सुखं दुःखं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेत उपस्थ आनंदं रतिं प्रजातिं कांचन प्रज्ञापयेदन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतमानंदं न रतिं

**न प्रजातिं प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेतौ पादावित्यां कांचन प्रज्ञापयेतामन्यत्र मे मनोऽभूदित्याह नाहमेतामित्यां प्राज्ञासिषमिति। न हि प्रज्ञाऽपेता धीः काचन सिध्येत् न प्रज्ञातव्यं प्रज्ञायेत ॥७॥**

आतां या प्रज्ञेमध्यें सर्व भूतें कशीं एकवटतात त्याचें व्याख्यान करतों-

वाचा हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि नाम हा वाचेचा भौतिक (अथवा भूतविषयक) भाग बाहेर काढला आहे. घ्राण हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि गंध हा त्या घ्राणाचा भौतिक भाग बाहेर काढला आहे. चक्षु हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि रूप हा त्या चक्षूचा एक भाग बाहेर काढला आहे. श्रोत्र हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि शब्द हा त्या श्रोत्राचा एक भाग बाहेर काडला आहे. जिव्हा हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि अन्नरस हा त्या जिव्हेचा एक भाग बाहेर काढला आहे दोन हात हा त्या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि कर्म हा त्या हस्तांचा एक भाग बाहेर काढला आहे. शरीर हा त्या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि सुख व दुःख हा त्या शरीराचा एक भाग बाहेर काढला आहे. उपस्थ हा त्या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे, आणि विषयसुख, रति व संतति हा त्या उपस्थाचा एक भाग बाहेर काढला आहे. दोन पाय हा त्या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे; आणि गमनें हा त्या पायांचा एक भाग बाहेर काढला आहे. मन हा या प्रज्ञेचाच एक भाग बाहेर काढला आहे. आणि विचार, ज्ञान आणि इच्छा हा त्या मनाचा एक भाग बाहेर काढला आहे. ५.

भूतमात्रा=भूतभाग. भूत म्हणजे मूलभूत वस्तु असा अर्थ येथें योग्य दिसतो. वागेवास्याः=वागस्या एव.

प्रज्ञेनें वाचेवर आरोहण केल्यावर वाचेच्या द्वारें सर्व नामें प्राप्त होतात (म्हणजे जीव प्राप्त करून घेतो). प्रज्ञेनें नासिकेवर आरोहण केल्यावर नासिकेच्या द्वारें सर्व गंध प्राप्त होतात. प्रज्ञेनें चक्षूवर आरोहण केल्यावर चक्षूच्या द्वारें सर्व रूपें प्राप्त होतात. प्रज्ञेनें श्रोत्रावर आरोहण केल्यावर श्रोत्राच्या द्वारें सर्व शब्द प्राप्त होतात. प्रज्ञेनें जिव्हेवर आरोहण केल्यावर जिव्हेच्या द्वारें सर्व अन्नरस प्राप्त होतात. प्रज्ञेनें हस्तांवर आरोहण केल्यावर हस्तांच्या द्वारें सर्व कर्मे प्राप्त होतात. प्रज्ञेनें शरीरावर आरोहण केल्यावर शरीराच्या द्वारें सर्व सुखदुःखें प्राप्त होतात. प्रज्ञेनें उपस्थावर आरोहण केल्यावर उपस्थाच्या द्वारें विषयसुख, रति व संतति प्राप्त होतात. प्रज्ञेनें पायांवर आरोहण केल्यावर पायांच्या द्वारें सर्व गमनें प्राप्त होतात. प्रज्ञेनें मनावर आरोहण केल्यावर मनाच्या द्वारें सर्व विचार, ज्ञान आणि इच्छा प्राप्त होतात. ६.

कारण खरोखर प्रज्ञेनें वियुक्त अशी वाचा कोणतेंहि नाम जाणवूं शकत नाहीं; "माझें मन दुसरीकडे होतें, मीं हें नाम जाणलें नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असें घ्राण कोणताहि गंध जाणवूं शकत नाहीं; " माझें मन दुसरीकडे होतें, मीं हा गंध जाणला नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असा चक्षु कोणतेंहि रूप जाणवूं शकत नाहीं; "माझें मन दुसरीकडे होतें, मीं हें रूप जाणलें नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असें श्रोत्र कोणताहि शब्द जाणवूं शकत नाहीं; "माझें मन दुसरीकडे होतें, मीं

हा शब्द जाणला नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त अशी जिव्हा कोणताहि अन्नरस जाणवूं शकत नाहीं; "माझें मन दुसरी-कडे होतें मीं हा अन्नरस जाणला नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असे हस्त कोणतेंहि कर्म जाणवूं शकत नाहींत; "माझें मन दुसरीकडे होतें मीं हें कर्म जाणलें नाहीं" असें मनुष्य म्हणतो प्रज्ञेनें वियुक्त असें शरीर कोणतेंहि सुख अथवा दुःख जाणवूं शकत नाहीं "माझें मन दुसरीकडे होतें मीं हें सुख अथवा दुःख जाणलें नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असें उपस्थ कोणतेहि विषया-नंद, रति अथवा संतति जाणवूं शकत नाहीं; "माझें मन दुसरी-कडे होतें, मी विषयानंद, रति अथवा संतति जाणली नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असें पाय कोणतेंहि गमन जाणवूं शकत नाहींत; "माझें मन दुसरीकडे होतें, मीं कोणतेंहि गमन जाणलें नाहीं" असें मनुष्य म्हणतो. प्रज्ञेनें वियुक्त असा कोणताहि विचार होऊं शकत नाहीं, समजण्यासारखें कांहींहि समजूं शकत नाहीं.७.

८. आत्मा हा ज्ञाता. आत्मा हा सर्वेश—

न वाचं विजिज्ञासीत, वक्तारं विद्यात् । न गंधं विजिज्ञासीत घ्रातारं विद्यात् । न रूपं विजिज्ञासीत द्रष्टारं विद्यात् । न शब्दं विजिज्ञासीत श्रोतारं विद्यात् । नान्नरसं विजिज्ञासीतान्नरसस्य विज्ञातारं विद्यात् । न कर्म विजिज्ञासीत कर्तारं विद्यात् । न सुखदुःखे विजिज्ञासीत सुखदुः-खयोर्विज्ञातारं विद्यात् । नाऽऽनंदं न रतिं न प्रजातिं विजिज्ञासीताऽऽ-नंदस्य रतेः प्रजातेर्विज्ञातारं विद्यात् । नेत्यां विजिज्ञासीतैतारं विद्यात् । न मनो विजिज्ञासीत मन्तारं विद्यात् ॥

ता वा एता दशैव भूतमात्रा अधिप्रज्ञं, दश प्रज्ञामात्रा अधिभूतं, यद्धि भूतमात्रा न स्युर्न प्रज्ञामात्राः स्युर्यद्वा प्रज्ञामात्रा न स्युर्न भूतमात्राः स्युः । न ह्यन्यतरतो रूपं किंचन सिध्येत् ॥

नो एतन्नाना । तद्यथा रथस्यारेषु नेमिरर्पितो नाभावरा अर्पिता, एवमेवैता भूतमात्राः प्रज्ञामात्रास्वर्पिताः, प्रज्ञामात्राः प्राणेऽर्पिताः । स एष प्राण एव प्रज्ञात्माऽऽनंदोऽजरोऽमृतः । न साधुना कर्मणा भूयान्नो एवासाधुना कनीयान् । एष ह्येवैनं साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषत, एष उ एवैनमसाधु कर्म कारयति तं यमधो निनीषते । एष लोकपालः । एष लोकाधिपतिः । एष सर्वेशः । स म आत्मेति विद्यात्स म आत्मेति विद्यात् ॥८॥ इति तृतीयोऽध्यायः ॥

वाचा जाणण्याची इच्छा करूं नये, वक्ता जाणावा. गंध जाणण्याची इच्छा करूं नये, घ्राता जाणावा. रूप जाणण्याची इच्छा करूं नये, द्रष्टा जाणावा. शब्द जाणण्याची इच्छा करूं नये, श्रोता जाणावा. अन्नरस जाणण्याची इच्छा करूं नये, अन्नरस जाणणारा जाणावा. कर्म जाणण्याची इच्छा करूं नये, कर्ता जाणावा. सुखदुःख जाणण्याची इच्छा करूं नये, सुखदुःख जाणणारा जाणावा. आनंद—रति—प्रजाति जाणण्याची इच्छा करूं नये, आनंद—रति—प्रजाति जाणणारा जाणावा. गमन जाणण्याची इच्छा करूं नये, गमन करणारा जाणावा. मन ह्मणजे विचार जाणण्याची इच्छा करूं नये, विचारकर्ता जाणावा.

खरोखर त्या या दहा भूतमात्रा प्रज्ञेमध्यें स्थित आहेत, आणि दहा प्रज्ञामात्रा भूतांमध्यें स्थित आहेत. जर भूतमात्रा नसतील तर प्रज्ञामात्रा नसणार, आणि जर प्रज्ञामात्रा नसतील तर भूतमात्रा नसणार. कारण दोहोंपैकीं एकापासून कोणतेंहि रूप सिद्ध होत नाहीं.

आणि (असें असून) या दोहोंमध्यें भिन्नत्व नाहीं. ज्याप्रमाणें रथचक्राची नेमि अरांमध्यें स्थित असते, आणि अरा नाभीमध्यें

स्थित असतात, त्याचप्रमाणें या भूतमात्रा प्रज्ञामात्रांमध्यें स्थित आहेत आणि प्रज्ञामात्रा प्राणांमध्यें स्थित आहेत. तो हा प्राणच प्रज्ञात्मा. तो आनंद, अजर व अमर आहे. तो चांगल्या कर्मानें वाढत नाहीं, वाईट कर्मानें कमी होत नाहीं. ज्याला या लोकांमधून वर नेण्याची त्याची इच्छा होईल त्याजकडून तोच चांगलीं कर्में करवितो! ज्याला खालीं नेण्याची त्याची इच्छा होईल त्याजकडून तोच वाईट कर्में करवितो. तोच लोकांचा पालनकर्ता, तोच लोकांचा स्वामी, तोच सर्वांचा स्वामी. तोच माझा आत्मा असें जाणावें, तोच माझा आत्मा असें जाणावें. ८.

दश मात्राः=शरीर व सुखदुःख यांचे जागीं अनुक्रमें त्वचा व स्पर्श समजावीं; आणि मनाचा अंतर्भाव सर्व इंद्रियांमध्यें करावा. अशा प्रकारें दहा संख्या समजावी. रथस्य=रथचक्रस्य.

---

अथ चतुर्थोऽध्यायः ।

## अध्याय चवथा—ब्रह्मज्ञान.

१. बालाकि अजातशत्रूकडे येतो—

अथ ह गार्ग्यो वै बालाकिरनूचानः संस्पृष्ट आस । सोऽवसदुशीनरेषु । स वसन्मत्स्येषु कुरुपंचालेषु काशिविदेहेष्विति स हाजातशत्रुं काश्यमेत्योवाच । ब्रह्म ते ब्रवाणीति । तं होवाचाजातशत्रुः । सहस्रं दद्मस्त इति, एतस्यां वाचि जनको जनक इति वा उ जना धावन्तीति ।१॥

गार्ग्यगोत्री बालाकि वेदवेत्ता ह्मणून प्रसिद्धि पावला होता. तो उशीनर देशांत रहात असे. तेथून फिरत फिरत मत्स्य, कुरु, पंचाल, काशी, विदेह, इत्यादि देशांतून काशीचा राजा अजातशत्रु याजकडे

येऊन त्याला म्हणाला "मी तुला ब्रह्म सांगतों." अजातशत्रु त्याला म्हणाला— "मी तुला या शब्दांबद्दलच एक हजार गाई देतों. या शब्दांकरितांच (म्हणजे सांगण्याकरितां व जाणण्याकरितां) लोक जनक, जनक, असें म्हणत (मजकडे) धावत येतात." १.

२—९. ब्रह्माची देवताविषयक उपासना—

स होवाच बालाकिर्य एवैष आदित्ये पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । बृहन्पांडरवासाः अतिष्ठाः सर्वेषां भूतानां मूर्धेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्तेऽतिष्ठाः सर्वेषां भूतानां मूर्धा भवति ॥२॥

स होवाच बालाकिर्य एवैष चंद्रमसि पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । सोमो राजाऽन्नस्याऽऽत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्तेऽन्नस्याऽऽत्मा भवति ॥३॥

स होवाच बालाकिर्य एवैष विद्युति पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । तेजस आत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते तेजस आत्मा भवति ॥४॥

स होवाच बालाकिर्य एवैष स्तनयित्नौ पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । शब्दस्याऽऽत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते शब्दस्याऽऽत्मा भवति ॥५॥

स होवाच बालाकिर्य एवैष वायौ पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । इंद्रो वैकुंठोऽपराजिता सेनेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते ।जिष्णुर्ह वा । अपराजयिष्णुः। अन्यतस्त्यजायी भवति ॥६॥

स होवाच बालाकिर्य एवैष आकाशे पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । पूर्णमप्रवर्ति ब्रह्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते पूर्यते प्रजया पशुभिर्यशसा ब्रह्मवर्चसेन स्वर्गेण लोकेन सर्वमायुरेति । नो एव स्वयं नास्य प्रजा पुरा कालात्प्रवर्तते ॥७॥

स होवाच बालाकिर्य एवैषोऽग्नौ पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । विषासहिरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते विषासहिर्ह वा अन्येषु भवति ॥८॥

स होवाच बालाकिर्य एवैषोऽप्सु पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । नाम्न आत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते नाम्न आत्मा भवतीत्यधिदैवतम् ॥९॥

तो बालाकि म्हणाला—जो हा या आदित्यामध्यें पुरुष [=पुरुषाकार चैतन्य] आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. मोठा, पांढऱ्या वस्त्रांनीं युक्त, सर्वश्रेष्ठ आणि सर्व भूतांचा अधिपति अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची हा प्रकारें उपासना करतो तो सर्वश्रेष्ठ आणि सर्व भूतांचा अधिपति होतो. २.

तो बालाकि म्हणाला—जो हा या चंद्रामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. सोम राजा आणि अन्नाचा आत्मा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो अन्नाचा आत्मा होतो. ३.

तो बालाकि म्हणाला— जो हा या विजेमध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. तेजाचा आत्मा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो तेजाचा आत्मा होतो. ४.

तो बालाकि म्हणाला—जो हा या मेघगर्जनेमध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. शब्दाचा आत्मा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो शब्दाचा आत्मा होतो. ५.

तो बालाकि म्हणाला—जो हा या वायूमध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. इंद्र, वैकुंठ, पराजय न पावलेली सेना अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो जयनशील, पराजयरहित आणि शत्रूंवर जय मिळविणारा होतो. ६.

अन्यतस्त्यजायी=अन्यतस्त्यः=अन्यतो भवः= वैरी, तज्जयलक्षणं शीलं अस्य । म्हणजे शत्रूंवर नेहमीं जय मिळविणारा.

तो बालाकि म्हणाला—जो हा या आकाशामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. पूर्ण निष्क्रिय ब्रह्म अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो संतति, पशु, यश, ब्रह्मतेज आणि स्वर्गलोक यांनीं युक्त होतो आणि पूर्ण आयुष्य पावतो. तो स्वतः किंवा त्याची संतति योग्य काळापूर्वी मरण पावत नाहीं. ७.

तो बालाकि म्हणाला—जो हा या अग्नीमध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें

मला संभाषण करण्यास लावूं नकोस. विविध सहन करणारा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो इतरांमध्यें सर्व सहन करणारा होतो. ८.

तो बालाकि म्हणाला—जो हा या उदकामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. नामाचा आत्मा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो नामाचा आत्मा होतो. याप्रमाणें देवताविषयक उपासना सांगितली. ९.

१०—१७. ब्रह्माची आत्मविषयक उपासना—

अथाध्यात्मम् । स होवाच बालाकिर्य एवैष आदर्शे पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । प्रतिरूप इति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते प्रतिरूपो हैवास्य प्रजायामाजायते नाप्रतिरूपः ॥१०॥

स होवाच बालाकिर्य एवैष प्रतिश्रुत्कायां पुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । द्वितीयोऽनपग इति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते विंदते द्वितीयात् द्वितीयवान्भवति ॥११॥

स होवाच बालाकिर्य एवैष शब्दः पुरुषमन्वेति तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । असुरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते नो एव स्वयं नास्य प्रजा पुरा कालात्संमोहमेति ॥१२॥

स होवाच बालाकिर्य एवैष च्छायापुरुषस्तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । मृत्युरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते नो एव स्वयं नास्य प्रजा पुरा कालात्प्रमीयते ॥१३॥

स हावाच बालाकिर्य एवैष शारीरः पुरुषस्तमेवाहमुपास इति। तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । प्रजापतिरिति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते प्रजायते प्रजया पशुभिः॥१४॥

स होवाच बालाकिर्य एवैष प्राज्ञ आत्मा येनैतत्पुरुषः सुप्तः स्वप्न्यया चरति तमेवाहमुपास इति । तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । यमो राजेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते सर्वं हास्मा इदं श्रैष्ठ्याय यम्यते ॥१५॥

स होवाच बालाकिर्य एवैष दक्षिणेऽक्षन्पुरुषस्तमेवाहमुपास इति। तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । नाम्न आत्माऽग्नेरात्मा ज्योतिष आत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्ते एतेषां सर्वेषामात्मा भवति ॥१६॥

स होवाच बालाकिर्य एवैष सव्येऽक्षन्पुरुषस्तमेवाहमुपास इति। तं होवाचाजातशत्रुर्मा मैतस्मिन्संवादयिष्ठाः । सत्यस्याऽऽत्मा विद्युत आत्मा तेजस आत्मेति वा अहमेतमुपास इति । स यो हैतमेवमुपास्त एतेषां सर्वेषामात्मा भवतीति ॥१७॥

आतां आत्मविषयक उपासना सांगतात— तो बालाकि ह्मणाला—जो हा या आरशामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु ह्मणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. प्रतिरूप अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची याप्रकारें उपासना करतो त्याचें प्रतिरूपच त्याच्या संततीमध्यें उत्पन्न होतें, अप्रतिरूप होत नाहीं. १०.

तो बालाकि ह्मणाला— जो हा या प्रतिध्वनीमध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु ह्मणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. दुसरा आणि गमनरहित अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची

या प्रकारें उपासना करतो त्याला दुसऱ्यापासून प्राप्ति होते. द्वितीयांनीं ह्मणजे पुत्रपौत्रादिकांनीं तो युक्त होतो. ११.

तो बालाकि ह्मणाला— जो हा ध्वनि पुरुषाला [=पुरुष चालत असतां त्याला अनुसरतो त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. जीवनहेतु अशा प्रकारें मी याची उपसना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो स्वतः किंवा त्याची संतति योग्य काळापूर्वीं मरण पावत नाहीं. १२.

तो बालाकि म्हणाला — जो हा छायापुरुष आहे त्याचीच मी उपसना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. मृत्यु या रूपानें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तोस्वतः किंवा त्याची संतति योग्य काळापूर्वीं मरण पावत नाहीं. १३.

तो बालाकि म्हणाला—जो हा या शरीरामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. प्रजापति या रूपानें मी याची उपासना करतों. जो कोणी याची याप्रकारें उपासना करतो त्याची संतति आणि पशु वृद्धि पावतात. १४.

तो बालाकि म्हणाला — जो हा प्रज्ञेनें युक्त आत्मा आहे, ज्याच्या योगानें हा झोंपीं गेलेला असतांना स्वप्नानें संचार करतो, त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला—याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. यम राजा या रूपानें मी

याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो त्याच्या श्रेष्ठत्वाकरितां या सर्व जगतावर ताबा चालविला जातो. १५.

तो बालाकि म्हणाला—— जो हा उजव्या डोळयामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला——याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. नामाचा आत्मा, अग्नीचा आत्मा आणि प्रकाशाचा आत्मा अशा प्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो या सर्वांचा (म्हणजे नाम, अग्नि व प्रकाश यांचा) आत्मा होतो. १६.

तो बालाकि म्हणाला— जो हा डाव्या डोळयामध्यें पुरुष आहे त्याचीच मी उपासना करतों. त्याला अजातशत्रु म्हणाला— याच्या संबंधानें मला संभाषण करण्यास लावूं नकोस. सत्याचा आत्मा, विजेचा आत्मा आणि तेजाचा आत्मा अशाप्रकारें मी याची उपासना करतों. जो कोणी याची या प्रकारें उपासना करतो तो या सर्वांचा (म्हणजे सत्य, वीज आणि तेज यांचा) आत्मा होतो. १७.

१८ या पुरुषांचा कर्ता कोण——

तत उ ह बालाकिस्तूष्णीमास । तं होवाचाजातशत्रुः, एतावन्नु बालाका ३ इ इति । एतावद्धीति होवाच बालाकिः । तं होवाचाजातशत्रुर्मृषा वै किल मा समवादयिष्ठा ब्रह्म ते ब्रवाणीति । स यो वै बालाक एतेषां पुरुषाणां कर्ता यस्य वैतत्कर्म स वै वेदितव्य इति । तत उ ह बालाकिः समित्पाणिः प्रतिचक्रम उपायानीति । तं होवाचाजातशत्रुः प्रातिलोमरूपमेव तत्स्याद्यत्क्षत्रियो ब्राह्मणमुपनयेत् । एहि व्येव त्वा ज्ञपयिष्यामीति ॥

तं ह पाणावभिपद्य प्रवव्राज । तौ ह सुप्तं पुरुषमाजग्मतुस्तं हाजातशत्रुरामंत्रयांचक्रे, बृहन्पांडरवासः सोम राजन्निति । स उ ह

तूष्णीमेव शिश्ये। तत उ हैनं यष्ट्याऽऽविचिक्षेप, स तत एव समुत्तस्थौ। तं होवाचाजातशत्रुः। क्वैष एतद्बालाके पुरुषोऽशयिष्ट, क्वैतदभूत्, कुत एतदागाइदिति। तत उ ह बालाकिर्न विजज्ञे। तं होवाचाजातशत्रुर्यत्रैष एतद्बालाके पुरुषोऽशयिष्ट यत्रैतदभूद्यत एतदागादिति, हिता नाम हृदयस्य नाड्यो हृदयात्पुरीततमभिप्रतन्वन्ति, तद्यथा सहस्रधा केशो विपाटितस्तावदण्व्यः पिंगलस्याणिम्ना तिष्ठन्ति शुक्लस्य कृष्णस्य पीतस्य लोहितस्येति तासु तदा भवति। यदा सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति, तदेनं वाक्सर्वैर्नामभिः सहाप्येति, चक्षुः सर्वै रूपैः सहाप्येति, श्रोत्रं सर्वैः शब्दैः सहाप्येति, मनः सर्वैर्ध्यानैः सहाप्येति। स यदा प्रतिबुध्यते यथाऽग्नेर्ज्वलतः सर्वा दिशो विस्फुलिंगा विप्रतिष्ठेरन्नेवमेवैतस्मादात्मनः प्राणा यथायतनं विप्रतिष्ठन्ते प्राणेभ्यो देवा देवेभ्यो लोकाः ॥१८॥

यानंतर बालाकि स्तब्ध राहिला. त्याला अजातशत्रु म्हणाला—बालाके, एवढेंच का तुला ज्ञान आहे? बालाकि म्हणाला—होय एवढेंच. त्याला अजातशत्रु म्हणाला— 'मी तुला ब्रह्म सांगतो' असें म्हणून तूं मला उगीच संभाषण करावयास लावलेंस. हे बालाके, या (तूं सांगितलेल्या) आदित्यादि पुरुषांचा जो कर्ता, किंवा हें सर्व ज्यानें केलें, त्याचेंच ज्ञान करून घेतलें पाहिजे. तेव्हां बालाकि हातांत समिधा घेऊन अजातशत्रूपुढें येऊन म्हणाला, मी आपणांकडे (शिष्यभावानें) आलों आहें. त्याला अजातशत्रु म्हणाला—क्षत्रियानें ब्राह्मणाला शिष्य करावें हा उलट प्रकार होईल. असो. चल मी तुला पूर्ण ज्ञान करून देतों.

त्याचा हात धरून अजातशत्रु चालला. ते दोघे एका निद्रिस्त पुरुषाजवळ आले. त्याला अजातशत्रूनें हांक मारली, "अरे शुभवस्त्रा

सोमराजा!" पण तो स्तब्ध निद्रिस्तच राहिला. नंतर त्याला काठीनें मारलें. त्याबरोबर तो उठून उभा राहिला. तेव्हां अजातशत्रु बालाकीला म्हणाला— बालाके, "हा पुरुष (म्हणजे याचा आत्मा) कोठें निजला होता? हा कोठें गेला होता? हा आला कोठून?" हें बालाकीला समजलें नाहीं. त्याला अजातशत्रु म्हणाला— बालाके, हा पुरुष जेथें निजला होता, जेथें गेला होता आणि जेथून आला तें ऐक. हृदयामध्यें हिता नांवाच्या नाडी आहेत. हृदयापासून शरीरापर्यंत त्या पसरलेल्या आहेत. एक केस सहस्रांशानें फाडला असतां जितका सूक्ष्म होईल तितक्या सूक्ष्म, पिंगल, शुक्ल, कृष्ण, पिंवळा आणि तांबडा या रंगांच्या एका अति सूक्ष्म रसानें पूर्ण आहेत. जेव्हां मनुष्य कोणतेंहि स्वप्न पहात नाहीं अशा प्रकारें झोंपीं गेलेला असतो तेव्हां त्याच्यामध्यें प्राण एकवटित होतो. त्या वेळीं— वाचा सर्व नामांसह त्या प्राणामध्यें जाते, चक्षु सर्व रूपांसह त्याच्यामध्यें जातो, श्रोत्र सर्व शब्दांसह त्याच्यामध्यें जातें, मन सर्व विचारांसह त्याच्यामध्यें जातें. तो जेव्हां जागा होतो तेव्हां—ज्याप्रमाणें ज्वलन पावणाऱ्या अग्नीमधून सर्व दिशांकडे ठिणग्या उडतात त्याप्रमाणेंच— या आत्म्यापासून सूक्ष्म इंद्रियें आपापल्या स्थानीं जातात, सूक्ष्म इंद्रियांपासून इंद्रियशक्ति बाहेर पडतात व त्यांपासून (शब्द, रूप इत्यादि) विषय निघतात. १८.

१९. प्राण म्हणजेच प्रज्ञात्मा—

स एष प्राण एव प्रज्ञात्मेदं शरीरमात्मानमनुप्रविष्ट आ लोमभ्य आ नखेभ्यः। तद्यथा क्षुरः क्षुरधानेऽवाहितः स्यात्, विश्वंभरो वा विश्वंभरकुलाय, एवमेवैष प्रज्ञ आत्मेदं शरीरमात्मानमनुप्रविष्टः। आ लोमभ्य आ नखेभ्यः। तमेतमात्मानमेत आत्मनोऽन्ववस्यन्ति

यथा श्रेष्ठिनं स्वाः। तद्यथा श्रेष्ठी स्वैर्भुंक्ते यथा वा स्वाः श्रेष्ठिनं भुंजन्त्येवमेवैष प्रज्ञात्मैतैरात्मभिर्भुंक्ते। एवं वै तमात्मानमेत आत्मानो भुंजन्ति ॥

स यावद्ध वा इंद्र तमात्मानं न विजज्ञे तावदेनमसुरा अभिबभूवुः। स यदा विजज्ञेऽथ हत्वाऽसुरान्विजित्य सर्वेषां देवानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्यं परीयाय। तथो एवैवं विद्वान्सर्वान्पाप्मनोऽपहत्य सर्वेषां भूतानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्यं पर्येति, य एवं वेद, य एवं वेद ॥१९॥ इति चतुर्थोऽध्यायः ॥

ॐ वाङ्मे मनसीति शान्तिः ॥

तो हा प्राण म्हणजेच प्रज्ञात्मा या शरीरामध्यें स्वस्वरूपानें सर्वत्र केसांपर्यंत व नखांपर्यंत प्रविष्ट झालेला आहे. ज्याप्रमाणें वस्तरा वस्तऱ्याच्या झांकणांत (सर्व जागा व्यापून) बसतो, किंवा अग्निकुंडांत अग्नि (सर्व जागा व्यापून) बसतो, त्याप्रमाणें हा प्रज्ञात्मा या शरीरांत स्वस्वरूपानें केसांपर्यंत व नखांपर्यंत सर्वत्र प्रविष्ट झालेला आहे. ज्याप्रमाणें घराच्या स्वामीच्या तंत्रानें त्याचीं माणसें वागतात, त्याप्रमाणें या आत्म्याच्या तंत्रानें इतर सर्व इंद्रियें वागतात. ज्याप्रमाणें धनी आपल्या माणसांसहवर्तमान भोजन करतो आणि ज्याप्रमाणें तीं माणसें त्याचेंच अन्न खातात, त्याप्रमाणें हा प्रज्ञात्मा त्या आत्म्यांसह (म्हणजे इंद्रियांसह) भोग भोगतो आणि इंद्रियें त्याच्याकरितांच भोग भोगतात.

जोंपर्यंत इंद्राला या आत्म्याचें ज्ञान झालें नव्हतें, तोंपर्यंत त्याला असुरांनीं पराजित केलें. जेव्हां त्याला ज्ञान झालें तेव्हां असुरांना मारून व त्यांच्यावर जय मिळवून सर्व देवांचें श्रेष्ठत्व, निरंकुश

राज्य आणि स्वामित्व हीं त्यानें पूर्णत्वानें मिळविलीं. त्याचप्रमाणें ज्याला हें ज्ञान होतें तो सर्व पापांना मारून सर्व भूतांचें श्रेष्ठत्व, निरंकुश राज्य आणि स्वामित्व पूर्णत्वानें मिळवितो. १९.

इति ऋग्वेदीया कौषीतकिब्राह्मणोपनिषत्समाप्ता ॥

---

# जाबालोपनिषत्।

---:०:---

हें लहानसें उपनिषत् अथर्ववेदापैकीं असून सर्वस्वीं संन्यासपर आहे. शंकराचार्य आपल्या प्रस्थानत्रयावरील भाष्यांत ज्या १४ उपनिषदांचा आधार देत असतात त्यांपैकीं हें एक असल्यामुळें याचा आम्हीं या भागांत संग्रह केला आहे. मिथिला नगरीच्या शेजारीं उपवनांत जनक राजा व इतर मुनि यांच्यासह याज्ञवल्क्य वेदान्तचर्चा करीत बसले असतां त्यांच्या प्रश्नावरून याज्ञवल्क्यांनीं हें उपनिषत् सांगितलें अशी आख्यायिका आहे. या उपनिषदाच्या नांवावरून छांदोग्यांतल्या सत्यकाम जाबालाशीं याचा संबंध असावा अशी कल्पना होते; परंतु त्या जाबालाचें यांत नांव नाहीं मग याला जाबालोपनिषत् हें नांव कसें पडलें समजत नाहीं. "किं जपेनामृतत्वं नो ब्रूहीत्युक्तो मुनिर्जगौ। शतरुद्रीयकेणेति जाबाला आमनन्ति तत्॥" या सायणाचार्यांच्या वचनावरून यजुर्वेदाच्या जाबाल शाखेचें हें उपनिषत् असावें. शंकराचार्यांनीं ज्या१४उपनिषदांतलीं वचनें आधाराला घेतलीं आहेत त्यांपैकीं हें एक असल्यामुळें त्यांच्या प्रमाणेंच हें प्राचीन असावें अशी कल्पना साहजिक होते. पण यांत ऋभु, निदाघ, जडभरत, दत्तात्रेय वगैरे पुराणांतील व्यक्तींचा उल्लेख असल्यामुळें हें उपनिषत् प्राचीन उपनिषदांपैकीं नव्हे असें दिसतें. शंकराचार्यांना उपलब्ध असलेलें जाबालोनिषत् या जाबालोपनिषदाहून निराळें असण्याचाहि संभव आहे.

---

१. अविमुक्त क्षेत्राचें माहात्म्य—

ॐ भद्रं कर्णेभिरिति शान्तिः ॥

**बृहस्पतिरुवाच याज्ञवल्क्यं, यदनु कुरुक्षेत्रं देवानां देवयजनं सर्वेषां भूतानां ब्रह्मसदनम्। अविमुक्तं वै कुरुक्षेत्रं देवानां देवयजनं सर्वेषां भूतानां ब्रह्मसदनम्। तस्माद्यत्र क्वचन गच्छति तदेव मन्येतेतीदं वै कुरुक्षेत्रं देवानां देवयजनं सर्वेषां भूतानां**

**ब्रह्मसदनम्। अत्र हि जंतोः प्राणेषूत्क्रममाणेषु रुद्रस्तारकं ब्रह्म व्याचष्टे येनासावमृती भूत्वा मोक्षी भवति, तस्मादविमुक्तमेव निषेवेताविमुक्तं न विमुंचेदेवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥१॥**

याज्ञवल्क्याला बृहस्पतीनें विचारलें— देवांच्या यजनाचें स्थान म्हणून देवांमध्यें प्रसिद्ध असलेलें व ब्रह्माचें स्थान म्हणून सर्व प्राण्यांमध्यें प्रसिद्ध असलेलें कुरुक्षेत्र तें कोणतें? याज्ञवल्क्य म्हणाला —देवांचें देवयजनस्थान व सर्व प्राण्यांचें ब्रह्मसदन वाराणसी क्षेत्र हें होय. म्हणून मनुष्य ज्या कोणत्याहि ठिकाणीं जातो तेथें हेंच देवांचें देवयजनस्थान व सर्व प्राण्यांचें ब्रह्मसदन असें कुरुक्षेत्र आहे असें मानावें. या कुरुक्षेत्रामध्यें मनुष्याचा प्राण जाऊं लागला असतां रुद्र त्याला संसारसमुद्र तरण्याचें साधन असें ब्रह्म शिकवितो. त्या ब्रह्माच्या ज्ञानानें हा मनुष्य मृत्यूच्या पार जाऊन मोक्ष मिळवितो. ह्मणून अविमुक्त क्षेत्रामध्यें वास करावा, अविमुक्त सोडून जाऊं नये. बृहस्पति ह्मणाला, याज्ञवल्क्या, बरोबर आहे. १.

'अविमुक्त' हें वाराणसी क्षेत्राचें एक नांव आहे. कैवल्योपनिषत् २.१वरील टीप पहा.

२. योगदृष्ट्या कूर्च हें अविमुक्त व तेथें आत्म्याची उपासना—

**अथ हैनमत्रिः पप्रच्छ याज्ञवल्क्यं, य एषोऽनंतोऽव्यक्त आत्मा तं कथमहं विजानीयामिति। स होवाच याज्ञवल्क्यः। सोऽविमुक्त उपास्यो य एषोऽनंतोऽव्यक्त आत्मा, सोऽविमुक्ते प्रतिष्ठित इति। सोऽविमुक्तः कस्मिन्प्रतिष्ठित इति, वरणायां नास्यां च मध्ये प्रतिष्ठित इति। का वै वरणा का च नासीति,**

**सर्वानिंद्रियकृतान्दोषान्वारयतीति तेन वरणा भवति, सर्वानिंद्रियकृतान्पापान्नाशयति तेन नासी भवतीति । कतमच्चास्य स्थानं भवतीति, भ्रुवोर्घ्राणस्य च यः संधिः, स एष द्यौर्लोकस्य परस्य च संधिर्भवतीत्येतद्वै संधिं संध्यां ब्रह्मविद उपासत इति। सोऽविमुक्त उपास्य इति सोऽविमुक्तं ज्ञानमाचष्टे यो वै तदेतदेवं वेदेति ॥२॥**

नंतर त्या याज्ञवल्क्याला अत्रीनें विचारलें—— जो हा अनंत व अव्यक्त आत्मा त्याला मी कसा जाणूं? तो याज्ञवल्क्य म्हणाला—— जो हा अनंत व अव्यक्त आत्मा त्याची अविमुक्तामध्यें उपासना करावी. तो अविमुक्तामध्यें स्थित आहे. तें अविमुक्त कशामध्यें स्थित आहे? तर वरणा आणि नासी यांच्या मध्यें स्थित आहे. वरणा कोणती आणि नासी कोणती? इंद्रियांनीं केलेल्या सर्व दोषांचें 'वारण' करतें म्हणून 'वरणा' आणि इंद्रियांनीं केलेल्या सर्व पापांचा 'नाश' करते म्हणून 'नासी.' या अविमुक्ताचें स्थान कोणतें? भुवया आणि घ्राण यांचा जो संधि तें याचें स्थान. हा स्वर्गलोक आणि परलोक यांचा संधि होय. ब्रह्मवेत्ते या संधीची संध्या म्हणून उपासना करतात. या अविमुक्ताची उपासना करावी. हें अविमुक्त क्षेत्र जो या प्रकारें जाणतो तो अविमुक्त ज्ञान (शिष्यांना) सांगतो. २.

लौकिकदृष्ट्या अविमुक्त क्षेत्र सांगितल्यावर योगदृष्ट्या सांगितलें आहे. दोन भुवया आणि नासिकेचें मूल या तिघांचें जें संधिस्थान तें अविमुक्त क्षेत्र. याला योगशास्त्रांत 'कूर्च' म्हणतात. अतल, वितल इत्यादि चवदा भुवनें मनुष्याच्या शरीरांतच आहेत अशी कल्पना गरुडपुराणांत वर्णन केली आहे. नासिका हा स्वर्गलोक व कपाळ हा परलोक म्हणजे सत्यलोक असें या उप-

निषदांत म्हटलें आहे. दोन लोकांचा संधि तें अविमुक्त. या संधीची उपासना करणाराला नेहमींची लौकिक संध्या नको. 'वरणा' आणि 'असी' या दोन नद्यांच्या समीप काशीक्षेत्र आहे म्हणून त्याला 'वाराणसी' म्हणतात.

३. शतरुद्रिय जप—

**अथ हैनं ब्रह्मचारिण ऊचुः किं जाप्येनामृतत्वं ब्रूहीति । स होवाच याज्ञवल्क्यः शतरुद्रियेणेति । एतानि ह वा अमृतनामधेयान्येतैर्ह वा अमृतो भवतीत्येवमेवैतद्याज्ञवल्क्य ॥३॥**

नंतर त्याला ब्रह्मचारी म्हणाले—जप करण्यास योग्य अशा कोणत्या जपानें मोक्षाची प्राप्ति होते तें सांग. तो याज्ञवल्क्य म्हणाला—शतरुद्रियानें. हीं (शतरुद्रियांत सांगितलेलीं) मोक्षाचीं नांवें आहेत. यांच्या योगानें मनुष्य मरणरहित होतो. याज्ञवल्क्या, बरोबर आहे. ३.

शतरुद्रिय म्हणजे यजुर्वेदांतर्गत रुद्राध्याय. रुद्र, नीलसूक्त आणि त्यांतल्याच कांहीं ऋचांची पुनरावृत्ति मिळून शंभर ऋचांचें हें रुद्रजाप्य आहे नारायणकृत दीपिकेमध्यें 'द्रोणपर्व पठतां वा स्तोत्रं' असें लिहिलें असून या उपनिषदांतील शतरुद्रिय म्हणजे महाभारतांत द्रोणपर्वाच्या अखेरीस जें शतरुद्रियस्तोत्र आहे तें घेतलें तरी चालेल असें दर्शविलें आहे. पण ही चूक असावी. उपनिषदांत रुद्राध्यायच अभिप्रेत असावा.

४—६. संन्यासप्रशंसा—

**अथ हैनं जनको ह वैदेहो याज्ञवल्क्यमुपसमेत्योवाच भगवन्संन्यासमनुब्रूहीति । स होवाच याज्ञवल्क्यो, ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृही भूत्वा वनी भवेद्वनी भूत्वा प्रव्रजेद्यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा । अथ पुनरव्रती वा व्रती वा स्नातको वाऽस्नातको वोत्सन्नाग्निरनाग्निको वा**

यदहरेव विरजेत्तदहरेव प्रव्रजेत् । तद्धैके प्राजापत्यामेवेष्टिं कुर्वन्ति । तदु तथा न कुर्यादाग्नेयीमेव कुर्यादग्निर्हि वै प्राणः । प्राणमेवैतया करोति । पश्चात्त्रैधातवीयामेव कुर्यादेतयैव त्रयो धातवो यदुत सत्त्वं रजस्तम इति । अयं ते योनिर्ऋत्वियो यतो जातो अरोचथाः । तं जानन्नग्न आरोहाथानो वर्धया रयिमित्यनेन मंत्रेणाग्निमाजिघ्रेत् । एष वा अग्नेर्योनिर्यः प्राणः प्राणं गच्छ स्वाहेत्येवमेवैतदाह । ग्रामादग्निमाहृत्य पूर्ववदग्निमाघ्रापयेद्यद्यग्निं न विंदेदप्सु जुहुयादापो वै सर्वा देवताः । ॐ सर्वाभ्यो देवताभ्यो जुहोमि स्वाहेति हुत्वा समुद्धृत्य प्राश्नीयात्साज्यं हविरनामयं मोक्षमंत्रस्त्रय्येवं विंदेत्तद्ब्रह्मैतदुपासितव्यमेवमेवैतद्भगवन्निति वै याज्ञवल्क्यः ॥४॥

नंतर विदेहराज जनक याज्ञवल्क्याजवळ येऊन म्हणाला—हे भगवन्! संन्यासासंबंधानें सांगा. तो याज्ञवल्क्य म्हणाला—ब्रह्मचर्याश्रम पुरा झाल्यावर गृहस्थाश्रम घ्यावा. गृहस्थाश्रम झाल्यावर वानप्रस्थाश्रम घ्यावा. वानप्रस्थाश्रम झाल्यावर संन्यास घ्यावा. किंवा इतर प्रकारें ब्रह्मचर्याश्रम झाल्याबरोबर संन्यास घ्यावा; किंवा गृहस्थाश्रम चालू असतांनाहि घ्यावा; किंवा वानप्रस्थाश्रम चालू असतांनाहि घ्यावा. तसेंच व्रत घेतलेला असो वा अव्रती असो; विद्याध्ययनसमाप्तीचें स्नान केलेला असो वा नसो, भार्या मरण पावलेला असो वा अग्निहोत्र घेतलेला नसो, ज्या दिवशीं वैराग्य होईल त्याच दिवशीं संन्यास घ्यावा. संन्यास घेण्याच्या वेळीं कोणी प्रजापति देवतेच्या उद्देशानें इष्टि करतात. तशी न करतां अग्नीच्याच उद्देशानें करावी.

कारण अग्नि हाच प्राण. म्हणजे या दृष्टीनें प्राणाचीच इष्टि होतो. नंतर त्रैधातवीया इष्टि करावी. या इष्टीनें सत्त्व, रज व तम असे तीन धातु वृद्धि पावतात. "अयं ते योनिर्ऋत्वियो०" या मंत्रानें अग्निरूपी प्राणाचें आघ्राण करावें. हा जो प्राण तोच अग्नीचें आदि-कारण. म्हणून "प्राणं गच्छ स्वाहा" असें म्हणून प्राणाला आहुति देतात. गांवांतून अग्नि आणून पूर्वीप्रमाणेंच अग्नीचें आघ्राण कर-वावें. अग्नि न मिळेल तर उदकामध्यें आहुति द्यावी. कारण उदक सर्व देवता होत. "सर्वाभ्यो देवताभ्यो जुहोमि स्वाहा" असें म्हणून आहुति देऊन शेष राहील तो आज्ययुक्त हवि भक्षण करावा. दोषशून्य व मोक्षाचा साधक असा हा संन्यास त्रयीविद्येनें "हें ब्रह्मच केवळ उपासनेला योग्य आहे" अशा प्रकारें प्राप्त करून घ्यावा [=ब्रह्मज्ञान हेंच वेदत्रयाचें सार होय व त्याच्या प्राप्तीकरितां संन्यासच घ्यावा]. जनक म्हणाला, याज्ञवल्क्या, हें सर्व आपण सांगितलेलें असेंच ना? याज्ञवल्क्य म्हणाला, होय असेंच.४.

प्रजापतिदेवतात्मक व अग्निदेवतात्मक इष्टींविषयीं याज्ञवल्क्यस्मृतींत पुढील वचन आहे— "वनाद्गृहाद्वा कृत्वेष्टिं सर्वस्वं वेददक्षिणाम्। प्राजापत्यां तदंते तानग्नीनारोप्य चात्मनि ॥" त्रैधातवीया इष्टि इंद्रदेवतात्मक आहे. "अयं ते योनिर्ऋत्वियो० या मंत्राचा अर्थ— "हे अग्ने, हा प्राण तुझें उत्पत्तिस्थान आहे. याचे ठिकाणीं जन्म पावून तूं वर्धमान होतोस. या प्राणाला जाणून तूं माझ्या प्राणावर आरोहण कर (म्ह० माझ्या प्राणामध्यें प्रविष्ट हो). आमचें धन वाढव."

**अथ हैनमत्रिः पप्रच्छ याज्ञवल्क्यम्। पृच्छामि त्वा याज्ञ-वल्क्यायज्ञोपवीती कथं ब्राह्मण इति। स होवाच याज्ञवल्क्यः। इदमेवास्य तद्यज्ञोपवीतं य आत्मा। प्राश्याऽऽचम्यायं विधिः**

**परिव्राजकानां, वीराध्वाने वाऽनाशके वाऽपां प्रवेशे वाऽग्नि-प्रवेशे वा महाप्रस्थाने वा। अथ परिव्राड्विवर्णवासा मुंडोऽप-रिग्रहः शुचिरद्रोही भैक्षाणो ब्रह्मभूयाय भवति। यद्यातुरः स्यान्मनसा वाचा वा संन्यसेत्। एष पंथा ब्रह्मणा हानुवि-त्तस्तेनैति संन्यासी ब्रह्मविदित्येवमेवैष भगवन्निति वै याज्ञवल्क्यः ॥५॥**

नंतर त्या याज्ञवल्क्याला अत्रीनें विचारलें–याज्ञवल्क्या, मी विचारतों, (संन्यास घेऊन) तो यज्ञोपवीत टाकल्यावर त्याला ब्राह्मण कसें म्हणावें ?

तो याज्ञवल्क्य म्हणाला—हा जो आत्मा तोच त्याचें यज्ञोपवीत. उदक प्राशन व आचमन करून संन्यास घेतेवेळीं वर सांगितलेला विधि करावा. तसेंच वीरोचित मार्ग, अनाशक, उदकप्रवेश, अग्नि-प्रवेश आणि महाप्रस्थान या पांच प्रसंगीं देखील हाच (प्राणाच्या आहुतीचा) विधि करावा. आतां (गेरू इत्यादीनें) ज्याचा वर्ण बद-लला आहे असें वस्त्र धारण करणारा, मुंडन केलेला, एकटा रहाणारा, कायेनें व मनानें शुचिर्भूत, कोणाचाहि द्रोह न करणारा आणि भिक्षा मागून खाणारा असा जो संन्यासी असतो तोच ब्रह्मरूप होतो. जर आजारी असेल (व वैराग्य होईल) तर मनानें आणि वाचेनें संन्यास घ्यावा. हा ब्रह्मदेवानें उपदेशलेला मार्ग आहे. ब्रह्मवेत्ता संन्यासी या मार्गानें ब्रह्मरूप होतो. भगवन् हें असेंच ना ? याज्ञव-ल्क्य म्हणाला, होय. ५.

वीराध्वानः—[यांत 'अध्वान' असा शब्द आहे]= संग्रामांत परत न फिरण्याचा निश्चय करून जाणें; किंवा स्त्री–बाल–अनाथ इत्यादिकांच्या संरक्ष-

णार्थ उडी घालणें. अनाशकं=अन्न व उदक घेणें बंद करून जीव घालविणें. अपां-प्रवेशः=गंगेमध्यें अथवा प्रयागादि क्षेत्रांत पाण्यांत उडी घालून जीव देणें. महा-प्रस्थानं=हिमालयावर किंवा इतरत्र रानावनांत मरण येईपर्यंत संचार करीत रहाणें. जे असाध्य व्याधींनीं ग्रस्त आहेत, किंवा अतिघोर पापाचें ज्यांनीं आ-चरण केलें आहे अशांनीं — मग ते कोणत्याहि वर्णाचे असोत, पुरुष अथवा स्त्री — देहाचा नाश समीप दिसला म्हणजे अग्निप्रवेश करावा, किंवा उपवासानें मरण आणावें किंवा मोठ्या पाण्यांत उडी घ्यावी, किंवा उंच पर्वतावरून उडी घ्यावी, किंवा हिमालयावर महाप्रस्थान करावें, किंवा प्रयाग येथील वटवृक्षाच्या उंच फांदीवरून उडी घ्यावी; म्हणजे त्यांना उत्तम लोक प्राप्त होतो, असें आदित्यपुराणामध्यें सांगितलें आहे.

तत्र परमहंसा नाम संवर्तकारुणिश्वेतकेतुदुर्वासऋभुनिदाघ-जडभरतदत्तात्रेयरैवतकप्रभृतयोऽव्यक्तलिंगा अव्यक्ताचारा अनुन्मत्ता उन्मत्तवदाचरन्तस्त्रिदंडं कमंडलुं शिक्यं पात्रं जल-पवित्रं शिखां यज्ञोपवीतं चेत्येतत्सर्वं भूः स्वाहेत्यप्सु परित्य-ज्याऽऽत्मानमन्विच्छेत् । यथा जातरूपधरो निर्द्वंद्वो निष्परि-ग्रहस्तत्त्वब्रह्ममार्गे सम्यक्संपन्नः शुद्धमानसोऽविमुक्तः प्राणसं-धारणार्थं यथोक्तकाले भैक्षमाचरन्नुदरपात्रेण लाभालाभौ समौ भूत्वा । शून्यागारदेवगृहतृणकूटवल्मीकवृक्षमूलकुलाल-शालाग्निहोत्रगृहनदीपुलिनगिरिकुहरकंदरकोटरनिर्झरस्थंडिले-ष्वनिकेतवासी अप्रयत्नो निर्ममः शुक्लध्यानपरायणोऽध्यात्म-निष्ठोऽशुभकर्मनिर्मूलनपरः संन्यासेन देहत्यागं करोति स परमहंसो नाम स परमहंसो नामेति ॥६॥ इति शान्तिः ॥

आतां (याज्ञवल्क्य) परमहंसांचीं नांवें सांगतो. संवर्तक, आरुणि, श्वेतकेतु दुर्वास, ऋभु, निदाघ, जडभरत, दत्तात्रेय, रैवतक इत्यादि.

ब्रह्म हीच ज्यांची (यज्ञोपवीतासारखी) खूण, हाच ज्यांचा आचार, उन्मत्त नसून उन्मत्ताप्रमाणें आचरण करणारे, त्रिदंड, कमंडलु, पात्र ठेवण्याचा दर्भांचा आधार, भिक्षापात्र, ओलें वस्त्र, शेंडी, जानवें हीं सर्व "भूःस्वाहा" म्हणून उदकांत टाकून आत्मसाक्षात्काराचीच त्यांनीं इच्छा करावी. निर्वस्त्र, शीतोष्णादिद्वंद्वरहित, कोणताहि पसारा बरोबर नसलेला, तत्त्वरूपी ब्रह्माच्या ज्ञानानें संपन्न, शुद्धमानस, मी ईश्वर आहें अशी भावना अंतःकरणांत बाणलेला [अविमुक्त], प्राण जगविण्याकरितांच उक्तकालीं उदर हेंच पात्र समजून भिक्षा मागणारे, आणि लाभ व अलाभ यांचे ठिकाणीं समबुद्धि होऊन,—शून्यगृह, शून्य देवालय, गवताचा पुंजका, वारूळ, वृक्षमूळ, मातीचीं भांडीं करण्याचें स्थान, अग्निहोत्रगृह, नदीचा कांठ, पर्वताची गुहा, तेथील वेळूचीं बेटें, वृक्षाची ढोली, झरा, शुद्ध मोकळें एकान्तस्थळ, अशा ठिकाणीं रहाणारा पण कायमचा एका ठिकाणीं न रहाणारा [अनिकेतः], कांहीं मिळविण्याचा उद्योग न करणारा, प्रकाशरूप आत्म्याचें ध्यान करण्यांत निमग्न, अध्यात्मनिष्ठ, अशुभ कर्मांचा क्षय करण्याविषयीं तत्पर असा जो (मनुष्य) संन्यासानें देहत्याग करतो तो परमहंस होय. ६.

आरुणि व त्याचा पुत्र श्वेतकेतु हे छांदोग्य उपनिषदांत, ऋभु व निदाघ विष्णुपुराणांत, जडभरत भागवतांत, दत्तात्रेय मत्स्यपुराणांत व देवीभागवतांत प्रसिद्ध आहेत. दुर्वास महाभारतांत व इतरत्र कोपयुक्त मुनि म्हणून प्रसिद्ध आहेत, पण परमहंस म्हणून प्रसिद्ध नाहींत. संवर्तक आणि रैवतक हे परमहंस म्हणून प्रसिद्ध असलेले मला माहीत नाहींत.

## इति अथर्ववेदीया जाबालोपनिषत्समाप्ता ॥

---

# मैत्रायणीयोपनिषत्.

—:•:—

हें उपनिषत् कृष्णयजुर्वेदाच्या मैत्रायणीय शाखेचें आहे. मुख्य दहा उपनिषदांतलीं वचनें यांत आधाराला घेतल्याचा ठिकठिकाणीं स्पष्ट उल्लेख असल्यामुळें हें त्यांच्या नंतरचें आहे. विचारांचें महत्त्व आणि विस्तार हीं लक्षांत घेऊन याचा आम्हीं या भागांत संग्रह केला आहे. छांदस रूपें व छांदस संधि यामध्यें बरेच आढळतात. या उपनिषदावर रामतीर्थ स्वामींची टीका आहे. याला मैत्र्युपनिषत् किंवा मैत्रायण्युपनिषत् असेंहि म्हणतात.

---

## प्रपाठक पहिला.

### १—४ बृहद्रथ राजाची तपश्चर्या—संसाराचें नश्वरत्व—

ब्रह्मयज्ञो वा एष यत्पूर्वेषां चयनं, तस्माद्यजमानश्चित्वैतानग्नीनात्मानमभिध्यायेत् । स पूर्णः खलु वा अद्धाऽविकलः संपद्यते यज्ञः । कः सोऽभिध्येयोऽयं यः प्राणाख्यः । तस्योपव्याख्यानम् ॥१॥

पूर्वी (मैत्रायाणि संहितेमध्यें) जें अग्नीचें चयन वर्णिलें आहे तो खरोखर ब्रह्माचा यज्ञ होय. म्हणून यजमानानें त्या अग्नींचें चयन केल्यानंतर आत्म्याचें ध्यान करावें. असा यज्ञ खरोखर पूर्ण आणि अविकल होतो. ज्याचें ध्यान करावयाचें तो हा कोण? ज्याला प्राण म्हणतात तोच हा. त्याचें स्पष्टीकरण सांगतात १—

बृहद्रथो वै नाम राजा विराज्ये पुत्रं निधापयित्वा इदमशाश्वतं मन्यमानः शरीरं वैराग्यमुपेतोऽरण्यं निर्जगाम । स तत्र परमं तप आस्थायाऽऽदित्यमुदीक्षमाण ऊर्ध्वबाहुस्तिष्ठति । अंते सहस्राहस्य मुनेरंतिकमाजगामाग्निरिवाधूमकस्तेजसा निर्दहन्निवाऽऽत्मविद्

गवाञ्शाकायन्यः। उत्तिष्ठोत्तिष्ठ वरं वृणीष्वेति राजानमब्रवीत्। स तस्मै नमः कृत्वोवाच। भगवन्नाहमात्मवित्त्वं तत्त्वविच्छुश्रुमो वयं, स त्वं नो ब्रूहीति। एतद्वृत्तं पुरस्ताद्दुःशक्यमेतत्प्रश्नमैक्ष्वाक, अन्यान्कामान्वृणीष्वेति शाकायन्यः। शिरसाऽस्य चरणावभिमृशमानो राजेमां गाथां जगाद ॥२॥

बृहद्रथ नांवाचा राजा राज्याधिकाराचे ठिकाणीं आपल्या पुत्राची स्थापना करून, हें शरीर अशाश्वत आहे असें जाणून, वैराग्ययुक्त होत्साता, अरण्यांत गेला. तो तेथें उग्र तप आचरण करीत, सूर्याकडे पहात व हात वर करून उभा राहिला. एक हजार दिवस (याप्रमाणें) गेल्यावर, धूमरहित अग्नीप्रमाणें तेजानें जणूंकाय ज्वलन पावत आहेत असे आत्मवेत्ते भगवान् शाकायन्य मुनि, त्या मुनीच्या म्हणजे बृहद्रथाच्या जवळ आले. "ऊठ, ऊठ, वर माग" असें ते राजाला म्हणाले. तो त्यांना नमस्कार करून म्हणाला——हे भगवन् मला आत्म्याचें ज्ञान नाहीं. तुम्हांला त्याच्या तत्त्वाचें ज्ञान आहे असें आम्हीं ऐकलें आहे. ते तुम्ही आम्हांला सांगा." शाकायन्य म्हणाले "याचा निर्णय पूर्वकाळीं (ऋषींनीं) केलेला आहे. हे इक्ष्वाकुकुलोद्भवा राजा, हा प्रश्न (ऐकण्यास व सांगण्यास) कठिण आहे. तुझ्या दुसऱ्या कांहीं इच्छा असतील तर त्या माग. त्यांच्या चरणांना मस्तकानें स्पर्श करून राजा हे शब्द बोलला.२.

भगवन्नस्थिचर्मस्नायुमज्जमांसशुक्रशोणितश्लेष्माश्रुदूषिकाविण्मूत्रवातपित्तकफसंघाते दुर्गंधे निःसारेऽस्मिञ्शरीरे किं कामोपभोगैः। कामक्रोधलोभमोहभयविषादेर्ष्येष्टवियोगानिष्टसंप्रयोगक्षुत्पिपासाजरामृत्युरोगशोकाद्यैरभिहतेऽस्मिञ्शरीरे किं कामोपभोगैः ॥३॥

"हे भगवन् ! अस्थि, चर्म, स्नायु, मज्जा, मांस, शुक्र, शोणित, शेंबूड, अश्रु, डोळ्यांतील घाण, विष्ठा, मूत्र, वात, पित्त, कफ यांचा संघात, दुर्गंध व निःसार अशा या शरीरामध्यें कामोपभोग भोगण्याचा काय उपयोग? काम, क्रोध, लोभ, मोह, भय, विषाद, मत्सर, इष्ट माणसांचा वियोग, अनिष्ट माणसांशीं संयोग, भूक, तहान, जरा, मृत्यु, रोग, शोक इत्यादिकांनीं ग्रासलेल्या या शरीरामध्यें कामोपभोग भोगण्याचा काय उपयोग? ३.

सर्वं चेदं क्षयिष्णु पश्यामो यथेमे दंशमशकादयस्तृणवनस्पतयोद्भूतप्रध्वंसिनः । अथ किमेतैर्वा परेऽन्ये महाधनुर्धराश्चक्रवर्तिनः केचित् सुद्युम्नभूरिद्युम्नेंद्रद्युम्नकुवलयाश्वयौवनाश्ववध्र्यश्वाश्वपतिशशबिंदुहरिश्चंद्रांबरीषननहुषसर्यातिययात्यनरण्योक्षसेनादयः, अथ मरुत्तभरतप्रभृतयो राजानो मिषतो बंधुवर्गस्य महतीं श्रियं त्यक्त्वाऽस्माल्लोकादमुं लोकं प्रयाता इति । अथ किमेतैर्वा परेऽन्ये गंधर्वासुरयक्षराक्षसभूतगणपिशाचोरगग्रहादीनां निरोधं पश्यामः । अथ किमेतैर्वाऽन्यानां शोषणं महार्णवानां, शिखरिणां प्रपतनं, ध्रुवस्य प्रचलनं, व्रश्चनं वातरज्जूनां, निमज्जनं पृथिव्याः, स्थानादपसरणं सुराणामित्येतद्विधेऽस्मिन्संसारे किं कामोपभोगैः । यैरेवाशितस्यासकृदिहाऽऽवर्तनं दृश्यते । इत्युद्धर्तुमर्हसि । अंधोदपानस्थो भेक इवाहमस्मिन्संसारे भगवंस्त्वं नो गतिस्त्वं नो गतिः ॥४॥ इति प्रथमः प्रपाठकः ॥

हें सर्व विश्व क्षय पावणारें आहे असें आह्मी पहातों. उदाहरणार्थ माशा, डांस, गवत, वनस्पति उत्पन्न होऊन नाश पावतात. हींच कशाला? आणखी दुसरे कोणी महाधनुर्धर चक्रवर्ती सुद्युम्न, भूरिद्युम्न, इंद्रद्युम्न, कुवलयाश्व, यौवनाश्व, वध्र्यश्व, अश्वपति, शशबिंदु, हरिश्चंद्र, अंबरीष, नहुष, सर्याति, ययाति, अनरण्य, उक्षसेन इत्यादि;

तसेच मरुत्त, भरत, वगैरे राजे, (हे सर्व) बंधुवर्ग प्रत्यक्ष पहात असतां मोठें वैभव टाकून या लोकांतून दुसऱ्या लोकीं गेले. एवढ्यां-नींच काय? आणखीहि दुसरे गंधर्व, असुर, यक्ष, राक्षस, भूतगण, पिशाच, सर्प, डाखिणी यांचे देखील नाश आह्मी पहातों. एवढ्यां-नींच काय? आणखी मोठ्या सागरांचें शोषण, पर्वतांचें कोळसणें, ध्रुवाचें चळणें, वातरज्जूंचें (?) छेदन, पृथ्वीचें बुडणें आणि देवांची देखील स्थानभ्रष्टता (आह्मी पहातों). अशा प्रकारच्या या संसारामध्यें कामोपभोगांचा काय उपयोग? ज्यांनीं भोग भोगले ते सुद्धां पुनः या लोकीं परत आलेले दिसतात. म्हणून आपण माझा उद्धार करावा. कोरड्या विहीरीमध्यें असलेल्या बेडकाप्रमाणें मी या संसारांत आहें. हे भगवन्! तुम्हीच आमचें आश्रयस्थान आहांत.४.

वनस्पतयोद्भूतप्रध्वंसिनः= वनस्पतयः उद्भूतप्रध्वंसिनः। असेच इतरहि छांदस संधि या उपनिषदांत बरेच आहेत.

---

## प्रपाठक दुसरा—आत्म्याचें ज्ञान.

१—५ शरीर आणि आत्मा—

अथ भगवाञ्शाकायन्यः सुप्रीतस्त्वब्रवीद्राजानं महाराज बृहद्रथेक्ष्वाकुवंशध्वज शीघ्रमात्मज्ञः कृतकृत्यस्त्वं मरुन्नाम्नेति विश्रुतोऽसीति। अयं वाव खल्वात्मा ते। यः कतमो भगवा इति। तं होवाचेति ॥१॥

तेव्हां भगवान् शाकायन्य संतुष्ट होत्साते राजाला म्हणाले—"हे महाराजा इक्ष्वाकुवंशध्वजा बृहद्रथा, तूं शीघ्र आत्मज्ञ व कृत-कृत्य होशील. कारण (शीघ्रगति) वायूच्याच नांवानें [=बृहद्रथ]

तूं प्रसिद्ध आहेस. हाच तो खरोखर तुझा आत्मा." "भगवन्! कोणता?" शाकायन्य त्याला म्हणाले, हा (मी सांगतों ऐक) १.

अथ य एष उच्छ्वासाविष्टंभनेनोर्ध्वमुत्क्रांतो व्ययमानोऽव्ययमानस्तमः प्रणुदत्येष आत्मा। इत्याह भगवान्मैत्रिः इति। एवं ह्याह—अथ य एष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यत इत्येष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति ॥२॥

हा जो श्वासोच्छ्वासाचा निरोध न करतां वर जाणारा, संचार करीत असून संचार करीत नाहीं असा, तमाचा नाश करतो तो आत्मा, असें भगवान् मैत्रींनीं सांगितलें आहे. आणखी असेंहि म्हटलें आहे कीं, "हा जो प्रसन्नतारूपी, (मरणकालीं) या शरीरांतून वर निघून श्रेष्ठ ज्योतीला प्राप्त होत्साता स्वतःच्या रूपानें युक्त होतो तोच आत्मा असें गुरु म्हणाले; हा मरणरहित व भयरहित आहे; हाच ब्रह्म होय" [छां.८.३.४] .२.

अथ खल्वियं ब्रह्मविद्या सर्वोपनिषद्विद्या वा राजन्नस्माकं भगवता मैत्रिणाऽऽख्याताऽहं ते कथयिष्यामीति। अथापहतपाप्मानस्तिग्मतेजसा ऊर्ध्वरेतसो वालखिल्या इति श्रूयन्ते। अथ क्रतुं प्रजापतिमब्रुवन्! भगवन्शकटमिवाचेतनमिदं शरीरं, कस्यैष खल्वीदृशो महिमाऽतींद्रियभूतस्य येनैतद्विधमेतच्चेतनवत्प्रतिष्ठापितं, प्रचोदयिता वाऽस्य। यद्भगवन्वेत्सि तदस्माकं ब्रूहीति। तान्होवाचेति ॥३॥

हे राजा, ही ब्रह्मविद्या—— म्हणजेच सर्व उपनिषदांतली विद्या-आह्मांला भगवान् मैत्रि ऋषींनीं सांगितली; ती मी तुला सांगतों—— ज्यांचें सर्व पाप नाश पावलें आहे, ज्यांचें तेज तीव्र आहे व जे ऊर्ध्वरेते आहेत असे वालखिल्य प्रसिद्ध आहेत. ते क्रतु नामक प्रजापतीला ह्मणाले—— "हे भगवन्! हें शरीर गाड्याप्रमाणें अचेतन आहे.

अशा प्रकारचें हें (शरीर) ज्या प्रभावानें चैतन्ययुक्त ठेवलें आहे तो प्रभाव इंद्रियातीत अशा कोणाचा बरें आहे? ह्मणजे याला चालविणारा कोण आहे? आपणांला जें ज्ञान असेल तें आह्मांस सांगा.'' त्या वालखिल्यांना क्रतु ह्मणाला. ३—

योह खलु वावोपरिस्थः श्रूयते, गुणेष्विवोर्ध्वरेतसः, स वा एष शुद्धः पूतः शून्यः शान्तोऽप्राणो निरात्माऽनंतोऽक्षय्यः स्थिरः शाश्वतोऽजः स्वतंत्रः । स्वे महिम्नि तिष्ठत्यनेनेदं शरीरं चेतनवत्प्रतिष्ठापितं प्रचोदयिता वैषोऽप्यस्येति । ते होचुर्भगवन्कथमनेनेदृशेनानिष्टेनैतद्विधमिदं चेतनवत्प्रतिष्ठापितं प्रचोदयिता वैषोऽस्य कथमिति तान्होवाच ॥४॥

“ज्याप्रमाणें योगी विषयांचे ठिकाणीं त्याप्रमाणें जो (शरीरांत असून त्यापासून) अलिप्त आहे असें ह्मणतात तोच हा (प्रेरक) — शुद्ध पवित्र, शून्य, शान्त, अप्राण [=इंद्रियांहून निराळा], निरात्मा [मनाहून निराळा], अनंत, अक्षय, स्थिर, शाश्वत, जन्मरहित आणि स्वतंत्र आहे. हा स्वतःच्या प्रभावामध्येंच स्थित आहे. यानें हें शरीर चैतन्ययुक्त ठेवलें आहे— म्हणजेच हाच याच प्रेरक किंवा चालविणारा आहे.'' ते (वालखिल्य) ह्मणाले— “भगवन्! जो स्वतः निराधार अशा यानें अशा प्रकारचें (शरीर) चैतन्ययुक्त कसें ठेवलें आहे? याचा प्रेरक हा कसा?'' त्यांना तो क्रतु म्हणाला.४.

‘अनिष्टेन’ याऐवजीं ‘अनिष्टेन’ [=इच्छारहित] आणि ‘अणिष्ठेन [= अति सूक्ष्म] असे इतर पाठ आहेत.

स वा एष सूक्ष्मोऽग्राह्योऽदृश्यः । पुरुषसंज्ञोऽबुद्धिपूर्वमिहैवाऽऽवर्ततेंऽशेनेति सुप्तस्येवाबुद्धिपूर्वं विबोध एवमिति । अथ यो ह खलु वावैतस्य सोंऽशोऽयं यश्चेतामात्रः प्रतिपुरुषः क्षेत्रज्ञः संकल्पाध्यवसायाभि-

मानोलिंगः प्रजापतिर्विश्वाख्यः। चेतनेनेदं शरीरं चेतनवत्प्रतिष्ठापितं प्रचोदयिता वैषोऽप्यस्येति । ते होचुर्भगवन्यद्यनेनेदृशेनानिष्ठेनैताद्विधमिदं चेतनवत्प्रतिष्ठापितं प्रचोदयिता वैषोऽस्य कथमिति तान्होवाचेति ॥५॥

"ज्याला पुरुष म्हणतात तो सूक्ष्म, अग्राह्य व अदृश्य असा हाच. हा अबुद्धिपूर्वक या शरीरांत अंशानें येतो. निजलेल्या मनुष्याला जशी अबुद्धिपूर्वक जागृति येते तद्वत्. या पुरुषाचा जो हा अंश, चैतन्यस्वभाव प्रतिपुरुष, क्षेत्रज्ञ म्हणजे शरीराचा ज्ञाता, संकल्प-निश्चय—व—अभिमान—लक्षणी त्याला विश्वप्रजापति म्हणतात. या सचेतनानें हें शरीर चैतन्ययुक्त ठेवलें आहे, आणि याचा प्रेरकहि हाच आहे." ते म्हणाले—— "भगवन्! अशा प्रकारच्या निराधार असलेल्या यानें [प्रतिपुरुषानें] जरी अशा प्रकारचें हें शरीर चेतन-युक्त ठेवलें आहे तरी हा याचा प्रेरक कसा? ५.

क्षेत्र म्हणजे शरीर. "इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते । एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥" गीता.१३.१.

६ शरीरांत चैतन्याची उत्पत्ति——

प्रजापतिर्वा एकोऽग्रेऽतिष्ठत्स नारमतैकः, सोत्मानमभिध्यात्वा बह्वीः प्रजा असृजत । ता अश्मेवाप्रबुद्धा अप्राणाः स्थाणुरिव तिष्ठमाना अपश्यत् । स नारमत, सोऽमन्यततासां प्रतिबोधनायाभ्यंतरं विविशामि । स वायुरिवाऽऽत्मानं कृत्वाभ्यंतरं प्राविशत् । स एको नाशकत्स पंचधाऽऽत्मानं विभज्योच्यते यः प्राणोऽपानः समान उदानो व्यान इति । अथायं य ऊर्ध्वमुत्क्रामत्येष वायुः स प्राणोऽथ योऽयमवाङ्संक्रामत्येष वाव सोऽपानोऽथ येन वैताव-नुगृहीतेत्येष वाव स व्यानोऽथ योऽयं स्थविष्ठो धातुरन्नस्यापाने प्रापयत्यणिष्ठो वांऽगेंऽगे समानयत्येष वाव स समानसंज्ञा, उत्तरं व्यानस्य रूपं, चैतेषामंतरा प्रसूतिरेवोदानास्याथ योऽथं पीताशितमुद्गिरति

निगिरतीति वैष वांव स उदानः । अथोपांशुरंतर्याममभिभवत्यंतर्याम उपांशुं चैतयोरंतरा दैवोष्ण्यं प्रासुवद्यदौष्ण्यं स पुरुषोऽथ यः पुरुषः सोऽग्निर्वैश्वानरः। अन्यत्राप्युक्तं "अयमग्निर्वैश्वानरो योऽयमंतःपुरुषे येनेदमन्नं पच्यते यदिदमद्यते तस्यैष घोषो भवति यमेतत्कर्णावपिधाय शृणोति स यदोत्क्रमिष्यन्भवति नैनं घोषं शृणोति" "स वा एष पंचधाऽऽत्मानं विभज्य निहितो गुहायाम् ।· मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्प आकाशात्मे"ति ।

स य एषोऽस्नाद्धृदंतरादकृतार्थोऽमन्यातार्थानश्नानीति । अतः खानीमानि भित्त्वोदितः पंचभी रश्मिभिर्विषयानत्ति । इति बुद्धींद्रियाणि तानीमान्येतान्यस्य रश्मयः, कर्मेंद्रियाण्यस्य हया, रथः शरीरं मनो नियंता, प्रकृतिमयोऽस्य प्रतोदोऽनेन खल्वीरितः परिभ्रमतीदं शरीरं चक्रमिव मृत्पचेनेदं शरीरं चेतनवत्प्रतिष्ठापितं प्रचोदयिता वैषोऽप्यस्येति ॥६॥

आरंभीं एकटा प्रजापति होता. एकटा असल्यानें त्याला बरें वाटेना. त्यानें स्वतः मनन करून बहुत प्रजा उत्पन्न केल्या. त्या प्रजा दगडाप्रमाणें व खांबाप्रमणें बुद्धिहीन व प्राणहीन आहेत असें त्यानें पाहिलें व तें त्याला बरें वाटलें नाहीं. त्यानें विचार केला, यांना जागृत करण्याकरितां मी यांच्यामध्यें प्रवेश करतों. त्यानें स्वतःला वायूसारखा करून त्यांच्यामध्यें प्रवेश केला. हा प्रवेश तो एकटा करूं शकला नाहीं ह्मणून त्यानें स्वतःचे पांच विभाग करून प्रवेश केला. ते विभाग म्हणजे ज्यांना प्राण, अपान, समान, उदान व व्यान म्हणतात ते. जो वर जातो तोच प्राण. जो खालीं जातो तोच अपान. ज्यानें या दोहोंना आधार दिला आहे तो व्यान. स्थूल भाग जो अपानाकडे नेतो आणि सूक्ष्म भाग जो सर्व अवयवांमध्यें

समान करतो त्याला समान म्हणतात; हें व्यानाचें श्रेष्ठ रूप आहे. या सर्वांच्या मध्यें उदानाची उत्पत्ति आहे. प्यालेलें आणि खाल्लेलें जो वर आणतो आणि खालीं नेतो तोच उदान. उपांशु व अंतर्याम पात्रांप्रमाणें हे प्राण व अपान एकमेक— प्राण अपानाला व अपान प्राणाला — याप्रमाणें व्यापतात. यांच्यामध्यें देवानें उष्णता उत्पन्न केली. जी ही उष्णता तोच पुरुष, तोच वैश्वानर अग्नि. इतरहि ह्मटलें आहे — "पुरुषाच्या अंतर्भागीं जो आहे, व जें हें अन्न खाल्लें जातें तें जो पचवितो, तो हा वैश्वानर अग्नि. दोन्ही कान बंद केले असतां जो आवाज मनुष्य ऐकतो तो याचा आवाज. मनुष्य जेव्हां मरूं लागतो तेव्हां त्याला हा आवाज ऐकूं येत नाहीं" [बृ.५.९]. "तो हा मनोमय, प्राणशरीर, प्रकाशरूप, सत्यसंकल्प, आकाशात्मा स्वतःचा पांच प्रकारांनीं विभाग करून बुद्धीचे ठिकाणीं राहिला आहे" [छां. ३. १४.२].

तो हा हृदयाच्या अंतर्भागीं राहून आपण अकृतार्थ आहों असें वाटून विषय भक्षण करावे असा त्यानें विचार केला. ह्मणून हीं इंद्रियें फोडून तो वर येऊन पांच किरणांनीं विषय खातो (ह्मणजे भोगतो). जे हे त्याचे किरण ह्मटले तीं बुद्धींद्रियें होत. कर्मेंद्रियें हे याचे घोडे, शरीर हा रथ, मन हा सारथि, स्वभाव हा चाबूक. या चाबकानें प्रेरित असा हा हें शरीर — कुंभार जसा चक्र तद्वत् — फिरवितो. असें हें शरीर चैतन्ययुक्त करून ठेवलें आहे, याचा प्रेरक देखील हाच आहे. ६.

'उपांशु' व 'अंतर्याम' हीं सोमयज्ञांत लागणाऱ्या पात्रांचीं नांवें आहेत.

७. आत्मा स्वतः अलिप्त—

स वा एष आत्मेहोशन्ति कवयः सितासितैः कर्मफलैरनभिभूत इव प्रतिशरीरेषु चरति । अव्यक्तत्वात्सौक्ष्म्याददृश्यत्वादग्राह्यत्वान्निर्ममत्वाच्चानवस्थोऽसति कर्ताऽकर्तैवावस्थः । स वा एष शुद्धः स्थिरोऽचलश्चालेप्योऽव्यग्रो निःस्पृहः प्रेक्षकवदवस्थितः स्वस्थश्च । ऋतभुग्गुणमयेन पटेनाऽऽत्मानमंतर्धायावस्थिता इत्यवस्थिता इति ॥७॥ इति द्वितीयः प्रपाठकः ॥

ज्ञाते सांगतात, तो हा आत्मा शुद्ध अथवा अशुद्ध कर्मांनीं जिंकला न जातां [=बांधला न जातां] प्रत्येक शरीरामध्यें संचार करतो. हा अव्यक्त, सूक्ष्म, अदृश्य, अग्राह्य आणि ममत्वरहित असल्यामुळें या मिथ्या शरीरांत रहाणारा असून रहाणारा नाहीं, कर्ता असून कर्ता नाहीं. शुद्ध, स्थिर, अचल, आलिप्त, निश्चल, निरिच्छ आणि स्वतःचे ठिकाणीं स्थित असा हा प्रेक्षकाप्रमाणें राहिला आहे. हा सत्याचा भोक्ता गुणरूपी वस्त्रानें स्वतःला झांकून राहिला आहे.''७.

---

अथ तृतीयः प्रपाठकः ।

## प्रपाठक तिसरा—भूतात्मा.

१–३ कर्मफल भोगणारा भूतात्मा—

ते होचु भगवन्यद्येवमस्याऽऽत्मनो महिमानं सूचयसीत्यन्यो वा परः । कोऽयमात्माख्यो योऽयं सितासितैः कर्मफलैराभिभूयमानः सदसद्योनिमापद्यता इत्यवांचोर्ध्वा वा गतीं द्वंद्वैरभिभूयमानः परिभ्रमति ॥१॥

ते (वालखिल्य) म्हणाले—“ (तर मग) शुद्ध अथवा अशुद्ध कर्मांनीं जिंकलेला, चांगला अथवा वाईट जन्म पावणारा, (पापपु-

ण्यादि) द्वंद्वांनीं जिंकला गेल्यामुळें खालच्या अथवा वरच्या गतीमध्यें परिभ्रमण करणारा आत्मा म्हणतात तो कोणता ?" १.

अस्ति खल्वन्योऽपरो भूतात्माख्यो योऽयं सितासितैः कर्मफलैरभिभूयमानः सदसद्योनिमापद्यता इत्यवांचोर्ध्वां वा गती द्वंद्वैरभिभूयमानः परिभ्रमतीत्यस्योपव्याव्याख्यानम्। पंचतन्मात्रा भूतशब्देनोच्यन्तेऽथ पंचमहाभूतानि भूतशब्देनोच्यन्तेऽथ तेषां यत्समुदयं तच्छरीरमित्युक्तमथ यो ह खलु वाव शरीर इत्युक्तं स भूतात्मेत्युक्तम्। अथामृतोऽस्याऽऽत्मा बिंदुरिव पुष्करा इति स वा एषोऽभिभूतः प्राकृतैर्गुणैरिति। अथोऽभिभूतत्वात्संमूढत्वं प्रयातः संमूढत्वात् आत्मस्थं प्रभुं भगवंतं कारयितारं नापश्यद्गुणौघैरुह्यमानः कलुषीकृतश्चास्थिरश्चंचलो लुप्यमानः सस्पृहो व्यग्रश्चाभिमानित्वं प्रयाता इत्यहं सो ममेदमित्येवं मन्यमानो निबध्नात्यात्मनाऽऽत्मानं जालेनेव खचरः। कृतस्यानु फलैरभिभूयमानः सदसद्योनिमापद्यता, इत्यवांचोर्ध्वां वा गती द्वंद्वैरभिभूयमानः परिभ्रमति कतम एष इति तान्होवाचेति ॥२॥

" होय, याहून दुसरा जो शुद्ध अथवा अशुद्ध कर्मांनीं जिंकला जाणारा, चांगला अथवा वाईट जन्म पावणारा, (पापपुण्यादि) द्वंद्वांनीं व्याप्त झाल्यामुळें खालच्या अथवा वरच्या गतींत परिभ्रमण करणारा भूतात्मा नांवाचा (आत्मा) आहे. त्याचें स्पष्टीकरण 'भूत' शब्दानें पांच तन्मात्रा समजावयाच्या, तसेंच 'भूत' शब्दानें पांच महाभूतें समजावयाचीं; यांचा जो समुदाय त्याला शरीर म्हणतात. शरीरांत जो असतो असें सांगितलें तो भूतात्मा. त्याचा (म्हणजे त्या भूतात्म्याचा) आत्मा अमर आहे, कमळावर जसा बिंदु तसा आहे. हा प्रकृतीच्या गुणांच्या कह्यांत गेला म्हणजे याला भगवान् प्रभु करविणारा आत्मस्थ असून दिसत नाहीं. गुणांच्या ओघांनीं वहात चालविलेला, गढूळ केलेला, अस्थिर, चंचल, लुप्तधर्म, इच्छायुक्त व म्हणून व्यग्र, अभि-

मानाप्रत जातो आणि 'हा मी' 'हें माझें' असें समजून स्वतःच स्वतःला —पक्षी जसा जाळ्यानें तसा — बंधन करतो. नंतर कर्माच्या फलांच्या कह्यांत आलेला तो चांगला अथवा वाईट जन्म पावतो. याप्रमाणें (पापपुण्यादि) द्वंद्वांच्या कह्यांत गेल्यामुळें खालच्या अथवा वरच्या गतींमध्यें परिभ्रमण करतो." "हा कोणता?" तें सांगतात. २.—

अथान्यत्राप्युक्तं "यः कर्ता सोऽयं वै भूतात्मा, करणैः कारयिताऽन्तःपुरुषः।" अथ यथाऽग्निनाऽयस्पिंडोऽन्यो वाऽभिभूतः कर्तृभिर्हन्यमानो नानात्वमुपैत्येवं वाव खल्वसौ भूतात्माऽन्तःपुरुषेणाभिभूतो गुणैर्हन्यमानो नानात्वमुपैति। चतुर्जालं चतुर्दशविधं चतुरशीतिधा परिणतं भूतगणमेतद्वै नानात्वस्य रूपम्। तानि ह वा एतानि गुणानि पुरुषेणेरितानि चक्रमिव मृत्पचेनेति। अथ यथाऽयस्पिंडे हन्यमाने नाग्निरभिभूयत्येवं नाभिभूयत्यसौ पुरुषोऽभिभूयत्ययं भूतात्मोपसंश्लिष्टत्वादिति ॥३॥

अन्यत्र देखील सांगितलें आहे कीं, "जो कर्ता तो हा भूतात्मा. इंद्रियांकडून करविणारा तो अंतःपुरुष." [मनु. १२. १२]. ज्याप्रमाणें लोखंडाचा किंवा दुसऱ्या कशाचा गोळा अग्नीनें व्याप्त असा (लोहार इत्यादि) कारागिरांकडून ठोकला गेला म्हणजे नानात्व पावतो, त्याप्रमाणें हा भूतात्मा अंतःपुरुषानें व्याप्त होऊन गुणांकडून ठोकला गेला म्हणजे नानात्व पावतो. चार प्रकारचें, जाळ्यांनीं युक्त, चवदा प्रकारचें, ८४ प्रकारें परिणाम पावणारें, अनेक भूतसमुदायांनीं युक्त, असें या नानात्वाचें रूप आहे. ते हे इतके प्रकार पुरुषानें प्रेरणा केलेले असतात. कुंभारानें प्रेरित चक्र असतें तद्वत्. आतां जरी लोखंडाचा गोळा ठोकला तरी जसा

अग्नीचा पराजय नाहीं, तसा या पुरुषात्म्याचा पराजय नाहीं. जिंकला जातो भूतात्मा, कारण तो (गुणांना) चिकटतो. ३.

वर उल्लेख केलेला मनुस्मृतींतला श्लोक असा— योऽस्यात्मनः कारयिता तं क्षेत्रज्ञं प्रचक्षते। यः करोति तु कर्माणि स भूतात्मोच्यते बुधैः ॥ मनुस्मृति १२.१२. चतुर्जालं=जरायुज, अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशा चार प्रकारच्या जाळ्यांनीं युक्त. चतुर्दशविधं=१४ भुवनांतले जन्म. ८४ प्रकार कोणते तें समजत नाहीं.

४ शरीर कशाचें आहे?—

अथान्यत्राप्युक्तं शरीरमिदं मैथुनादेवोद्भूतं संवृद्ध्युपेतं निरयेऽथ मूत्रद्वारेण निष्क्रांतमस्थिभिश्चितं मांसेनानुलिप्तं चर्मणाऽवनद्धं विण्मूत्रपित्तकफमज्जामेदोवसाभिरन्यैश्चाऽऽमयैर्बहुभिः परिपूर्णं कोश इव वसुना ॥४॥

आणखी अन्यत्र सांगितलें आहे— "हें शरीर मैथुनापासूनच उत्पन्न होणारें, नरकामध्यें वाढणारें, मूत्रद्वारानें बाहेर येणारें, अस्थींनीं तयार केलेलें, मांसानें थापलेलें, चर्मानें शिवलेलें, विष्ठा—मूत्र—पित्त—कफ—मज्जा—मेद—चरबी यांनीं आणि इतर अनेक रोगांनीं—द्रव्यानें भरलेल्या तिजोरीप्रमाणें— परिपूर्ण असें आहे." ४.

५ राजस व तामस गुण—

अथान्यत्राप्युक्तं संमोहो भयं विषादो निद्रा तंद्री प्रमादो जरा शोकः क्षुत्पिपासा कार्पण्यं क्रोधो नास्तिक्यमज्ञानं मात्सर्यं नैष्कारुण्यं मूढत्वं निर्व्रीडत्वं निराकृतित्वमुद्धतत्वमसमत्वमिति तामसानि। अंतस्तृष्णा स्नेहो रागो लोभो हिंसा रतिर्दृष्टिर्व्यावृतत्वमीर्ष्याऽकाममस्थिरत्वं चलत्वं व्यग्रत्वं जिगीषाऽर्थोपार्जनं मित्रानुग्रहणं परिग्रहावलंबोऽनिष्टेष्विंद्रियार्थेषु द्विष्टिरिष्टेष्वभिष्वंगः शुक्तस्वरोऽन्नतम-

स्त्विति राजसान्येतैः परिपूर्ण एतैरभिभूता इत्ययं भूतात्मा तस्मान्नानारूपाण्याप्नोतीत्याप्नोतीति ॥ ५ ॥ इति तृतीयः प्रपाठकः ॥

आणखी अन्यत्र सांगितलें आहे—

"संमोह, भय, विषाद, आळस, प्रमाद, जरा, शोक, भूक, तहान, दीनपणा, क्रोध, नास्तिक्य, अज्ञान, मत्सर, निर्दयता, मूर्खत्व, निर्लज्जता, चंचलत्व, उद्धटपणा, भेदबुद्धि इत्यादि तामस गुण; आणि अप्राप्य वस्तूच्या प्राप्तीची उत्कट इच्छा, प्रेम, आसक्ति, लोभ, हिंसा, रति, द्वेष, गुप्तपणा, स्पर्धा, निरर्थक प्रवृत्ति, अस्थिरपणा, मनाची चलबिचल, व्यसन, जिंकण्याची इच्छा, द्रव्योपार्जन-मित्रांचा सत्कार, गृहस्थाश्रमाविषयीं उत्साह, अनिष्ट इंद्रियविषयांचा द्वेष, इष्ट इंद्रियविषयांची आसक्ति, संदिग्ध भाषण, अन्नदानेच्छा इत्यादि राजस गुण; यांनीं परिपूर्ण आणि यांच्या सर्वस्वीं कह्यांत असणारा तो भूतात्मा." म्हणून ह्या नाना प्रकारचीं रूपें पावतो. ५.

वर ४ थ्या व ५ व्या मंत्रांत आणि यापुढेंहि या उपनिषदांत ठिकाठिकाणीं अवतरणें घेतल्याचें म्हटलें आहे. हीं अवतरणें कोठलीं तें नीट समजत नाहीं.

---

## प्रपाठक चवथा.

ते ह खलु वावोर्ध्वरेतसोऽतिविस्मिता अभिसमेत्योचुर्भगवन्नमस्तेऽस्त्वनुशाधि त्वमस्माकं गतिरन्या न विद्यत इति। अस्य को विधिर्भूतात्मनो येनेदं हित्वाऽऽत्मन्येव सायुज्यमुपैति तान्होवाचेति॥१॥

ते ऊर्ध्वरेते वालखिल्य अति विस्मित होत्साते एकत्र येऊन (पुनः क्रतूला) म्हणाले--- "भगवन् ! तुला आम्ही वंदन करतों, आम्हांस

उपदेश कर. तूंच आमचा आधार, दुसरा आह्मांस आधार नाहीं. असें कोणतें साधन आहे कीं ज्यानें या भूतात्म्याचें भूतात्मत्व सोडून मनुष्य आत्म्याचें सायुज्य पावतो?" त्यांना क्रतु ह्मणाला. १.—

अथान्यत्राप्युक्तं महानदीषूर्मय इवानिवर्तकमस्य यत्पुराकृतं, समुद्रवेलेव दुर्निवार्यमस्य मृत्योरागमनं, सदसत्फलमयैः पाशैः पंगुरिव बद्धं, बंधनस्थस्यैवास्वातंत्र्यं, यमविषयस्थस्येव बहुभयावस्थं, मदिरोन्मत्त इव मोहमदिरोन्मत्तं, पाप्मना गृहीत इव भ्राम्यमाणं, महोरगदष्ट इव विषयदष्टं, महांधकारमिव रागांधं, इंद्रजालमिव मायामयं, स्वप्न इव मिथ्यादर्शनं, कदलीगर्भ इवासारं, नट इव क्षणवेषं, चित्रभित्तिरिव मिथ्यामनोरमं" इति। अथोक्तं—

"शब्दस्पर्शादयो ह्यर्था मर्त्येऽनर्था इवाऽऽस्थिताः॥
येषां सक्तस्तु भूतात्मा न स्मरेत्परमं पदम्" ॥२॥

अन्यत्रहि असें सांगितलें आहे कीं, "जें अगोदर कर्म केलें तें महानदींमधल्या लाटांप्रमाणें परत फिरवितां येत नाहीं. या भूतात्म्याला मृत्यूचें आगमन समुद्राच्या लाटेप्रमाणें दुर्निवार्य आहे. (या भूतात्म्याचें स्वरूप)—पांगळ्या माणसाप्रमाणें सदसत्कर्मरूपी पाशांनीं बद्ध, कारागृहांत असलेल्या माणसाप्रमाणें अस्वतंत्र, यमलोकांत गेलेल्या माणसाप्रमाणें पुष्कळ भययुक्त, दारू पिऊन झिंगलेल्या माणसाप्रमाणें मोहरूपी दारूनें झिंगल्यासारखें, पिशाचानें पछाडलेल्या माणसाप्रमाणें भ्रमिष्ट, मोठ्या सर्पानें चावल्याप्रमाणें विषयरूपी सर्पानें चावल्यासारखें, मोठ्या अंधकाराप्रमाणें कामरूपी अंधकारानें अंध, जादूप्रमाणें मायारूप, स्वप्नाप्रमाणें मिथ्यारूप, केळीच्या गाभ्याप्रमाणें फुसकें, नटाप्रमाणें क्षणिक वेष घेतलेलें, चितारलेल्या भिंतीप्रमाणें मिथ्यामनोरम असें आहे." आणखी असें म्हटलें आहे कीं, "शब्द-

स्पर्शादि अर्थ हे मनुष्याच्या ठिकाणीं अनर्थाप्रमाणें स्थित आहेत; याच्या विषयीं भूतात्मा आसक्त झाला ह्मणजे परम पदाची त्याला आठवण होत नाहीं."

३ तप आणि स्वधर्माचरण आत्मप्राप्तीचें साधन—

अयं वाव खल्वस्य प्रतिविधिर्भूतात्मनो यद्वेदविद्याधिगमः, स्वधर्मस्यानुचरणम्। स्वाश्रमेष्वेवानुक्रमणं स्वधर्मस्य वा एतद्व्रतं, स्तंबशाखेवापराणि। अनेनोर्ध्वभाग्भवत्यन्यथाऽवाङित्येष स्वधर्मोऽभिहितो यो वेदेषु, न स्वधर्मातिक्रमेणाऽऽश्रमी भवति। आश्रमेष्वेवानवस्थस्तपस्वी वेत्युच्यत इत्येतदयुक्तं, नातपस्कस्याऽऽत्मज्ञानेऽधिगमः कर्मसिद्धिर्वेति। एवं ह्याह—

"तपसा प्राप्यते सत्त्वं सत्त्वात्संप्राप्यते मनः॥
मनसः प्राप्यते ह्यात्मा यमाप्त्वा न निवर्तत" इति ॥३॥

या भूतात्म्याचा प्रतिविधि ह्मणजे मोक्षाचा उपाय वेदविद्येची प्राप्ति हा आहे. तसेंच स्वधर्माचें आचरण हा आहे. आपल्या आश्रमामध्यें राहून आपल्या धर्माचें आचरण करणें हाच याचा नियम होय. दुसरे नियम ह्मणजे गवताच्या पुंजक्याप्रमाणें (निरर्थक) होत. या नियमानें मनुष्य वर जातो; एरवीं खालीं जातो. अशा प्रकारचा हा स्वधर्म वेदांमध्यें सांगितला आहे. स्वधर्म मोडल्यानें कोणी आश्रमी होत नाहीं. "आश्रमांमध्यें न राहाणारा तो तपस्वी असेल" असें ह्मटलें तर तें अयोग्य होय. पण हें खरें कीं जो तप आचरणारा नाहीं त्याला आत्मज्ञानाची प्राप्ति होत नाहीं, आणि कर्माचीहि सिद्धि होत नाहीं. याविषयीं ह्मटलें आहे कीं, "तपानें सात्विकपणा प्राप्त होतो, सात्विकपणानें (शुद्ध) मन प्राप्त होतें, मनानें आत्मा

प्राप्त होतो आणि आत्मप्राप्तीनंतर मनुष्य परत (जन्ममरणाला) येत नाहीं." ३.

४ ब्रह्मज्ञान, तप आणि ब्रह्मचिंतन—

अस्ति ब्रह्मेति ब्रह्मविद्याविदब्रवीत्, ब्रह्मद्वारमिदमित्येवैतदाह यस्तपसाऽपहतपाप्मा, ॐ ब्रह्मणो महिमेत्येवैतदाह यः सुयुक्तोऽजस्रं चिंतयति। तस्माद्विद्यया तपसा चिंतया चोपलभ्यते ब्रह्म। स ब्रह्मणः पर एता भवत्यधिदैवत्वं देवेभ्यश्चेत्यक्षय्यमपरिमितमनामयं सुखमश्नुते य एवं विद्वाननेन त्रिकेण ब्रह्मोपास्ते। अथ यैः परिपूर्णोऽभिभूतोऽयं रथितश्च तैर्वैव मुक्तस्त्वात्मन्नेव सायुज्यमुपैति ॥४॥

ब्रह्मविद्यावेत्ता 'ब्रह्म आहे' असें ह्मणतो. तपानें ज्याच्या पापाचा नाश झाला आहे तो 'हें तप ब्रह्माचें द्वार' असें ह्मणतो. (अध्यात्मयोगाचे ठिकाणीं) उत्तम प्रकारें युक्त झालेला सतत ब्रह्माचें चिंतन करणारा "ॐ हा ब्रह्माचा महिमा" असें ह्मणतो. ह्मणून ब्रह्मविद्येनें, तपानें आणि चिंतनानें ब्रह्म प्राप्त होतें. जो हें जाणून या तीन साधनांनीं ब्रह्माची उपासना करतो तो ब्रह्मदेवाच्या पलीकडे जातो, देवांच्या वर देवत्व त्याला मिळतें. अक्षय, अपरिमित आणि दुःखरहित असें सुख त्याला मिळतें. ज्यांनीं हा भरलेला आणि जिंकलेला आणि रथांत ठेवलेला असतो त्यांपासून हा मुक्त होऊन आत्म्याचे ठिकाणीं सायुज्य पावतो." ४.

५.६ ब्रह्माचीं स्वरूपें —

ते होचुर्भगवन्नभिवाद्यसीत्यभिवाद्यसीति। निहितमस्माभिरेतद्यथावदुक्तं मनसीत्यथोत्तरं प्रश्नमनुब्रूहीति। अग्निर्वायुरादित्यः कालो यः प्राणोऽन्नं ब्रह्मा रुद्रो विष्णुरित्येकेऽन्यमभिध्यायन्त्येकेऽन्यं श्रेयः कतमो यः सोऽस्माकं ब्रूहीति तान्होवाचेति ॥५॥

ते म्हणाले "भगवन्! आपण उत्तम समजावून देणारे आहां. आपण जसें बोललांत तसें आम्हीं मनामध्यें ठेवलें. आतां आणखी या प्रश्नाचें उत्तर सांगा. अग्नि, वायु, आदित्य, ज्याला काल म्हणतात तो, प्राण, अन्न, ब्रह्मा, रुद्र, आणि विष्णु यांपैकीं एकाचें कोणी ध्यान करतात, कोणी दुसऱ्याचें ध्यान करतात. यांपैकीं श्रेयस्कर देव कोणता तो आम्हांला सांगा." त्यांना तो म्हणाला. ५.—

ब्रह्मणो वावैता अग्र्यास्तनवः परस्यामृतस्याशरीरस्य। तस्यैव लोके प्रतिमोदतीह यो यस्यानुषक्तः। इत्येवं ह्याह— "ब्रह्म खल्विदं वाव सर्वम्"। या वास्या अग्र्यास्तनवस्ता अभिध्यायेदर्चयेन्निह्नुयाच्चातस्ताभिः सहैवोपर्युपरि लोकेषु चरत्यथ कृत्स्नक्षय एकत्वमेति पुरुषस्य पुरुषस्य ॥६॥ इति चतुर्थः प्रपाठकः॥

"हीं सर्वश्रेष्ठ, अमर व अशरीर अशा ब्रह्माचींच श्रेष्ठ स्वरूपें आहेत. जो ज्याच्या ठिकाणीं अनुषक्त असेल त्याच्या लोकामध्यें तो आनंद पावतो." आणखी असें म्हटलें आहे कीं, "खरोखर हें सर्व ब्रह्मच आहे" [छां]. जीं (ब्रह्माचीं) श्रेष्ठ स्वरूपें (वर सांगितलीं) त्यांचें ध्यान करावें, पूजन करावें, पण अखेरीस त्यांचा त्याग करावा. त्यांच्यासहच मनुष्य वरवर लोकामध्यें चढतो आणि सर्व विश्वाचा क्षय होण्याचे वेळीं पुरुषाशीं एकत्व पावतो. ६.

---

## प्रपाठक पांचवा.

अथ यथेयं कौत्सायनी स्तुतिः—

त्वं ब्रह्मा त्वं च वै विष्णुस्त्वं रुद्रस्त्वं प्रजापतिः॥
त्वमग्निर्वरुणो वायुस्त्वमिंद्रस्त्व निशाकरः॥
त्वमन्नस्त्वं यमस्त्वं पृथिवी त्वं विश्वं त्वमथाच्युतः॥

स्वार्थे स्वाभाविकेऽर्थे च बहुधा संस्थितिस्त्वयि ॥
विश्वेश्वर नमस्तुभ्यं विश्वात्मा विश्वकर्मकृत् ।
विश्वभुग्विश्वमायुस्त्वं विश्वक्रीडारतिप्रभुः ॥
नमः शांतात्मने तुभ्यं नमो गुह्यतमाय च ।
अचिंत्यायाप्रमेयाय अनादिनिधनाय चेति ॥१॥

आतां कुत्सायन ऋषींनीं केलेलें स्तवन सांगतात— "तूं ब्रह्मा, तूं विष्णु, तूं रुद्र, तूं प्रजापति, तूं अग्नि, वरुण, वायु, तूं इंद्र, तूं चंद्र. तूं अन्न, तूं यम, तूं पृथिवी, तूं विश्व, तूं आकाश. तूं अढळ आहेस. स्वतःकरितां आणि प्रकृतीकरितां तुझ्या ठिकाणीं बहुत्वानें संस्थिति आहे. हे विश्वेश्वरा, तुला नमस्कार असो. विश्वाचा आत्मा, विश्वरूपी कर्म करणारा, विश्वाचा भोक्ता, विश्वाचा प्राण, विश्वाची क्रीडा व रति यांचा स्वामी तूं आहेस. शांतात्मा, गुह्यतम, अचिंत्य, अप्रमेय [मोजण्यास अशक्य], अनादि व अनंत अशा तुला नमस्कार असो. १.

तमो वा इदमग्र आसीदेकं, तत्परे स्यात्तत्परेणेरितं विषमत्वं प्रयात्येतद्रूपं वै रजः, तद्रजः खल्वीरितं विषमत्वं प्रयात्येतद्वै सत्त्वस्य रूपं, तत्सत्त्वमेवेरितं रसः संप्रास्रवत्, सोऽंशोऽयं यश्चेतामात्रः प्रतिपुरुषः क्षेत्रज्ञः संकल्पाध्यवसायाभिमानलिंगः प्रजापतिर्विश्वेत्यस्य प्रागुक्ता एतास्तनवः। अथ यो ह खलु वावास्य तामसोंऽशोऽसौ स ब्रह्मचारिणो योऽयं रुद्रोऽथ, यो ह खलु वावास्य राजसोंऽशोऽसौ स ब्रह्मचारिणो योऽयं ब्रह्माऽथ, यो ह खलु वावास्य सात्त्विकोंऽशोऽसौ स ब्रह्मचारिणो योऽयं विष्णुः। स वा एष एकस्त्रिधा भूतोऽष्टधैकादशधा द्वादशधाऽपरिमितधा वोद्भूतः। उद्भूतत्वाद्भूतं भूतेषु चरति प्रविष्टः स भूतानामधिपतिर्बभूवेत्यसा आत्मांऽतर्बहिश्चांतर्बहिश्च ॥२॥ इति पंचमः प्रपाठकः ॥

हें सर्व विश्व प्रारंभीं फक्त तम होतें. तें परब्रह्मामध्यें होतें. परब्रह्मानें प्रेरणा केल्यावर तें विषमत्व पावलें. तें रज झालें. ह्या रजाला प्रेरणा केल्यावर तें विषमत्व पावलें. तें सत्त्वाचें रूप. त्या सत्त्वाला प्रेरणा केल्यावर त्यांतून रस निघाला. प्रत्येक पुरुषाचे ठिकाणीं ज्ञानस्वरूपी जो क्षेत्रज्ञ अंश आहे तो हा रस. संकल्प, निश्चय आणि अभिमान हें ज्याचें लक्षण आहे असा प्रजापति. याला 'विश्व' [विश्वात्मा, व्यष्टिदेवता] असें नांव आहे. त्याचीं हीं रूपें मागें सांगितलीं आहेतच. हे ब्रह्मचारी मुनिजनहो, त्याचा जो तामस अंश तो हा रुद्र; त्याचा जो राजस अंश तो ब्रह्मा; आणि त्याचा जो सात्त्विक अंश तो विष्णु. तो हा एकच तीन प्रकार पावला आहे. आठ, अकरा, बारा आणि अपरिमित प्रकारांनीं उद्भूत झाला आहे. उद्भूत झाल्यामुळें त्याला भूत म्हणतात. भूतांमध्यें प्रविष्ट होऊन भूतांमध्यें संचार करतो. हा भूतांचा अधिपति. सर्वांच्या आंत आणि बाहेर हाच आत्मा आहे. २.

आठ प्रकार= पांच भूतें, प्राण, आदित्य व चंद्र. अकरा प्रकार=पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें व मन. बारा प्रकार=तींच दहा इंद्रियें आणि मनाचे मन व बुद्धि असे दोन भाग. इंद्रियवृत्ति अनंत म्हणून अपरिमित प्रकार.

---

## प्रपाठक सहावा

१ आत्मा म्हणजे प्राण आणि आदित्य—

**द्विधा वा एष आत्मानं बिभर्त्ययं यः प्राणो यश्वासा आदित्यः। अथ द्वौ वा एता अस्य पंथाना अंतर्बहिश्चाहोरात्रेणैतौ व्यावर्तेते। असौ वा आदित्यो बहिरात्माऽन्तरात्मा प्राणोऽतो बहिरात्मक्या**

गत्याऽन्तरात्मनोऽनुमीयते गतिरित्येवं ह्याह। अथ यः कश्चिद्विद्वानपहतपाप्माऽक्षाध्यक्षोऽवदातमनास्तन्निष्ठ आवृत्तचक्षुः सः। अंतरात्मक्या गत्या बहिरात्मनोऽनुमीयते गतिरित्येवं ह्याह "अथ य एषोऽतरादित्ये हिरण्मयः पुरुषो यः पश्यतीमां हिरण्यवस्थात्, स एषोऽतरे हृत्पुष्कर एवाऽऽश्रितोऽन्नमात्ति" ॥१॥

हा आत्मा स्वतःला दोन प्रकारांनीं धारण करतो— प्राण आणि आदित्य. त्याचे हे दोन मार्ग आहेत, एक आंतला व एक बाहेरचा. दोन्ही दिवस व रात्र अशा रूपानें फिरून येत असतात. आदित्य हा बाहेरचा आत्मा; प्राण हा अंतरात्मा. बाहेरच्या आत्म्याच्या गतीनें अंतरात्म्याच्या गतीचें अनुमान करतां येतें. कारण असें म्हटलें आहे कीं, " जो कोणी आत्मज्ञानी, ज्याच्या पापाचा नाश झाला आहे असा, इंद्रियांचा अध्यक्ष, शुद्ध मनाचा, त्या आत्म्याचे ठिकाणीं निष्ठ, अंतर्दृष्टि असतो तो आत्माच होतो." अंतरात्म्याच्या गतीनें बाहेरच्या आत्म्याच्या गतीचें अनुमान करतां येतें. असें म्हटलें आहे कीं, "आदित्याचे मध्यें जो सुवर्णमय पुरुष आहे व जो आपल्या सुवर्णस्थानापासून या पृथिवीला पहातो तो हाच अंतर्भागीं हृदयकमलांत राहिलेला अन्न खातो तो." [छां. १.६.६.पहा]. १.

२—४ आत्म्याची ॐकाररूपानें उपासना—

अथ य एषोऽन्तरे हृत्पुष्कर एवाऽऽश्रितोऽन्नमात्ति स एषोऽग्निर्दिवि श्रितः सौरः कालाख्योऽदृश्यः सर्वभूतान्यन्नमत्तीति। कः पुष्करः किंमयो वेति। इदं वाव तत्पुष्करं योऽयमाकाशोऽस्येमाश्चतस्रो दिशश्चतस्र उपदिशो दलसंज्ञा आसन्। अर्वाग्विचरत एतौ प्राणादित्या, एता उपासीतोमित्येतदक्षरेण व्याहृतिभिः सावित्र्या चेति ॥२॥

जो हा अंतर्भागीं हृदयकमलांत राहिलेला अन्न खातो तो हा अग्नि सूर्यरूपी, आकाशामध्यें राहिलेला, अदृश्य ज्याला काल म्हणतात तो होय. सर्व भूतें हेंच अन्न तो खातो." "त्याचें कमळ कोणतें? तो कसला आहे?" हें जें आकाश हेंच त्याचें कमळ. याच्या चार दिशा आणि चार उपदिशा हीं त्याचीं पत्रें म्हणून स्थित आहेत. हे प्राण आणि आदित्य जवळ संचार करतात [=दूर जात नाहींत, एक हृद-यांत व दुसरा ठराविक मार्गांत] या दोघांची ॐ अक्षरानें, (भूः भुवः स्वः या) व्याहृतींनीं आणि गायत्रीमंत्रानें उपासना करावी. २.

द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चामूर्तं चाथ यन्मूर्तं तदसत्यं यदमूर्तं तत्सत्यं, तद्ब्रह्म, तज्ज्योतिर्यज्ज्योतिः स आदित्यः। स वा एष ओमि-त्येतदात्माऽभवत्स त्रेधाऽऽत्मानं व्यकुरुतोमिति तिस्रो मात्रा, एताभिः सर्वमिदमोतं प्रोतं चैवास्मीत्येवं ह्याहैतद्वा आदित्य ओमित्येवं ध्यायता-ऽऽत्मानं युंजीतेति ॥३॥

ब्रह्माचीं दोन रूपें आहेत, मूर्त आणि अमूर्त. जें मूर्त तें असत्य, जें अमूर्त तें सत्य; तें ब्रह्म, तें ज्योति. ज्योति म्हणजे तो आदित्य. तो ॐ अशा आत्म्यानें युक्त झाला. त्यानें स्वतःचे तीन विभाग केले— अ, उ आणि म् अशा तीन मात्रा. या तीन मात्रांनीं हें सर्व विश्व ओत व प्रोत [आडवें आणि उभें विणलेलें] आहे. असें म्हटलें आहे कीं, "या आदित्याचें ॐ असें ध्यान करावें व त्याचे ठिकाणीं एकात्म-तेची भावना करावी. ३.

अथान्यत्राप्युक्तं "अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथः" इति। "असौ वा आदित्य उद्गीथ एष प्रणवः" इति। एवं ह्याह— "उद्गीथं प्रणवाख्यं प्रणेतारं भारूपं विगतनिद्रं विजरं विमृत्युं त्रिपदं त्र्यक्षरं, पुनः पंचधा ज्ञेयं निहितं गुहायाम्" इति। एवं

ह्याह— "ऊर्ध्वमूलं त्रिपाद्ब्रह्म शाखा आकाशवाय्वग्न्युदकभूम्यादय एकोऽश्वत्थनामैतद्ब्रह्मैतस्यैतत्तेजो यदसा आदित्यः॥ ओमित्येतदक्षरस्य चैतत्। तस्मादोमित्यनेनैतदुपासीताजस्रमिति। एकोऽस्य संबोधयिता" इति। एवं ह्याह—

"एतदेवाक्षरं पुण्यमेतदेवाक्षरं परम्।
एतदेवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत्" ॥४॥

अन्यत्रहि म्हटलें आहे कीं—"जो उद्गीथ तोच प्रणव [ॐ] जो प्रणव तोच उद्गीथ" [छां.१.५.१]. हा आदित्य ह्मणजेच उद्गीथ, हाच प्रणव. असें म्हटलें आहे— "प्रणव नामक उद्गीथ, कर्मांचा प्रेरक, प्रभारूप, निद्रारहित, जरारहित, मृत्यु, त्रिपाद [जागृति, स्वप्न, सुषुप्ति], (प्राण, अपान इत्यादि) पांच प्रकारांनीं जाणतां येणारा व बुद्धीचे ठिकाणीं ठेवलेला आहे." आणखी म्हटलें आहे— "त्रिपाद ब्रह्माचें मूळ वर आहे; आकाश, वायु, अग्नि उदक, भूमि इत्यादि त्याच्या शाखा आहेत; 'एक, अश्वत्थ नामक हें ब्रह्म आहे. हा जो आदित्य त्याचें तेज याचेंच, आणि ॐ अक्षराचें तेज याचेंच." [ऋग्वेद १०.९.३,४]. ह्मणून ॐ अशा स्वरूपानें याची सतत उपसना करावी. ॐ हेंच एक ब्रह्माचें ज्ञान करून देणारें साधन आहे. याविषयीं असें म्हटलें आहे— "हेंच अक्षर पुण्यकारक, हेंच अक्षर सर्वश्रेष्ठ हेंच अक्षर जाणलें असतां जाणणारा जें इच्छितो तें त्याचेंच होतें" [कठ.२.१६]. ४.

५ आत्म्याचीं ॐकाररूपें—

अथान्यत्राप्युक्तं स्वनवत्येषाऽस्य तनूः। योमिति, स्त्रीपुंनपुंसकेति लिंगवत्येषा, अथाग्निर्वायुरादित्य इति भास्वत्येषा, अथ ब्रह्मा रुद्रो विष्णुरित्यधिपतिवत्येषा, अथ गार्हपत्यो दक्षिणाग्निराहवनीय इति मुखवत्येषा, अथ ऋग्यजुःसामेति विज्ञानवत्येषा, भूर्भुवः स्वरिति लोकव-

त्येषा, अथ भूतं भव्यं भविष्यदिति कालवत्येषा, अथ प्राणोऽग्निः सूर्य इति प्रतापवत्येषा, अथान्नमापश्चंद्रमा इत्याप्यायनवत्येषा, अथ बुद्धिर्मनोऽहंकार इति चेतनवत्येषा, अथ प्राणोऽपानो व्यान इति प्राणवत्येषेत्यत ओमित्युक्तेनैताः प्रस्तुता अर्चिता अर्पिता भवन्तीति । एवं ह्याह— "एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोमित्येतदक्षर"मिति ॥५॥

अन्यत्र देखील म्हटलें आहे कीं "याची [=प्राणादित्यरूपी आत्म्याची] अ, उ आणि म् ही ॐकाररूपी तनु शब्दवती आहे. स्त्री, पुरुष आणि नपुंसक ही लिंगतनु; अग्नि, वायु, आदित्य ही प्रकाशरूपी तनु; ब्रह्मा, विष्णु, रुद्र ही अधिपतिरूपी; गार्हपत्य, दक्षिणाग्नि, आहवनीय ही मुखरूपी; ऋक्, यजु, साम ही विज्ञानरूपी; भूः, भुवः, स्वः ही लोकरूपी; भूत, भव्य, भविष्य ही कालरूपी; प्राण, अग्नि, सूर्य ही प्रतापरूपी; अन्न, उदक, चंद्र ही वृद्धिरूपी; बुद्धि, मन, अहंकार ही चेतनरूपी; प्राण, अपान, व्यान ही प्राणरूपी. म्हणून ॐ म्हटल्यानें या सर्वांचें स्तवन, पूजन आणि अर्पण होतें. आणखी असें म्हटलें आहे कीं, "सत्यकामा, जें ॐ अक्षर तेंच पर आणि अपर ब्रह्म" [प्रश्न.५.२].५.

६ व्याहृतींची उपासना—

अथाव्याहृतं वा इदमासीत्स सत्यं प्रजापतिस्तपस्तप्त्वाऽनुव्याहरद्भूर्भुवः स्वरित्येषैवास्य प्रजापतेः स्थविष्ठा तनूर्या लोकवतीति । स्वरित्यस्याः शिरो, नाभिर्भुवो, भूः पादा, आदित्यश्चक्षुः, चक्षुरायत्ता हि पुरुषस्य महती मात्रा चक्षुषा ह्ययं मात्राश्चरति, सत्यं वै चक्षुरक्षिण्यवस्थितो हि पुरुषः सर्वार्थेषु चरति । एतस्माद्भूर्भुवः स्वरित्युपासीतानेन हि प्रजापतिर्विश्वात्मा विश्वचक्षुरिवोपासितो भवतीति । एवं ह्याह "एषा वै प्रजापतेर्विश्वभृत्तनूः । एतस्यामिदं सर्वमंतर्हितमस्मिंश्च सर्वस्मिन्नेषाऽन्तर्हितेति" । तस्मादेषोपासीत ॥६॥

प्रारंभीं हें विश्व अव्याहृत [=नबोललेलें, शब्दरहित] होतें. त्या सत्यरूपी व प्रजापतिरूपी आत्म्यानें तप आचरण करून भूः, भुवः आणि स्वः यांचा उच्चार करून हीं निर्माण केलीं. ही लोकरूपी तनु या प्रजापतीचें सर्वांत स्थूल रूप होय. स्वः म्हणजे स्वर्गलोक हें या तनूचें मस्तक, भुवः म्हणजे अंतरिक्ष लोक ही नाभि, भूः म्हणजे पृथिवी हे पाय, आणि आदित्य हा चक्षु. कारण मनुष्याची मात्रा [सांसारिकसिद्धि] चक्षूच्याच स्वाधीन असते व चक्षूनेंच या मात्रांमध्यें संचार करतो. सत्य हाच चक्षु. चक्षूपध्यें स्थित असाच पुरुष सर्व अर्थांमध्यें संचार करतो. म्हणून भूः भुवः स्वः या व्याहृतींनीं आत्म्याची उपासना करावी. या उपासनेनें प्रजापति, विश्वात्मा, विश्वचक्षु अशा आत्म्याची उपासना केल्यासारखें होतें. असें म्हटलें आहे कीं, "ही प्रजापतीची विश्व धारण करणारी तनु आहे. हिच्यामध्यें हें सर्व विश्व अंतर्हित [आंत ठेवलेलें] आहे; आणि या सर्व विश्वामध्यें ही अंतर्हित आहे." म्हणून हिची उपासना करावी. ६.

'तत्सवितुर्वरेण्यं' इत्यसौ वा आदित्यः सविता, स वा एवं प्रवरणीय आत्मकामेनेत्याहुर्ब्रह्मवादिनः। अथ 'भर्गो देवस्य धीमहि' इति सविता वै देवस्ततो योऽस्य भर्गाख्यस्तं चिंतयामीत्याहुर्ब्रह्मवादिनः। अथ 'धियो यो नः प्रचोदयात्' इति बुद्धयो वै धियस्ता योऽस्माकं प्रचोदयादित्याहुर्ब्रह्मवादिनः।

अथ भर्ग इति। यो ह वा अमुष्मिन्नादित्ये निहितस्तारकोऽक्षिणि वैष भर्गाख्यः। भाभिर्गतिरस्य हीति भर्गः। भर्जयतीति वैष भर्ग इति रुद्रो ब्रह्मवादिनः। अथ भ इति भासयतीमाँल्लोकान्र इति रंजयतीमानि भूतानि ग इति गच्छन्त्यस्मिन्नागच्छन्त्यस्मादिमाः प्रजास्तस्माद्भरगत्वाद्भर्गः। शश्वत्सूयमानात्सूर्यः सवनात्स-

विताऽऽदानादादित्यः पवनात्पावनोऽथाऽऽपोऽप्यायनादिति। एवं ह्याह—खल्वात्मनोऽऽत्मा नेताऽमृताख्यश्चेता मंता गंतोत्स्रष्टाऽऽनंदयिता कर्ता वक्ता रसयिता घ्राता द्रष्टा श्रोता स्पृशति च विभुर्विग्रहे संनिविष्ट इति। एवं ह्याह—

अथ यत्र द्वैधीभूतं विज्ञानं तत्र हि शृणोति पश्यति जिघ्रति रसयति चैव स्पर्शयति सर्वमात्मा जानीतेति। यत्राद्वैधीभूतं विज्ञानं कार्यकारणकर्मनिर्मुक्तं निर्वचनमनौपम्यं निरुपाख्यं, किंतदवाच्यम्॥७॥

'तत्सवितुर्वरेण्यं' [=सवित्याच्या त्या इष्ट (तेजाचें)] येथें हा आदित्य म्हणजेच सविता. आत्मप्राप्तीची इच्छा करणारानें त्याचीच प्रार्थना करावी असें ब्रह्मवादी म्हणतात. भर्गो देवस्य धीमहि[=देवाच्या तेजाचें आह्मी ध्यान करतों] येथें सविता हाच देव. म्हणून याचें जें तेज त्याचें मीं चिंतन करतों असें ब्रह्मवादी म्हणतात. 'धियो यो नः प्रचोदयात' [=जो आमच्या विचारांना प्रेरणा करो] येथें धियः म्हणजे विचार आमच्या विचारांना तो प्रेरणा करो असें ब्रह्मवादी म्हणतात.

आतां भर्ग म्हणजे काय तें सांगतात—

जें त्या आदित्यामध्यें ठेवलेलें तेज, किंवा डोळ्यामधलें तारक [अंतर्बुबुळ], त्याला भर्ग म्हणतात. 'भाभिः गतिः अस्य' [ज्याची किरणांनीं गति असते] म्हणून भर्ग; किंवा 'भर्जयति' [संहार करतो] म्हणून रुद्र हा भर्ग असें ब्रह्मवादी म्हणतात. किंवा भ=भासयति, हे लोक भासमान करतो; र=रंजयति, या प्राण्यांचें रंजन करतो; ग=गच्छन्ति—आगच्छन्ति, याच्यापासून या सर्व प्रजा जातात आणि येतात; अशा प्रकारचें भ—र—ग म्हणून भर्ग. सूयमान म्हणजे ज्याच्या करितां यज्ञांत सोमाचें सवन केलें जातें, म्हणून सविता. आदान=

घेणें, म्हणून 'आदित्य' पवन=पावन करणें, म्हणून 'पावन' आप्यायन=वाढणें, म्हणून 'आपः'।

असें म्हटलें आहे कीं, "(मर्त्य) आत्म्याचा (म्हणजे मनुष्याचा) अमर आत्मा नेता आहे. तो जाणणारा, विचार करणारा, जाणारा, उत्पन्न करणारा, आनंद देणारा, करणारा, बोलणारा, स्वाद देणारा, वास घेणारा, पहाणारा, ऐकणारा आणि स्पर्श करणारा असून सर्वव्यापी व (प्रत्येक) शरीरामध्यें स्थित आहे असें म्हटलें आहे कीं, "(ज्ञानाचा कर्ता व कर्म असें) दोन प्रकारचें जेथें ज्ञान असतें तेथें (मनुष्य) ऐकतो, पहातो, वास घेतो, स्वाद घेतो, स्पर्श करण्यास लावतो, तें सर्व आत्मा जाणतो. जेथें ज्ञान एकच, कार्य—कारण—व—कर्म—रहित, सांगतां न येण्यासारखें, उपमा न देतां येण्यासारखें, दाखवितां न येण्यासारखें असतें तें काय? तर तेंच अवाच्य ब्रह्म.७.

८ आत्म्याची रूपें—

एष हि खल्वात्मेशानः शंभुर्भवो रुद्रः प्रजापतिर्विश्वसृग्घिरण्यगर्भः सत्यं प्राणो हंसः शास्ता विष्णुर्नारायणोऽर्कः सविता धाता विधाता सम्राडिंद्र इंदुरिति। य एष तपत्यग्निरिवाग्निना पिहितः सहस्राक्षेण हिरण्मयेनांडेन एष वाव जिज्ञासितव्योऽन्वेष्टव्यः। सर्वभूतेभ्योऽभयं दत्त्वाऽरण्यं गत्वाऽथ बहिः कृत्वेंद्रियार्थान्स्वाच्छरीरादुपलभेतेनमिति।

"विश्वरूपं हरिणं जातवेदसं
परायणं ज्योतिरेकं तपंतम्॥
सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः
प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः" ॥८॥

हाच आत्मा ईशान [विश्वाचा स्वामी], शंभु [कल्याणकर], भव

[अस्तित्वरूपी], रुद्र [संहारक], प्रजापति, विश्वाचा उत्पन्नकर्ता, हिरण्यगर्भ [ब्रह्मदेव], सत्य, प्राण, हंस, राज्यकर्ता, विष्णु, नारायण, प्रकाशमान सूर्य, उत्पन्नकर्ता, नियमनकर्ता, सम्राट्, इंद्र, चंद्र होय. अग्नीनें झांकल्यासारखा, सहस्र नेत्रांनीं व सुवर्णरूप अंडानें अग्नीसारखा जो हा (आदित्य) तपन पावतो त्याचेंच (आत्मरूपानें) ज्ञान करून ध्यावें. त्याचा शोध करावा. सर्व भूतांना अभय देऊन, अरण्यांत जाऊन इंद्रियाचे विषय बाहेर लोटून स्वतः-च्या शरीरामधूनच याची प्राप्ति करून ध्यावी." "विश्वरूप, किरणयुक्त, सर्व वस्तुजात जाणणारा, सर्व प्राणाचा आश्रय, प्रकाशरूप, एक, तपन पावणारा, असंख्यरश्मि, अनेकधा वर्तमान व प्रजांचा प्राण असा हा सूर्य" आदित्यरूपी प्राण होय" [प्रश्न. १.८]. ८.
९ प्राणरूपी आत्म्याला आहुति—

तस्माद्वा एष उभयात्मैवंवित्। आत्मन्येवाभिध्यायत्यात्मन्येव यजतीति ध्यानं प्रयोगस्थं मनो विद्वद्भिः ष्टुतं, मनःपूर्तिं 'उच्छिष्टोपहतं' इत्यनेन तत्पावयेत्। मंत्रं पठति--"उच्छिष्टोच्छिष्टोपहतं यच्च पापेन दत्तं मृतसूतकाद्वा वसोः पवित्रमग्निः सावितुश्च रश्मयः पुनन्त्वन्नं मम दुष्कृतं च यदन्यत्"। अद्भिः पुरस्तात्परिदधाति। प्राणाय स्वाहाऽपानाय स्वाहा व्यानाय स्वाहा समानाय स्वाहोदानाय स्वाहेति पंचाभिरभिजुहोति। अथावशिष्टं यतवागश्नात्यतोऽद्भिर्भूय एवोपरिष्टात्परिदधात्याचान्तो भूत्वाऽऽत्मेज्यानः 'प्राणोऽग्नि' 'र्विश्वोऽसी'ति च द्वाभ्यामात्मानमभिध्यायेत्। "प्राणोऽग्निः परमात्मा वै पंचवायुः समाश्रितः। स प्रीतः प्रीणातु विश्वं विश्वभुक्"।

"विश्वोऽसि वैश्वानरोऽसि विश्वं
विश्वं त्वया धार्यते जायमानम्॥
विशन्तु त्वामाहुतयश्च सर्वाः

प्रजास्तत्र यत्र विश्वामृतोऽसी''ति ॥
एवं न विधिना खल्वनेनात्ताऽन्नत्वं पुनरुपैति ॥९॥

म्हणून हें जो जाणतो त्याला (प्राण व आदित्य) हे दोन्ही प्राप्त होतात. आत्म्यामध्येंच ध्यान करतें आणि आत्म्यामध्येंच यजन करतें असें ध्यान व यजन करणारें मन चांगलें अशी विद्वानांनीं त्याची स्तुति केली आहे. मनाचा अशुद्धपणा ''उच्छिष्टोपहतं०'' या मंत्रानें पावन करावा—''उष्टें, उष्ट्याचा स्पर्श झालेलें, पापी मनुष्यानें जें दिलें आहे, मृतसूतकाच्या [=सुतक आलेल्या माणसाच्या] स्पर्शामुळें अशुद्ध झालेलें माझें अन्न,—वसुनामक देवाचें पावित्र्य, अग्नि आणि सूर्याचे किरण, पावन करोत. दुसरें जें कांहीं माझें पापाचरण असेल तेंहि पावन करोत.'' असें म्हणून उदकानें अन्न सभोंवार सिंचन करावें. 'प्राणाय स्वाहा' इत्यादि क्रमानें प्राण, अपान, व्यान, समान आणि उदान अशा पांच आहुति द्याव्या. राहिलेलें अन्न वाचेचें नियमन करून खावें. नंतर पुनः उदकानें वर सिंचन करावें. नंतर आचमन केल्यावर आत्मोपासकानें 'प्राणोऽग्निः०' आणि 'विश्वोऽसि०' या दोन मंत्रांनीं आत्म्याचें ध्यान करावें—''परमात्मा प्राण आणि अग्नि या दोन रूपांनीं पांच वायूंमध्यें राहिला आहे. सर्व भक्षणकर्ता तो संतुष्ट होत्साता विश्वाला संतुष्ट करो.'' ''तूं विश्व आहेस, वैश्वानर आहेस. उत्पन्न झालेलें विश्व तूंच धारण केलें आहेस. सर्व आहुति तुझ्यामध्यें प्रवेश करोत. विश्वरूपी व अमर असा तूं जेथें आहेस तेथें सर्व प्रजा असतात.'' अशा प्रकारें या विधीनें जो अन्न भक्षण करतो तो पुनः अन्न होत नाहीं, म्हणजे त्याला कोणी भक्षण करीत नाहीं. ९.

१० भोक्ता आणि भोज्य—

अथापरं वेदितव्यं, "उत्तरो विकारोऽस्याऽऽत्मयज्ञस्य यथाऽन्नमन्नादश्चेत्यस्योपव्याख्यानम्। पुरुषश्चेता प्रधानांतःस्थः, स एव भोक्ता प्राकृतमन्नं भुंक्त इति। तस्यायं भूतात्मा ह्यन्नमस्य कर्ता प्रधानः। तस्मात्त्रिगुणं भोज्यं भोक्ता पुरुषोऽतःस्थः। अत्र दृष्टं नाम प्रत्ययम्। यस्माद्बीजसंभवा हि पशवस्तस्माद्बीजं भोज्यमनेनैव प्रधानस्य भोज्यत्वं व्याख्यातम्। तस्माभोक्ता पुरुषो भोज्या प्रकृतिस्तत्स्थो भुंक्त इति। प्राकृतमन्नं त्रिगुणभेदपरिणामत्वान्महदाद्यं विशेषांतं लिंगम्। अनेनैव चतुर्दशविधस्य मार्गस्य व्याख्या कृता भवति। "सुखदुःखमोहसंज्ञं ह्यन्नभूतमिदं जगत्"। न हि बीजस्य स्वादुपरिग्रहोऽस्तीति यावन्न प्रसूतिः। तस्याप्येवं तिसृष्ववस्थास्वन्नत्वं भवति, कौमारं यौवनं जरा, परिणामत्वात्तदन्नत्वम्। एवं प्रधानस्य व्यक्ततां गतस्योपलब्धिर्भवति, तत्र बुद्ध्यादीनि स्वादुनि भवन्ति अध्यवसायसंकल्पाभिमाना इति। अथेंद्रियार्थान्पंच स्वादुनि भवन्ति। एवं सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि। एवं व्यक्तमन्नमव्यक्तमन्नं अस्य निर्गुणो भोक्ता, भोक्तृत्वाच्चैतन्यं प्रसिद्धं तस्य। यथाऽग्निर्वै देवानामन्नादः सोमोऽन्नमग्निनैवान्नमित्येवंवित्। सोमसंज्ञोऽयं भूतात्माग्निसंज्ञोऽप्यव्यक्तमुखा इति। वचनात् "पुरुषो ह्यव्यक्तमुखेन त्रिगुणं भुंक्ता" इति। यो हैवं वेद संन्यासी योगी चाऽऽत्मयाजी चेति। अथ यद्वन्न कश्चिच्छून्यागारे कामिन्यः प्रविष्टाः स्पृशतींद्रियार्थांस्तद्वद्यो न स्पृशति प्रविष्टान्संन्यासी योगी चाऽऽत्मयाजी चेति ॥१०॥

आतां याहून अधिक ज्ञान आहे—या आत्मयज्ञाचा अन्न आणि अन्न खाणारा असा आणखी विकार आहे. त्याचें स्पष्टीकरण—प्रकृतीमध्यें रहाणारा पुरुष हा ज्ञाता; तोच भोक्ता, तो प्रकृतिरूप अन्न खातो. हा भूतात्मा त्याचेंच अन्न; आणि भूतात्म्याचा कर्ता प्रकृति. म्हणून भोज्य त्रिगुणात्मक आहे, आणि भोक्ता पुरुष मध्यें आहे. याविषयीं प्रत्यक्ष दर्शन हेंच प्रमाण. ज्या अर्थी बीजापासून

प्राणी उत्पन्न होतात त्याअर्थी बीज हें भोज्य. या नियमानें प्रकृतीचें भोज्यत्व सांगितलें आहे. म्हणून पुरुष भोक्ता आणि प्रकृति भोज्य. तिच्या ठिकाणीं स्थित होत्साता तो भोगतो. प्रकृतीपासून उत्पन्न झालेलें अन्न त्रिगुणांच्या भेदानें परिणाम (म्हणजे विकार) पावून 'महत्'पासून 'विशेषा'पर्यंत लिंगशरीर होतें. या नियमानेंच्च चवदा प्रकारच्या मार्गाची व्याख्या करतात. "सुख, दुःख आणि मोह नामक हें सर्व जगत् अन्न आहे. जोंपर्यंत उत्पत्ति नाहीं तोंपर्यंत बीजाच्या गोडपणाचा अनुभव नाहीं. प्रकृति देखील तीन अवस्थांमध्यें अन्नत्व पावते. कौमार, यौवन आणि जरा या त्या तीन अवस्था. विकार झाल्यामुळें हें अन्नत्व येतें. याप्रकारें प्रकृति व्यक्त अवस्थेला गेली म्हणजे तिची उपलब्धि [=दर्शन, अनुभव] होते. त्या स्वादुपणामध्यें निश्चय, संकल्प, अभिमान इत्यादि प्रकारें बुद्धि व इतर उत्पन्न होतात. इंद्रियांच्या विषयांकरितां पांच इंद्रियें या स्वादुपणामध्येंच होतात. या प्रकारेंच सर्व इंद्रियांचीं कर्में व प्राणांचीं कर्में होतात. या प्रकारें व्यक्त तेंहि अन्न आणि अव्यक्त तेंहि अन्न. यांचा भोक्ता गुणातीत आहे. भोक्तृत्वामुळें त्याचें ज्ञातृत्व प्रसिद्ध आहे. जसा अग्नि हा देवांचा अन्न खाणारा आणि सोम हें अन्न. हें जो जाणतो तो अग्निसह अन्न भक्षण करतो. या भूतात्म्याला सोम म्हणतात. अव्यक्त ज्याचें मुख तो अग्नि ? कारण "पुरुष अव्यक्त मुखानें तीन गुण भोगतो" असें वचन आहे. जो हें अशा प्रकारें जाणतो तो संन्यासी, तो योगी आणि तो आत्मयाजी. ज्याप्रमाणें पुरुषशून्य गृहामध्यें प्रवेश करणाऱ्या स्त्रियांना कोणी स्पर्श करीत नाहीं, त्याप्रमाणें

जो (शरीरांत) प्रवेश करणाऱ्या विषयांना स्पर्श करीत नाहीं तोच संन्यासी, तोच योगी, तोच आत्मयाजी. १०.

'महदाद्यं विशेषांतं'=महत् किंवा बुद्धि, बुद्धीपासून अहंकार, अहंकारापासून रूप, रस, गंध, शब्द आणि स्पर्श या पांच तन्मात्रा; आणि या पांच तन्मात्रांपासून पांच ज्ञानेंद्रियें आणि पांच कर्मेंद्रियें हे विकार. विशेष=विकार. चतुर्दशविध मार्ग=पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार.

परं वा एतदात्मनो रूपं यदन्नं, अन्नमयो ह्ययं प्राणः। "अथ न यद्यश्नात्यमंताऽश्रोताऽस्प्रष्टाऽद्रष्टाऽवक्ताऽघ्राताऽरसयिता भवति प्राणांश्चोत्सृजतीति"। एवं ह्याह—"अथ यदि खल्वश्नाति प्राणसमृद्धो भूत्वा मंता भवति श्रोता भवति स्प्रष्टा भवति वक्ता भवति रसयिता भवति घ्राता भवति द्रष्टा भवतीति। एवं ह्याह—अन्नाद्वै प्रजाः प्रजायन्ते याः काश्चित्पृथिवीश्रिताः। अतोऽन्नेनैव जीवन्त्यथैतदपियन्त्यंततः" ॥११॥

अन्न हें आत्म्याचें श्रेष्ठ रूप आहे. कारण हा प्राण अन्नमय आहे. "जर (मनुष्य) खाणार नाहीं तर तो अमंता, अश्रोता, अस्प्रष्टा, अद्रष्टा, अवक्ता, अघ्राता, आणि अरसयिता होईल; प्राण देखील सोडील" [छां.७.९.१]. असें ह्मटलें आहे कीं, "जर अन्न खाईल तर प्राणानें समृद्ध होऊन मनन करणारा होईल, ऐकणारा, स्पर्श करणारा, बोलणारा, चाखणारा, वास घेणारा आणि पहाणारा होईल." असें ह्मटलें आहे कीं, "ज्या कोणी पृथिवीचा आश्रय करणाऱ्या आहेत त्या सर्व प्रजा अन्नापासून उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर अन्नानेंच जगतात आणि अखेरीस त्यामध्यें ह्मणजे अन्नात्मक पृथिवीमध्येंच लय पावतात" [तैत्ति.२.२.]. ११.

अथान्यत्राप्युक्तं "सर्वाणि ह वा इमानि भूतान्यहरहः प्रपतन्त्यन्नमभिजिघृक्षमाणानि। सूर्यो रश्मिभिरादत्यन्नं तेनासौ तपत्यन्नेनाभिषिक्ताः पतन्तीमे प्राणा अग्निर्वा अन्नेनाभिज्वलत्यन्नकामेनेदं प्रकल्पितं ब्रह्मणा"। अतोऽन्नमात्मेत्युपासीतेति। एवं ह्याह—

"अन्नाद्भूतानि जायन्ते जातान्यन्नेन वर्धन्ते।
अद्यतेऽत्ति च भूतानि तस्मादन्नं तदुच्यते" ॥१२॥

अन्यत्रहि म्हटलें आहे— "हे सर्व प्राणी दररोज अन्न खाण्याच्या इच्छेनें सर्वत्र भ्रमण करतात. सूर्य (आपल्या) किरणांनीं अन्न घेतो, त्यानें तो तपन पावतो. अन्नानें अभिषिक्त झालेलीं इंद्रियें आपापले व्यापार करतात. अग्नि अन्नानें ज्वलन पावतो. अन्नाच्या इच्छा करून ब्रह्मदेवानें ही सृष्टि निर्माण केली. म्हणून अन्न हा आत्मा असें समजून त्याची उपासना करावी. असें म्हटलें आहे कीं, "अन्नापासून प्राणी उत्पन्न होतात, उत्पन्न झालेले अन्नानें वाढतात. (प्राण्यांकडून) अद्यते म्हणजे खाल्लें जातें व प्राण्यांना आत्ति म्हणजे खातें म्हणून याला अन्न म्हणतात" [तैत्ति.२.२]. १२.

अथान्यत्राप्युक्तं "विश्वभृद्वै नामैषा तनूर्भगवतो विष्णोर्यदिदमन्नम्"। प्राणो वा अन्नस्य रसो, मनः प्राणस्य विज्ञानं मनस आनंदं विज्ञानस्येत्यन्नवान्प्राणवान्मनस्वान्विज्ञानवानानंदवांश्च भवति यो हैवं वेद। यावन्तीह वै भूतान्यन्नमदन्ति तावत्स्वंतःस्थोऽन्नमत्ति यो हैवं वेद।

"अन्नमेव विजरन्नमन्नं संवननं स्मृतम् ॥
अन्नं पशूनां प्राणोऽन्नं ज्येष्ठमन्नं भिषक्स्मृतम् ॥१३॥

अन्यत्रहि म्हटलें आहे— "जें हें अन्न तीं भगवान् विष्णूची विश्वभृत् नामक तनु होय." प्राण हा अन्नाचा रस, मन प्राणाचा रस, विज्ञान मनाचा रस आणि आनंद विज्ञानाचा रस. जो याप्रमाणें

जाणतो तो अन्नवान्, प्राणवान्, मनस्वान्, विज्ञानवान् आणि आनंदवान् होतो; जेवढे म्हणून प्राणी अन्न खातात त्यांच्यामध्यें बसणारा (म्ह० त्यांचा स्वामी) होत्साता अन्न खातो, "जरेचा नाश करणारें अन्नच आहे, संग्रह करण्याला योग्य अन्नच आहे, अन्न हा पशूंचा प्राण आहे, अन्न प्रथमोत्पन्न आहे. अन्न हें औषध आहे. १३.

अथान्यत्राप्युक्तं "अन्नं वा अस्य सर्वस्य योनिः, कालश्चान्नस्य, सूर्यो योनिः कालस्य। तस्यैतद्रूपं यन्निमेषादिकालात्संभृतं द्वादशात्मकं वत्सरमेतस्याऽऽग्नेयमर्धमर्धं वारुणम्। मघाद्यं श्रविष्ठार्धमाग्नेयं क्रमेणोत्क्रमेण सार्पाद्यं श्रविष्ठार्धांतं सौम्यम्। तत्रैकैकमात्मनो नवांशकं सचारकविधं सौक्ष्म्यत्वादेतत्प्रमाणमनेनैव प्रमीयते हि कालः। न विना प्रमाणेन प्रमेयस्योपलब्धिः। प्रमेयोऽपि प्रमाणतां पृथक्त्वादुपैत्यात्मसंबोधनार्थमिति। एवं ह्याह— "यावत्यो वै कालस्य कलास्तावतीषु चरत्यसौ"। यः कालं ब्रह्मेत्युपासीत कालस्तस्यातिदूरमपसरतीति। एवं ह्याह—

"कालात्स्रवन्ति भूतानि कालाद्वृद्धिं प्रयान्ति च।
काले चास्तं नियच्छन्ति कालो मूर्तिरमूर्तिमान्"॥१४॥

आणखी म्हटलें आहे कीं, या सर्वांचें उत्पत्तिकारण अन्न आहे, अन्नाचें उत्पत्तिकारण काल, आणि कालाचें उत्पत्तिकारण सूर्य. निमेषापासून वाढत बारा महिन्यांचें वर्ष होतें तें या कालाचें रूप. यांतलें अर्धें अग्नीचें म्हणजे उष्णतेचें आणि अर्धें वरुणाचें म्हणजे उदकाचें. मघा नक्षत्राच्या आरंभापासून धनिष्ठा नक्षत्राच्या अर्धापर्यंत सूर्य खालीं जात असतो (किंवा दक्षिणेकडे जात असतो) तें अग्नीचें अर्ध; आणि आश्लेषा नक्षत्राच्या आरंभापासून श्रविष्ठेच्या अर्धापर्यंत सूर्य वर जात असतो तेव्हां तें सौम्य किंवा चंद्राचें अर्ध. सूर्याच्या

संचाराप्रमाणें नक्षत्रांचे नऊ पाद म्हणजे (सूर्यरूपी) आत्म्याचा एकेक महिना झाला. काळाच्या सूक्ष्मपणामुळें हें प्रमाण घेतात. या प्रमाणानें काळ मोजतात. प्रमाणावांचून प्रमेयाची उपलब्धि नाहीं. प्रमेय [येथें काळ] देखील विभागांमुळें स्वतःचें ज्ञान करून देण्याकरितां (दीपाप्रमाणें) प्रमाणत्व पावेल. असें म्हटलें आहे कीं, "जितक्या काळाच्या कला आहेत तितक्या सर्वांमधून हा (सूर्य) संचार करतो. जो काळाची ब्रह्म म्हणून उपासना करतो त्याचा काळ दूर दूर जातो [=म्हणजे तो पुष्कळ काळ जगतो] आणखी म्हटलें आहे— काळापासून भूतें उत्पन्न होतात, काळामुळेंच वृद्धि पावतात; आणि काळामध्यें लय पावतात. काळ (आदित्यरूपानें) मूर्त आणि (संवत्सरादिरूपानें) अमूर्त आहे." १४.

"मघाद्यं श्रविष्ठार्धं आग्नेयं, सार्पाद्यं श्रविष्ठार्धांतं सौम्यं" याचें भाषांतर मूळाला अनुसरून वर दिलें आहे. पण मूळांतले हे शब्द उघड चुकीचे आहेत. "मघाद्यं श्रविष्ठार्धं" म्हटल्यावर "श्रविष्ठार्धाद्यं सार्पांतं" असेच शब्द पुढें यावयास पाहिजेत. असे शब्द असले म्हणजे "मघा नक्षत्राच्या आरंभापासून श्रविष्ठा नक्षत्राच्या अर्धापर्यंत, आणि श्रविष्ठा नक्षत्राच्या अर्धापासून आश्लेषा [सर्प] संपेपर्यंत" असा अर्थ होईल, व तो नक्षत्रांच्या क्रमाप्रमाणें युक्त होईल. जरी असा बदल केला, तरी दुसरी अडचण आहेच. यांतल्या पहिल्या भागाला आग्नेय अर्ध=उन्हाळा, व दुसऱ्याला सौम्य=हिंवाळा, असें म्हटलें आहे. पण लगेच, पहिल्या अर्धांत सूर्य दक्षिणकडे व दुसऱ्या अर्धांत उत्तरेकडे जातो, असेंहि म्हटलें आहे! हा दुसरा घोटाळा. म्हणून अर्धांचीं नांवेंहि उलट केलीं पाहिजेत. आश्लेषांच्या अर्धापासून दक्षिणायन, आणि श्रविष्ठांच्या आरंभापासून उदगयन, सुरू होतात. अशी ऋग्वेदकालची कालस्थिति 'भारतीय ज्योतिःशास्त्र' पृ. ८७ मध्यें सांगितली आहे. वरीलप्रमाणें फेरबदल केला तर या स्थितीशीं वरील स्थिति जुळेल.

द्वे वाव ब्रह्मणो रूपे कालश्चाकालश्चाथ यः प्रागादित्यात्सोऽकालोऽकलोऽथ य आदित्याद्यः स कालः सकलः। सकलस्य वा एतद्रूपं यत्संवत्सरः। संवत्सरात्खल्वेवेमाः प्रजाः प्रजायन्ते, संवत्सरेणेह वै जाता विवर्धन्ते, संवत्सरे प्रत्यस्तं यन्ति। तस्मात्संवत्सरो वै प्रजापतिः कालोऽन्नं ब्रह्मनीडमात्मा चेति। एवं ह्याह—

"कालः पचति भूतानि सर्वाण्येव महात्मनि॥
यस्मिंस्तु पच्यते कालो यस्तं वेद स वेदवित्"॥१५॥

ब्रह्माचीं दोन रूपें आहेत, काल आणि अकाल. सूर्याच्या उत्पत्तीच्या पूर्वीचा जो तो अकाल आणि अ-कल [निरवयव]. सूर्याच्या उत्पत्तीपासूनचा जो तो काल आणि तो स-कल आहे. हें जें संवत्सर तें स-कल कालाचें रूप. खरोखर हे सर्व प्राणी संवत्सरापासून उत्पन्न होतात. उत्पन्न झाल्यावर संवत्सरानें वाढतात, आणि संवत्सरामध्येंच अस्त पावतात. म्हणून संवत्सर हाच प्रजापति, काल, अन्न, ब्रह्माचें स्थान आणि आत्मा. असें म्हटलें आहे कीं, "महान् आत्म्यामध्यें सर्व प्राण्यांचें पचन हा काल करतो. पण हा काल ज्याच्यामध्यें पचतो त्या आत्म्याला जो जाणतो तोच ज्ञानी." १५.

विग्रहवानेष कालः सिंधुराजः प्रजानाम्। एष तत्स्थः सविताख्यो यस्मादेवेमे चंद्रर्क्षग्रहसंवत्सरादयः सूयन्ते अथैभ्यः सर्वमिदमत्र वा यत्किंचिच्छुभाशुभं दृश्यतेह लोके तदेतेभ्यः। तस्मादादित्यात्मा ब्रह्माथ कालसंज्ञमादित्यमुपासीत "आदित्यो ब्रह्म" इत्येके। अथैवं ह्याह—

'होता भोक्ता हविर्मंत्रो यज्ञो विष्णुः प्रजापतिः।
सर्वः कश्चित्प्रभुः साक्षी योऽमुष्मिन्भाति मंडले" ॥१६॥

काल हा प्राण्यांचा मूर्तिमंत सागर [=आपल्या पोटांत सर्वांचा

समावेश करणारा अथवा सर्वांना गडप करणारा] होय. ज्याला सविता म्हणतात आणि ज्याच्यापासूनच हे चंद्र, नक्षत्र, ग्रह, संवत्सर इत्यादि उत्पन्न होतात तो हा त्याच्या ठिकाणीं स्थित आहे. हें सर्व किंवा जें जें म्हणून शुभाशुभ या लोकीं दिसतें तें सर्व यांच्यापासून उत्पन्न झालें. म्हणून ब्रह्म आदित्याचा आत्मा होय. काल नामक आदित्याची उपासना करावी. "आदित्य म्हणजेच ब्रह्म" [छां.३.१९.१] असें कोणी म्हणतात. असेंहि म्हटलें आहे– "जो या मंडलामध्यें प्रकाश पावतो तोच होता, भोक्ता, हवि, मंत्र, यज्ञ, विष्णु, प्रजापति जें म्हणून कांहीं आहे तें सर्व, प्रभु आणि साक्षी आहे." १६.

१७ ब्रह्म अनंत व एक––

ब्रह्म ह वा इदमग्र आसीदेकोऽनंतः प्रागनंतो दक्षिणतोऽनंतः प्रतीच्यनंत ऊर्ध्वं चावाङ्च सर्वतोऽनंतः। न ह्यस्य प्राच्यादिदिशः कल्पन्तेऽथ तिर्यग्वाऽवाङ्वोर्ध्वं वा। अनूह्य एष परमात्माऽपरिमितोऽजोऽतर्क्योऽचिंत्यः। एष आकाशात्मैव। एष कृत्स्नक्षय एको जागर्तीति। एतस्मादाकाशादेष खल्विदं चेतामात्रं बोधयत्यनेनैव चेदं ध्यायतेऽस्मिंश्च प्रत्यस्तं याति। अस्यैतद्भास्वरं रूपं यदमुष्मिन्नादित्ये तपत्यग्नौ चाधूमकं यज्ज्योतिश्चित्रतरमुदरस्थोऽथ वा यः पचत्यन्नमिति। एवं ह्याह—यश्चैषोऽग्नौ यश्चायं हृदये यश्चासावादित्ये स एष एक" इत्येकस्य हैकत्वमेति य एवं वेद ॥१७॥

(सृष्टीच्या) आरंभीं फक्त ब्रह्म होतें. तें एक व अनंत होतें पूर्वेकडे अनंत, दक्षिणेकडे अनंत, पश्चिमेकडे अनंत, उत्तरेकडे अनंत, वर अनंत, खालीं अनंत, सर्व बाजूंनीं अनंत, असें होतें. त्याला पूर्व इत्यादि दिशा नाहींत. वांकडें, खालचें, वरचें त्याला नाहीं. ज्याचें

वर्णन करतां येत नाहीं असा हा परमात्मा अपरिमित, अज, अतर्क्य [तर्कानें जाणण्यास अशक्य], अचिंत्य आहे. हा आकाशासारखा आहे. सर्व विश्वाच्या लयकालीं (देखील) हा एकटा जागृत असतो. अशा या (ब्रह्मरूपी) आकाशापासून हा हें सर्व विचाररूप विश्व जागृत करतो. हा हें ध्यानानें उत्पन्न करतो व याच्यामध्येंच हें लय पावतें. जें या आदित्यामध्यें तपन पावतें, धूमरहित अग्नीमध्यें जी ज्योति आहे, किंवा याहून आश्चर्यकारक म्हणजे उदरस्थ अग्नि जो अन्न पचवितो तें सर्व याचेंच प्रकाशणारें रूप होय. असें म्हटलें आहे-- "जो हा अग्नीमध्यें आहे, जो हा हृदयांत आहे, आणि जो आदित्यामध्यें आहे तो हा एक (परमात्मा) होय." या जो प्रकारें जाणतो तो या एकाशीं एकरूप पावतो.१७.

तथा तत्प्रयोगकल्पः। प्राणायामः प्रत्याहारो ध्यानं धारणा तर्कः समाधिः षडंग इत्युच्यते योगः। अनेन "यदा पश्यन्पश्यति रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्म योनिम्। तदा विद्वान्पुण्यपापे विहाय परेऽव्यये सर्वमेकीकरोति"। एवं ह्याह—

"यथा पर्वतमादीप्तं नाऽऽश्रयन्ति मृगाद्विजाः॥
तद्वद्ब्रह्मविदो दोषा नाऽऽश्रयान्ति कदाचन" ॥१८॥

हें (एकरूप) जाणण्याचा विधि किंवा साधन-- प्राणायाम [प्राणांचें नियमन], प्रत्याहार [इंद्रियवृत्तिनिरोध], ध्यान, धारणा [चित्तैकाग्रता], तर्क [बुद्धिद्वारा एकाग्रता] आणि समाधि असा सहा प्रकारचा योग (हेंच साधन होय). यानें "सुवर्णवर्ण, कर्ता, ईश, पुरुष, ब्रह्म, जगताचें आदिकारण जेव्हां ज्ञानी प्रत्यक्ष पहातो तेव्हां तो पुण्य व पाप झाडून टाकून अव्यय परब्रह्मामध्यें हें सर्व विश्व

एक आहे असें जाणतो" [मुंडक. ३.१.२ पहिले तीन चरण]. असें म्हटलें आहे—"ज्याप्रमाणें पेटलेल्या पर्वताचा पशु आणि पक्षी आश्रय करीत नाहींत, त्याप्रमाणें दोष केव्हांहि ब्रह्मवेत्त्यांचा आश्रय करीत नाहींत." १८.

अथान्यत्राप्युक्तं "यदा वै बहिर्विद्वान्मनो नियम्येंद्रियार्थांश्च प्राणो निवेशयित्वा निःसंकल्पस्ततास्तिष्ठेत्। अप्राणादिह यस्मात्संभूतः प्राणसंज्ञको जीवस्तस्मात्प्राणो वै तुर्याख्ये धारयेत्प्राणमिति"। एवं ह्याह—

"अचित्तं चित्तमध्यस्थमचिंत्यं गुह्यमुत्तमम्।
तत्र चित्तं निधायेत तच्च लिंगं निराश्रयम्" ॥१९॥

अन्यत्रहि सांगितलें आहे कीं, "जेव्हां ज्ञानी बाह्य विषयांपासून मनाचें नियमन करतो, आणि त्याचा प्राण इंद्रियार्थांना बसवितो, तेव्हां त्यानें निःसंकल्प रहावें. ज्या अर्थीं प्राण नामक जीव अप्राणापासून उत्पन्न झाला आहे, त्या अर्थीं तुर्यावस्थेंत प्राणानें प्राण धारण करावा." आणखी म्हटलें आहे कीं, "जें चित्ताहून वेगळें, जें चित्ताच्या मध्यभागीं स्थित आहे, अचिंत्य, गुह्य व उत्तम, त्याच्या ठिकाणीं चित्त ठेवावें. तेव्हां तें सूक्ष्म, जीवरूप व निराश्रय होत (म्हणजे वेगळें भासत नाहीं)." १९.

अथान्यत्राप्युक्तं "अतः पराऽस्य धारणा तालुरसनाग्रनिपीडनाद्वाङ्मनःप्राणनिरोधनाद्ब्रह्म तर्केण पश्यति। यदाऽऽत्मनाऽऽत्मानमणोरणीयांसं द्योतमानं मनःक्षयात्पश्यति, तदाऽऽत्मनाऽऽत्मानं दृष्ट्वा निरात्मा भवति, निरात्मकत्वादसंख्योऽयोनिश्चिंत्यो मोक्षलक्षणमित्येतत्परं रहस्यमिति। एवं ह्याह—

"चित्तस्य हि प्रसादेन हन्ति कर्म शुभाशुभम्॥
प्रसन्नात्माऽऽत्मानि स्थित्वा सुखमव्ययमश्नुता" इति ॥२०॥

अन्यत्र लिहिलें आहे— "याहून अधिक धारणा आहे. जिभेचें अग्र तालुमध्यें म्हणजे जिभेच्या उगमस्थानीं लावून वाणी—मन—व प्राण यांचा निरोध केल्यानें निश्चयपूर्वक ज्ञानानें (योगी) ब्रह्म पहातो. जेव्हां अणूपेक्षां अणु, प्रकाशमान अशा आत्म्याला मनाच्या नाशामुळें पहातो, तेव्हां आत्म्यानें आत्मा पाहिल्यामुळें तो निरात्मा होतो. निरात्मकत्वामुळें तो (योगी) असंख्य, अयोनि व मोक्षाचें लक्षण असा समजावा. हें परम रहस्य होय. असें म्हटलें आहे—"चित्ताच्या प्रसन्नतेनें शुभाशुभ कर्म नष्ट करतो; आणि प्रसन्नचित्त झाल्यावर आत्म्याचे ठिकाणीं स्थित होऊन अक्षय सुख पावतो."२०.

अथान्यत्राप्युक्तं ऊर्ध्वगा नाडी सुषुम्नाख्या प्राणसंचारिणी तात्वंतर्विच्छिन्ना तया प्राणोंकारमनोयुक्तया ऊर्ध्वमुत्क्रमेत् । तात्वध्यग्रं परिवर्त्य चेंद्रियाण्यसंयोज्य महिमा महिमानं निरीक्षेत । ततो निरात्मकत्वमेति निरात्मकत्वान्न सुखदुःखभाग्भवति केवलत्वं लभता इति"। एवं ह्याह--

"परः पूर्वं प्रतिष्ठाप्य निगृहीतानिलं ततः ।
तीर्त्वा पारमपारेण पश्चाद्युंजीत मूर्धनि" ॥२१॥

अन्यत्र म्हटलें आहे— प्राणामध्यें संचार करणारी, वर जाणारी सुषुम्ना नामक नाडी तालू फोडून गेलेली आहे. प्राण, ॐ आणि मन एकत्र करून तिनें वर जावें. तालूच्या वर जिभेचें अग्र ठेवून इंद्रियें निवृत्त करून जो महिमा प्राप्त होतो त्यानें (ब्रह्माचा) महिमा पहावा. तेव्हां निरात्मकत्व पावतो. निरात्मकत्वामुळें सुखी वा दुःखी होत नाहीं. एकत्व पावतो. असें म्हटलें आहे—"आरंभीं वशीकृत अशा प्राणाला तालुस्थानीं ठेवून नंतर अपार ब्रह्मानें जीवभाव तरून अखेरीस मस्तकामध्यें ब्रह्माशीं योग साधावा."२१.

२२ शब्द ब्रह्म आणि अशब्द ब्रह्म—

अथान्यत्राप्युक्तं "द्वे वाव ब्रह्मणी अभिध्येये शब्दश्चाशब्दश्च। अथ शब्देनैवाशब्दमाविष्क्रियतेऽथ तत्रोमिति शब्दोऽनेनोर्ध्वमुत्क्रांतोऽशब्दे निधनमेत्यथ हैषा गतिरेतदमृतमेतत्सायुज्यत्वं निर्वृतत्वं तथा चेति"। अथ यथोर्णनाभिस्तंतुनोर्ध्वमुत्क्रांतोऽवकाशं लभतीत्येवं वाव खल्वसावभिध्यातोमित्यनेनोर्ध्वमुत्क्रांतः स्वातंत्र्यं लभते।

अन्यथा परे शब्दवादिनः। श्रवणांगुष्ठयोगेनांतर्हृदयाकाशशब्दमाकर्णयन्ति सप्तविधेयं तस्योपमा। यथा नद्यः किंकिणी कांस्यं चक्रकं भेकाविःकृंधिका वृष्टिर्निवाते वदतीति। तं पृथग्लक्षणमतीत्य परेऽशब्देऽव्यक्ते ब्रह्मण्यस्तं गतास्तत्र तेऽपृथग्धर्मिणोऽपृथग्विवेक्या यथा संपन्ना मधुत्वं नाना रसा इति। एवं ह्याह—

"द्वे ब्रह्मणी वेदितव्ये शब्दब्रह्म परं च यत्।
शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति" ॥२२॥

अन्यत्र म्हटलें आहे—"ध्यान करण्याला योग्य अशीं दोन ब्रह्में आहेत; शब्द ब्रह्म आणि अशब्द ब्रह्म. अशब्द ब्रह्म शब्द ब्रह्मानेंच प्रकट होतें. येथें ॐ हें शब्द ब्रह्म. यानें वर जणारा अशब्दामध्यें निधन पावतो. हीच गति, हें अमृतत्व, हें सायुज्यत्व, हें निर्वृतत्व. ज्याप्रमाणें कोळी तंतूनें वर जाऊन जागा प्राप्त करून घेतो, त्याप्रमाणेंच हा ॐ असें ध्यान करणारा वर जाऊन स्वातंत्र्य मिळवितो.

दुसरे कोणी शब्द ब्रह्म निराळ्या प्रकारानें सांगतात. कानावर अंगठे ठेवून हृदयामध्यें आकाशासारखा शब्द ऐकतात. त्याला सात प्रकारच्या उपमा आहेत त्या अशा—नद्या, घंटा, कांस्यपात्र, चाक, बेडकांचें ओरडणें, वृष्टि आणि निवातस्थलीं शब्द. या निरनिराळ्य प्रकारच्या ब्रह्माच्या पलीकडे जाऊन श्रेष्ठ, अशब्द, अव्यक्त, ब्रह्मामध्यें

मिळून जातात. तेथें ते पृथग्धर्मानें ह्मणजे वेगळेपणानें रहित, वेगळे न समजण्यासारखे होतात. नाना प्रकारचे रस जसे मधाचें रूप पावल्यावर वेगळेपणानें रहित होतात तद्वत्. असें म्हटलें आहे "शब्द ब्रह्म आणि जें पर (ह्म० त्याहून श्रेष्ठ) ब्रह्म अशीं दोन ब्रह्में जाणण्याला योग्य आहेत. शब्द ब्रह्मामध्यें निष्णात झालेला पर ब्रह्म प्राप्त करून घेतो."२२.

अथान्यत्राप्युक्तं— "यः शब्दस्तदोमित्येतदक्षरं, यदस्याग्रं तच्छान्तमशब्दमभयमशोकमानंदं तृप्तं स्थिरमचलममृतमच्युतं ध्रुवं विष्णुसंज्ञितम् । सर्वापरत्वाय तदेता उपासीत " इति । एवं ह्याह—

"योऽसौ परापरो देव ओंकारो नाम नामतः ।
निःशब्दः शून्यभूतस्तु मूर्ध्नि स्थाने ततोऽभ्यसेत् ॥ २३ ॥

अन्यत्र म्हटलें आहे—जें शब्द ब्रह्म तेंच ॐ हें अक्षर. त्याचें जें अग्र तेंच ब्रह्म. तें शांत, अशब्द, अभय, अशोक, आनंद, तृप्त, स्थिर, अचल, अमृत, अढळ, शाश्वत आहे. त्याला विष्णु [=व्यापनशील] अशी संज्ञा आहे. सर्वश्रेष्ठत्वाकरितां या दोन्ही ब्रह्मांची उपासना करावी. असें म्हटलें आहे—जो पर आणि अपर देव त्यालाच ॐकार असें नांव आहे. तो निःशब्द व शून्यभूत आहे. मस्तकाचे ठिकाणीं त्याचें ध्यान करावें."२३.

अथान्यत्राप्युक्तं धनुः शरीरमोमित्येतच्छरः शिखाऽस्य मनस्तमोलक्षणं, भित्वा तमोऽतमाविष्टमागच्छति, अथाऽऽविष्टं भित्वा अलातचक्रमिव स्फुरंतमादित्यवर्णमूर्जस्वंतं ब्रह्म तमसः पर्यमपश्यत् । यदमुष्मिन्नादित्येऽथ सोमेऽग्नौ विद्युति विभाति । अथ खल्वेनं दृष्ट्वाऽमृतत्वं गच्छतीति । एवं ह्याह—

“ध्यानमंतः परे तत्त्वे लक्ष्येषु च निधीयते ।
अतोऽविशेषविज्ञानं विशेषमुपगच्छति ॥
मानसे च विलीने तु यत्सुखं चाऽऽत्मसाक्षिकम् ।
तद्ब्रह्म चामृतं शुक्रं सा गतिर्लोक एव सः” ॥२४॥

अन्यत्र म्हटलें आहे—शरीर हें धनुष्य आहे, ॐ हा याचा बाण, मन हें बाणाचें अग्र, आणि तम हें त्याचें लक्ष्य. तमाला छेदून मनुष्य तमोरहिताप्रत येतो. याप्रमाणें तमाचें आच्छादन छेदल्यावर फिरत्या अग्निचक्राप्रमाणें स्फुरणारें, आदित्यवर्ण, तेजस्वी, तमाच्या पलीकडचें ब्रह्म पहातो. जें या आदित्यामध्यें, चंद्रामध्यें, अग्नीमध्यें, विजेमध्यें प्रकाशमान होतें तें हें ब्रह्म. हें पाहून अमृतत्वाला पोंचतो. असें म्हटलें आहे—“अंतरांतल्या श्रेष्ठ तत्त्वाचें ध्यान बाह्य लक्ष्याचे ठिकाणीं ठेवलें असतां अविशेषाचें ज्ञान विशिष्टत्व पावतें. पण जेव्हां मनाचा लय होऊन आत्मसाक्षिक सुख मिळतें, तेंच अमृत व शुद्ध ब्रह्म होय. तीच गति आणि तेंच प्राप्तव्य” २४.

अथान्यत्राप्युक्तं, निद्रेवांतर्हितेंद्रियः शुद्धितमया धिया स्वप्न इव यः पश्यतींद्रियबिलेऽविवशः प्रणवाख्यं प्रणेतारं भारूपं विगतनिद्रं विजरं विमृत्युं विशोकं च, सोऽपि प्रणवाख्यः प्रणेता भारूपो विगतनिद्रो विजरो विमृत्युर्विशोको भवतीति । एवं ह्याह—

“एवं प्राणमथोंकारं यस्मात्सर्वमनेकधा ।
युनक्ति युंजते वाऽपि तस्माद्योग इति स्मृतः ॥
एकत्वं प्राणमनसोरिंद्रियाणां तथैव च ।
सर्वभावपरित्यागो योग इत्यभिधीयते” ॥२५॥

अन्यत्र म्हटलें आहे—निद्रेमध्यें असल्याप्रमाणें इंद्रियें ज्यानें आंत ठेवलीं आहेत आणि स्वप्नांतल्याप्रमाणें अत्यंत शुद्ध बुद्धीनें जो इंद्रि-

यांच्या आंत राहून पण अवश होत्साता,—ओंकारसंज्ञक, नेता, प्रकाशरूप, अनिद्र, अजर व अशोक असें ब्रह्म पहातो, तो स्वतः देखील ॐकारसंज्ञक, नेता, प्रकाशरूप, अनिद्र, अजर, अमर आणि अशोक होतो. असें म्हटलें आहे—"याप्रमाणें प्राण, ॐकार आणि विविध विश्व यांचा ज्या अर्थी योग करतो किंवा होतो त्या अर्थी त्याला योग म्हणतात. तसेंच प्राण, मन आणि इंद्रियें यांचें एकत्व आणि सर्व विकारांचा त्याग याला योग म्हणतात." २५.

अथान्यत्राप्युक्तं यथा वाऽप्सुचारिणः शाकुनिकः सूत्रयंत्रेणोद्धृत्योदरेऽग्नौ जुहोत्येवं वाव खल्विमान्प्राणानोमित्यनेनोद्धृत्यानामयेऽग्नौ जुहोति। अतस्तप्तोर्वीव सः। अथ यथा तप्तोर्विसर्पिस्तृणकाष्ठसंस्पर्शेनोज्ज्वलतीत्येवं वाव खल्वसावप्राणाख्यः प्राणसंस्पर्शेनोज्ज्वलति। अथ यदुज्ज्वलत्येतद्ब्रह्मणो रूपं चैतद्विष्णोः परमं पदं चैतद्रुद्रस्य रुद्रत्वमेतत्तदपरिमितधा चाऽऽत्मानं विभज्य पूरयतीमांल्लोकानिति। एवं ह्याह—

"वह्नेश्च यद्वत्खलु विस्फुलिंगाः
सूर्यान्मयूखाश्च तथैव तस्य॥
प्राणादयो वै पुनरेव तस्मा-
दभ्युच्चरन्तीह यथाक्रमेण" ॥२६॥

अन्यत्र म्हटलें आहे—ज्याप्रमाणें कोळी दोरीच्या जाळ्यानें मासे वर काढून उदराग्नीमध्यें त्यांचें हवन करतो, त्याप्रमाणें खरोखर मनुष्य हे प्राण ॐकारानें वर काढून त्यांचें निर्दोष अग्नीमध्यें हवन करतो. तो (आत्मरूप अग्नि) तापलेल्या कढईप्रमाणें आहे. ज्याप्रमाणें तापलेल्या कढईतलें तूप गवताच्या (पेटलेल्या) काडीच्या स्पर्शानें पेट घेतें त्याप्रमाणें हा अ-प्राण नामक आत्मा प्राणाच्या स्पर्शानें ज्वलन पावतो.

त्याचें ज्वलन तेंच ब्रह्माचें रूप. हें विष्णूचें परम पद. हें रुद्राचें रुद्रत्व. हें अपरिमित प्रकारें स्वतःला विभागून या सर्व लोकांमध्यें भरून रहातें. असें म्हटलें आहे—"अग्नीपासून जशा ठिणग्या, किंवा सूर्यापासून जसे किरण, तसे प्राणादि त्याच्यापासूनच क्रमानें बाहेर पडतात." २६.

अथान्यत्राप्युक्तं ब्रह्मणो वावैतत्तेजः परस्यामृतस्याशरीरस्यौष्ण्यमस्यैतद्घृतम् । अथाऽऽविः सन्नभसि निहितं वैतदेकाग्रेणैवमंतर्हृदयाकाशं विनुदन्ति यत्तस्य ज्योतिरिव संपद्यतीत्यतस्तद्भावमाचिरेणैति, भूमावयस्पिंडं निहितं यथाऽचिरेणैति भूमित्वम् । मृद्वत्संस्थमयस्पिंडं यथाऽग्न्ययस्कारादयो नाभिभवन्ति । प्रणश्यति चित्तं तथाऽऽश्रयेण सहैवमिति । एवं ह्याह—

"हृद्याकाशमयं कोशमानंदं परमालयम् ।
स्वं योगश्च ततोऽस्माकं तेजश्चैवाग्निसूर्ययोः" ॥२७॥

अन्यत्र म्हटलें आहे—शरीरांतली जी उष्णता तें पर, अमृत व अशरीर ब्रह्माचेंच तेज होय. त्या उष्णतेचें शरीर हें तूप होय. कारण तें प्रकट आहे तरी (हृदयांतल्या) आकाशांत ठेवलेलें आहे. हें अंतर्हृदयाकाश एकाग्रतेनें असें पसरवितात कीं, त्याची ज्योति होते व तो ज्योतिःस्वरूप होतो. भूमीवर ठेवलेला तप्त लोखंडाचा गोळा जसा लवकरच भूमित्व पावतो [=त्यांतली उष्णता निघून जाते] आणि मातीप्रमाणें असलेल्या लोखंडाच्या गोळ्याला जसें लोहार वगैरे ठोकीत नाहींत, तसें (ज्योतिःस्वरूप) चित्त (जीवाच्या) आश्रयानें युक्त झालें म्हणजे (त्याचें ज्योतिःस्वरूप) नाश पावतें. असें म्हटलें आहे—"हृदयाकाशरूपी कोश आनंद आणि सर्वश्रेष्ठ स्थान आहे. हाच आमचा योग म्हणजे पुरुषार्थ. अग्नीचें व सूर्याचें तेज हेंच." २७.

अथान्यत्राप्युक्तं भूतेंद्रियार्थानतिक्रम्य ततः प्रव्रज्याज्यं धृतिदंडं धनुर्गृहीत्वाऽनभिमानमयेन चैवेषुणा तं ब्रह्मद्वारपारं निहन्यात्। अयं संमोहमौली तृष्णेर्ष्याकुंडली तंद्रीराघवेत्र्याभिमानाध्यक्षः क्रोधज्यं प्रलोभदंडं धनुर्गृहीत्वेच्छामयेन चैवेषुणेमानि खलु भूतानि हन्ति। तं हत्वोंकारप्लवेनांतर्हृदयाकाशस्य पारं तीर्त्वाऽऽविर्भूतेंऽतराकाशे शनकैः, अवटैवावटकृद्धातुकामः संविशत्येवं ब्रह्मशालां विशेत्। ततश्चतुर्जालं ब्रह्मकोशं प्रणुदेद्गुर्वागमेनेति। अतः शुद्धः पूतः शून्यः शान्तोऽप्राणो निरात्माऽनंतोऽक्षय्यः स्थिरः शाश्वतोऽजः स्वतंत्रः स्वे महिम्नि तिष्ठति। अतः स्वे महिम्नि तिष्ठमानं दृष्ट्वाऽऽवृत्तचक्रमिव संसारचक्रमालोकयतीति। एवं ह्याह—

"षड्भिर्मासैस्तु युक्तस्य नित्यमुक्तस्य देहिनः।
अनंतः परमो गुह्यः सम्यग्योगः प्रवर्तते॥
रजस्तमोभ्यां विद्धस्य सुसमिद्धस्य देहिनः।
पुत्रदारकुटुंबेषु सक्तस्य न कदाचन" ॥ २८ ॥

अन्यत्र म्हटलें आहे— भूतें, इंद्रियें आणि त्यांचे अर्थ यांच्या पलीकडे जाऊन नंतर संन्यासरूपी दोरी व धैर्यरूपी काठी असलेलें धनुष्य घेऊन अनभिमानरूपी बाणानें, ब्रह्माच्या त्या द्वारापाळाला ठार मारावें. हा संमोहरूपी मुकुट, तृष्णा व ईर्ष्या हीं कुंडलें, आळस—निद्रा—पाप—रूपी काठ्या, अभिमान हें आसन धारण करणारा असून लोभरूपी काठीच्या धनुष्यानें व इच्छारूपी बाणानें या प्राण्यांना मारीत असतो. त्याला मारून ॐकाररूपी नौकेनें हृदयाच्या आंतल्या आकाशाच्या पैलतीरीं जाऊन अंतराकाशामध्यें हळू हळू ब्रह्माच्या वाड्यांत—सुवर्णाची इच्छा धरणारा खाण खणून जसा तीमध्यें प्रवेश करतो तसा—प्रवेश करावा. नंतर चार जाळ्यांनीं

युक्त असा ब्रह्मकोश गुरुज्ञानानें फाडावा. म्हणजे मग शुद्ध, पवित्र, शून्य, शांत, अप्राण, निर्देह, अनंत, अक्षय, स्थिर, शाश्वत, अज आणि स्वतंत्र होत्साता स्वतःच्या महिम्यामध्यें रहातो. स्वतःच्या महिम्यामध्यें राहिलों आहे असें पाहिल्यावर तो या संसाराच्या चक्राकडे फिरत्या चक्राप्रमाणें पहातो. असें म्हटलें आहे— "नित्य मुक्त असलेल्या व सहा महिने योगाभ्यास केलेल्या मनुष्याला अनंत, श्रेष्ठ व गुह्य असा योग उत्तम प्रकारें साधतो. ज्ञानाग्नीनें पेटलेला असून जर रज आणि तम यांनीं टोंचलेला आणि पुत्र—दारा—कुटुंब यांच्यामध्यें आसक्त असेल तर त्या मनुष्याला केव्हांहि योग साधत नाहीं". २८.

एवमुक्त्वांऽतर्हृदयः शाकायन्यः तस्मै नमस्कृत्वाऽनया ब्रह्मविद्यया राजन्ब्रह्मणः पंथानमारूढाः पुत्राः प्रजापतेरिति संतोषं द्वंद्वतितिक्षां शांतत्वं योगाभ्यासादवाप्नोतीत्येतद्गुह्यतमं नापुत्राय नाशिष्याय नाशांताय कीर्तयेदित्यनन्यभक्ताय सर्वगुणसंपन्नाय दद्यात् ॥२९॥

असें बोलून त्या अंतर्बुद्धि शाकायन्यानें (ब्रह्माला किंवा मैत्रिनामकगुरूला) नमस्कार केला आणि तो त्या बृहद्रथाला म्हणाला—राजा, या ब्रह्मविद्येनें ब्रह्माच्या मार्गावर प्रजापतीचे पुत्र (वालखिल्य) चढले; योगाभ्यासानें संतोष, द्वंद्वें सहन करण्याची शक्ति आणि शान्तपणा, मिळवितां येतात. हें अत्यंत गुह्यज्ञान, जो सत्पुत्र नाहीं, सच्छिष्य नाहीं, शांतियुक्त नाहीं, त्याला सांगूं नये. जो सर्व गुणांनीं संपन्न व अनन्यभक्त असेल त्यालाच द्यावें. २९.

ॐ शुचौ देशे शुचिः सत्त्वस्थः सदधीयानः सद्वादी सद्ध्यायी सद्याजी स्यात् । इत्यतः सद्ब्रह्मणि सत्याभिलाषिणि निर्वृत्तोऽन्यः, तत्फलच्छिन्नपाशो निराशः परेष्वात्मवद्विगतभयो निष्कामोऽक्षय्यमपरिमितं सुखमाक्रम्य तिष्ठति । परमं वै शेवधेरिव परस्योद्धरणं यद्वि-

ष्कामत्वम् । स हि सर्वकाममयः पुरुषोऽध्यवसायसंकल्पाभिमानलिंगो बद्धोऽतस्तद्विपरीतो मुक्तः ।

अत्रैक आहुर्गुणः प्रकृतिभेदवशादध्यवसायात्मबंधमुपागतोऽध्यवसायस्य दोषक्षयाद्विमोक्षः । मनसा ह्येव पश्यति मनसा शृणोति कामः संकल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृतिर्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव । गुणौघैरुह्यमानः कलुषीकृतश्च अस्थिरश्चंचलो लुप्यमानः सस्पृहो व्यग्रश्चाभिमानित्वं प्रयात इत्यहं सो ममेदमित्येवं मन्यमानो निबध्नात्यात्मनाऽऽत्मानं जालेनेव खचरोऽतः पुरुषो ऽध्यवसायसंकल्पाभिमानलिंगो बद्धोऽतस्तद्विपरीतो मुक्तः ।

तस्मान्निरध्यवसायो निःसंकल्पो निरभिमानस्तिष्ठेत् । एतन्मोक्षलक्षणमेषाऽत्र ब्रह्मपदव्येषोऽत्र द्वारविवरोऽनेनास्य तमसः पारं गमिष्यति । अत्र हि सर्वे कामाः समाहिता इति । अत्रोदाहरन्ति—

"यदा पंचावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ।
बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः परमां गतिम् ॥"

एतदुक्त्वाऽतर्हृदयः शाकायन्यः । तस्मै नमस्कृत्वा यथावदुपचारी कृतकृत्यो मरुदुत्तरायणं गतो न ह्यत्रोद्वर्त्मना गतिरेषोऽत्र ब्रह्मपथः, सौरं द्वारं भित्त्वोर्ध्वेन विनिर्गत इति । अत्रोदाहरन्ति—

"अनंता रश्मयस्तस्य दीपवद्यः स्थितो हृदि ।
सितासिताः कद्रुनीलाः कपिला मृदुलोहिताः ॥
ऊर्ध्वमेकः स्थितस्तेषां यो भित्त्वा सूर्यमंडलम् ।
ब्रह्मलोकमतिक्रम्य तेन यान्ति परां गतिम् ॥
यदस्यान्यद्रश्मिशतमूर्ध्वमेव व्यवस्थितम् ।
तेन देवनिकायानां स्वधामानि प्रपद्यते ॥
ये नैकरूपाश्चाधस्ताद्रश्मयोऽस्य मृदुप्रभाः ।
इह कर्मोपभोगाय तैः संसरति सोऽवशः ॥
तस्मात्सर्गस्वर्गापवर्गहेतुर्भगवानसावादित्य इति ॥३०॥

पवित्र ठिकाणीं शुचिर्भूत, सत्त्वस्थ, 'सत्' म्हणजे ब्रह्मशास्त्राचा अभ्यास करणारा, सत् म्हणजे ब्रह्म बोलणारा, ब्रह्माचें ध्यान करणारा, असा व्हावें. म्हणजे तो सताची इच्छा करणाऱ्या सद्रूपी ब्रह्मामध्यें एकत्व पावलेला असा होत्साता (पूर्वीपेक्षां किंवा जीवापेक्षां) निराळा होतो. त्या (ब्रह्मप्राप्तिरूपी) फळानें पाश तुटलेला, आशारहित, आपल्याप्रमाणें इतरांचे ठिकाणीं भयरहित, निष्काम असा होऊन अक्षय व अपरिमित सुख मिळवून रहातो. ज्याला निष्कामत्व म्हणतात तें मोठ्या निधींतलें परम सार होय. सर्व कामांनीं युक्त, निश्चय, संकल्प आणि अभिमान हें ज्याचें लक्षण आहे असा पुरुष बद्ध होय. त्याहून विपरीत असतो तो मुक्त.

याविषयीं कोणी म्हणतात—गुण म्हणजे बुद्धि स्वभावभिन्नत्वाच्या अधीन झाल्यामुळें बंधाप्रत जाते. या दोषाचा क्षय झाला म्हणजे मोक्ष मिळतो. (परंतु असें नव्हे; कारण,) मनानें मनुष्य पहातो, मनानें ऐकतो; काम, संकल्प, संशय, श्रद्धा, अश्रद्धा, धैर्य, अधैर्य, लज्जा, बुद्धि, भीति इत्यादि हें सर्व मनच होय. गुणांच्या ओघांनीं वहात नेलेला आणि गढूळ केलेला असा, अस्थिर, चंचल, गोंधळलेला, इच्छेनें युक्त, व्यग्र असा अभिमानी होतो आणि 'हा मी' 'हें माझें' असें मानून—जाळ्यानें जसा पक्षी तसा—स्वतःच स्वतःला बांधून घेतो. म्हणून निश्चय, संकल्प व अभिमान हें ज्याचें लक्षण आहे तो बद्ध आणि याहून उलट तो मुक्त.

म्हणून निश्चयरहित, संकल्परहित आणि अभिमानरहित होऊन रहावें. हें मोक्षाचें लक्षण आहे. हा या लोकीं ब्रह्मप्राप्तीचा मार्ग

आहे. हा या लोकीं मोक्षाचा दरवाजा आहे. यानेंच या संसाररूपी अंधकाराच्या पार जाईल. सर्व काम यामध्यें एकवटून ठेवले आहेत. याविषयीं आधार सांगतात— "(विषयांपासून निवृत्त होऊन) जेव्हां मनासहित पांच ज्ञानेंद्रियें निश्चल होतात, आणि बुद्धि गप्प बसते, तेव्हां त्या स्थितीला सर्वश्रेष्ठ गति म्हणतात" [कठ.६.१०].

याप्रमाणें बोलल्यावर शाकायन्य ध्यानमग्न झाला. त्याला योग्य आदरानें नमस्कार करून तो वायूचें नांव धारण करणारा बृहद्रथ राजा उत्तरायण मार्गानें गेला. कारण येथें [इहलोकीं] वांकड्या मार्गानें गति नाहीं. हाच इहलोकीं ब्रह्माचा मार्ग आहे. सूर्यरूपी द्वार भेदून ऊर्ध्व मार्गानें तो गेला. याविषयीं म्हटलें आहे "हृदया-मध्यें जो (आत्मा) दीपाप्रमाणें स्थित आहे त्याचे किरण अनंत आहेत. ते पांढरे, काळे, तपकीरी, निळे, कापिल आणि तांबूस आहेत. त्यांच्यापैकीं एक ऊर्ध्व मार्गीं सूर्यमंडलाचा भेद करून ब्रह्मलोकाचें अतिक्रमण करून स्थित आहे. त्यानें मनुष्य परा गतीला जातात. त्याचे आणखी शंभर किरण ऊर्ध्वमार्गींच आहेत; यांनीं मनुष्य देव-समूहांच्या त्या त्या स्थानीं जातो. जे याचे कमी प्रभा असलेले अनेकरूप अधोमार्गी किरण आहेत त्यांनीं तो मनुष्य अवश होत्साता कर्में भोगण्याकरितां संसारामध्यें येतो." म्हणून जन्म, स्वर्ग आणि मोक्ष यांचा कारण भगवान् आदित्य आहे.३०.

किमात्मकानि वा एतानींद्रियाणि प्रचरन्त्युद्गंता चैतेषामिह को नियंता वेत्याह। प्रत्याहाऽऽत्यात्मकानीत्यात्मा ह्येषामुद्गंता नियंता वाऽप्सरसो भानवीयाश्च मरीचयो नामाथ पंचभी रश्मिभिर्विषयानत्ति। कतम आत्मेति। योऽयं शुद्धः पूतः शून्यः शांतादिलक्षणोक्तः स्वकै-

लिंगैरुपगृह्यः। तस्यैतल्लिंगमलिंगस्याग्नेः यदौष्ण्यमाविष्टं चापां यः शिवतमो रस इत्येके, अथ वाक्श्रोत्रं चक्षुर्मनः प्राण इत्येके, अथ बुद्धिर्धृतिः स्मृतिः प्रज्ञानमित्येके। अथ ते वा एतस्यैवं यथैवेह बीजस्यांकुरा वाऽथ धूमार्चिर्विस्फुलिंगा इवाग्नेश्चेति। अत्रोदाहरन्ति—

"वह्नेश्च यद्वत्खलु विस्फुलिंगाः
सूर्यान्मयूखाश्च तथैव तस्य।
प्राणादयो वै पुनरेव तस्मा—
दभ्युच्चरन्तीह यथाक्रमेण" ॥३१॥

हीं जीं इंद्रियें संचार करतात त्यांचा आत्मा कोण? यांना चालविणारा आणि यांचें नियमन करणारा कोण? असा प्रश्न आहे. याला उत्तर सांगतात आत्मा हाच यांचा आत्मा आहे. यांना चालविणारा आणि यांचें नियमन करणारा आत्माच. देवांचीं म्हणजे इंद्रियदेवतात्मक जीं इंद्रियें [किरण] त्या अप्सरा. पांच किरणांनीं (आत्मा) विषय भोगतो. आत्मा कोणता? हा जो शुद्ध, पवित्र, शून्य, शान्त, इत्यादिलक्षणयुक्त सांगितलेला व स्वकीय खुणांनीं समजण्यासारखा तो आत्मा. ज्याला खूण नाहीं अशा त्या आत्म्याची खूण हीच कीं, अग्नीची आंत प्रविष्ट झालेली जी उष्णता किंवा उदकाचा जो कल्याणकारक रस. याप्रमाणें कोणी सांगतात. वाचा, श्रोत्र, चक्षु, मन, प्राण, असें कोणी सांगतात. बुद्धि, धृति, स्मृति, प्रज्ञा असें कोणी सांगतात. आतां या खुणा म्हणजे बीजाचे अंकुर किंवा धूम, ज्वाळा व ठिणग्या हे जसे अग्नीचे तशा होत. याविषयीं आधार सांगतात—"अग्नीपासून जशा ठिणग्या, किंवा सूर्यापासून जसे किरण तसे प्राणादि त्याच्यापासूनच क्रमानें बाहेर पडतात." [६.२६पहा]. ३१.

तस्माद्वा एतस्मादात्मनि सर्वे प्राणाः सर्वे लोकाः सर्वे वेदाः सर्वे देवाः सर्वाणि च भूतान्युच्चरन्ति तस्योपनिषत्सत्यस्य सत्यमिति। अथ यथाऽऽर्द्रैधाग्नेरभ्याहितस्य पृथग्धूमा विनिश्चरन्त्येवं वा एतस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस इतिहासः पुराणं विद्योपनिषदः श्लोकाः सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानान्यस्यैवैतानि विश्वा भूतानि ॥३२॥

त्या या आत्म्यापासून सर्व प्राण, सर्व लोक, सर्व वेद, सर्व देव, आणि सर्व प्राणी उत्पन्न होतात. "सत्याचा सत्य" हें त्याचें गूढ ज्ञान होय. "ज्याप्रमाणें ओल्या इंधनानें पेटविलेल्या अग्नीपासून निरनिराळे धूम निघतात, त्याप्रमाणें या महान् भूतापासून निघालेले हे उछ्वासच होत— हे जे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदें, श्लोक, सूत्रें, सूत्रांचीं स्पष्टीकरणें सूत्रांचे अर्थ आणि सर्व प्राणिजात."[बृ. २.४.१०]. ३२.

पंचेष्टको वा एषोऽग्निः संवत्सरस्तस्येमा इष्टका यो वसंतो ग्रीष्मो वर्षाः शरद्धेमंतः। स शिरःपक्षसीपृष्टपुच्छवानेषोऽग्निः। पुरुषविदः सेयं प्रजापतेः प्रथमा चितिः। करैर्यजमानमंतरिक्षमुत्क्षिप्त्वा वायवे प्रायच्छत्। प्राणो वै वायुः। प्राणोऽग्निस्तस्येमा इष्टका यः प्राणो व्यानोऽपानः समान उदानः स शिरःपक्षसीपृष्टपुच्छवानेषोऽग्निः। पुरुषविदस्तादिदमंतरिक्षं प्रजापतेर्द्वितीया चितिः। करैर्यजमानं दिवमुत्क्षिप्त्वेंद्राय प्रायच्छदसौ वा आदित्य इंद्रः सैषोऽग्निस्तस्येमा इष्टका यदृग्यजुःसामाथर्वांगिरसा इतिहासः पुराणं स शिरःपक्षसीपुच्छपृष्टवानेषोऽग्निः। पुरुषविदः सैषा द्यौः प्रजापतेस्तृतीया चितिः। करैर्यजमानस्याऽऽत्मविदेऽवदानं करोत्यथाऽऽत्मविदुत्क्षिप्य ब्रह्मणे प्रायच्छत्तत्राऽऽनंदी मोदी भवति ॥३३॥

हा पांच इष्टकांचा (गार्हपत्य) अग्नि संवत्सर होय. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत् आणि हेमंत या त्याच्या पांच इष्टका. या अग्नीला शिर, दोन पक्ष, पाठ आणि पुच्छ आहेत. ही (पृथ्वी) या पुरुषवेत्त्या प्रजापतीची पहिली चिति. ही आपल्या हातांनीं यजमानाला उचलून वायूच्या स्वाधीन करते. प्राण हाच वायु. प्राण हाच (दक्षिण) अग्नि. त्याच्या प्राण, व्यान, अपान, समान, उदान या इष्टका. या अग्नीला शिर, दोन पक्ष, पाठ आणि पुच्छ आहेत. अंतरिक्ष ही या पुरुषवेत्त्या प्रजापतीची दुसरी चिति. ही आपल्या हातांनीं यजमानाला उचलून इंद्राच्या स्वाधीन करते. हा आदित्य म्हणजेच इंद्र. तो हा (आहवनीय) अग्नि. त्याच्या ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्वांगिरस आणि इतिहास पुराण या इष्टका. या अग्नीला शिर, दोन पक्ष, पाठ आणि पुच्छ आहेत. स्वर्गलोक ही या पुरुषवेत्त्या प्रजापतीची तिसरी चिति. ही आपल्या हातांनीं यजमानाला आत्मवेत्याच्या स्वाधीन करते. नंतर आत्मवेत्ता उचलून ब्रह्माच्या स्वाधीन करतो. तेथें तो आनंदयुक्त व मोदयुक्त होतो. ३३.

३४ अग्नीची उपासना आणि मनाची एकाग्रता—

पृथिवी गार्हपत्योऽन्तरिक्षं दक्षिणाग्निर्द्यौराहवनीयस्तत एव पवमानपावकशुचयः। आविष्कृतमनेनास्य यज्ञम्। यतः पवमानपावकशुचिसंघातो हि जाठरस्तस्मादग्निर्यष्टव्यश्चेतव्यः स्तोतव्योऽभिधातव्यः। यजमानो हविर्गृहीत्वा देवताभिध्यानमिच्छति।

हिरण्यवर्णः शकुनो हृद्यादित्ये प्रतिष्ठितः।
मद्गुर्हंसस्तेजोवृषः सोऽस्मिन्नग्नौ यजामहे॥

इति चापि मंत्रार्थं विचिनोति— तत्सवितुर्वरेण्यं भर्गोऽस्याभिध्येयं

यो बुद्ध्यंतस्थो ध्यायीह मनःशांतिपदमनुसरत्यात्मन्येव धत्ते ।
अत्रेमे श्लोका भवन्ति—

यथा निरिंधनो वह्निः स्वयोनावुपशाम्यते ।
तथा वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनावुपशाम्यते ॥
स्वयोनावुपशान्तस्य मनसः सत्यकामतः ।
इंद्रियार्थविमूढस्यानृताः कर्मवशानुगाः ॥
चित्तमेव हि संसारं तत्प्रयत्नेन शोधयेत् ।
यच्चित्तस्तन्मयो भवति गुह्यमेतत्सनातनम् ॥
चित्तस्य हि प्रसादेन हन्ति कर्म शुभाशुभम् ।
प्रसन्नाऽऽत्माऽऽत्मनि स्थित्वा सुखमव्ययमश्नुते ॥
समासक्तं यथा चित्तं जंतोर्विषयगोचरे ।
यद्येवं ब्रह्मणि स्यात्तत्को न मुच्येत बंधनात् ॥
मनो हि द्विविधं प्रोक्तं शुद्धं चाशुद्धमेव च ।
अशुद्धं कामसंपर्काच्छुद्धं कामविवर्जितम् ॥
लयविक्षेपरहितं मनः कृत्वा सुनिश्चलम् ।
यदा यात्यमनीभावं तदा तत्परमं पदम् ॥
तावन्मनो निरोद्धव्यं हृदि यावद्गतक्षयम् ।
एतज्ज्ञानं च मोक्षं च शेषान्ये ग्रंथविस्तराः ॥
समाधिनिर्धौतमलस्य चेतसो
निवेशितस्याऽऽत्मनि यत्सुखं भवेत् ॥
न शक्यते वर्णयितुं गिरा तदा
स्वयं तदंतःकरणेन गृह्यते ॥
अपामापोऽग्निरग्नौ वा व्योम्नि व्योम न लक्षयेत् ।
एवमंतर्गतं यस्य मनः स परिमुच्यते ॥
मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ।
बंधाय विषयासंगि मोक्षे निर्विषयं स्मृतं, इति ॥

अतोऽनाग्निहोत्र्यनाग्निचिदज्ञानाभिध्यायिनां ब्रह्मणः पदव्योमानुस्मरणं विरुद्धं, तस्मादग्निर्यष्टव्यश्चेतव्यः स्तोतव्योऽभिध्यातव्यः ॥३४॥

(यांपैकीं) पृथिवी हा गार्हपत्य अग्नि, अंतरिक्ष हा दक्षिण अग्नि आणि द्युलोक हा आहवनीय अग्नि. म्हणून यांना पवमान [शुद्ध होणारा], पावक [शुद्ध करणारा] आणि शुचि [शुद्ध] म्हणतात. या पुरुषाचा यज्ञ यांनीं [=पृथिवी, अंतरिक्ष, द्युलोक] आविष्कृत केला आहे. ज्या अर्थीं पवमान, पावक व शुचि यांचा हा समुदाय जठराग्नीमध्यें आहे त्या अर्थीं जठराग्नीचें देखील यजन, चेतन, स्तवन आणि ध्यान केलें पाहिजे. यजमानानें हातांत हवि घेऊन देवतेचें असें ध्यान करावें—"हृदयरूपी आदित्यामध्यें सुवर्णवर्ण पक्षी स्थित आहे. तेजःपुंज असा मद्गु किंवा हंस (हा तो पक्षी). त्याचें आम्ही या अग्नीमध्यें पूजन करतों." असें म्हणून आतां मंत्राच्या अर्थाचा विचार करतात— "त्या या सवित्याच्या इष्ट तेजाचें ध्यान करावें." बुद्धीमध्यें जो स्थित तो ध्यान करणारा. तो (या ध्यानानें) या लोकींच मनाच्या शांतीचें स्थान पावतो. तो आत्म्यामध्येंच (हें रूप) धारण करतो. याविषयीं पुढील श्लोक आहेत—ज्याप्रमाणें इंधनरहित अग्नि स्वतःच्या उत्पत्तिकारणामध्येंच नष्ट होतो, त्याप्रमाणें चित्त, त्याच्या वृत्तीचा नाश झाल्याबरोबर स्वतःच्या उत्पत्तिकारणामध्येंच लय पावतें. ज्याच्या संबंधानें, इंद्रियांच्या अर्थापासून दूर झालेल्या मनाच्या, कर्मवशानें चालणाऱ्या मिथ्या प्रवृत्ति, सत्याच्या इच्छेच्या योगानें, स्वतःच्या उत्पत्तिकारणांत लय पावल्या त्या पुनः उत्पन्न होत नाहींत. चित्त हाच संसार आहे; म्हणून तें प्रयत्नानें शुद्ध करावें. ज्याचें ज्याचे ठिकाणीं चित्त, तो तन्मय होतो. हें सनातन म्हणजे प्राचीन काळापासून अबाधित असलेलें गुह्य आहे. चित्ताच्या प्रसन्नतेनें शुभाशुभ कर्म

नष्ट करतो; आणि प्रसन्नचित्त झाल्यावर आत्म्याचे ठिकाणीं स्थित होऊन अक्षय सुख पावतो. विषयांच्या पदार्थांच्या ठिकाणीं जसें प्राण्याचें चित्त आसक्त होतें, तसें जर ब्रह्माच्या ठिकाणीं होईल, तर बंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं? मन दोन प्रकारचें सांगितलें आहे, शुद्ध आणि अशुद्ध. कामाच्या संपर्कामुळें अशुद्ध आणि कामरहित तें शुद्ध. मन आसक्तिरहित, व्यग्रतारहित आणि न चळणारें असें करून जेव्हां तें अ—मन होईल, तेव्हां तें परमपद प्राप्त होतें. हृदयाचा साक्षी जो आत्मा त्याच्या ठिकाणीं मनाचा क्षय होईपर्यंत मनाचा रोध करावा. हेंच ज्ञान आणि हाच मोक्ष. याहून इतर ग्रंथविस्तार होय. समाधीनें ज्याचा मल धुवून टाकला आहे, आणि आत्म्याचे ठिकाणीं जें ठेवलें आहे, अशा मनाला जें सुख प्राप्त होतें तें वाणीनें वर्णन करणें शक्य नाहीं; तें स्वतः अंतःकरणानेंच समजतें. उदकामध्यें उदक (टाकलें असतां), अग्नीमध्यें अग्नि, किंवा आकाशामध्यें आकाश जशीं (पृथक) समजून येत नाहींत, त्याप्रमाणें ज्याचें मन आंत (म्हणजे आत्म्यांत) मिळालें तो मुक्त झाला. मनुष्यांच्या बंधाचें आणि मोक्षाचें दोहोंचेंहि कारण मनच आहे. विषयाला चिकटणारें मन बंध करतें, आणि निर्विषय झालेलें मन मोक्ष प्राप्त करून देतें, असें सांगितलें आहे. म्हणून अग्नीला हवन व अग्नीचें चयन न करणारा, अज्ञ, आणि ध्यान न करणारा यांना ब्रह्माच्या निराकार पदाचें स्मरण होणें विरुद्ध आहे; याकरितां अग्नीचें यजन, चयन, स्तवन आणि ध्यान करावें. ३४.

३५ अग्नीची ब्रह्मरूपानें उपासना—

"नमोऽग्नये पृथिवीक्षिते लोकस्मृते लोकमस्मै यजमानाय धेहि, नमो वायवेंऽतरिक्षक्षिते लोकस्मृते लोकमस्मै यजमानाय धेहि, नम आदित्याय दिविक्षिते लोकस्मृते लोकमस्मै यजमानाय धेहि, नमो ब्रह्मणे सर्वक्षिते सर्वस्मृते सर्वमस्मै यजमानाय धेहि ।

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्याभिहितं मुखम् ।
तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय विष्णवे ।
योऽसा आदित्ये पुरुषः सोऽसा अहमिति ।

एष ह वै सत्यधर्मो यदादित्यस्याऽऽदित्यत्वं, तच्छुक्लं पुरुषमलिंगम् । नभसोंऽतर्गतस्य तेजसोंऽशमात्रमेतद्यदादित्यस्य मध्य इवेत्यक्षिण्यग्नौ चैतद्ब्रह्मैतदमृतमेतद्भर्ग एतत्सत्यधर्मः । नभसोंऽतर्गतस्य तेजसोंऽशमात्रमेतत् यदादित्यस्य मध्येऽमृतं यस्य हि सोमः प्राणा वाऽप्यंकुरा एतद्ब्रह्मैतदमृतमेतद्भर्ग एतत्सत्यधर्मः । नभसोंऽतर्गतस्य तेजसोंऽशमात्रमेतद्यदादित्यस्य मध्ये यजुर्दीप्यति । ओमापो ज्योती रसोऽमृतं ब्रह्म भूर्भुवः स्वरोम् ।

अष्टपादं शुचिं हंसं त्रिसूत्रमणुमव्ययम् ।
द्विधर्मोऽधं तेजसेऽधं सर्वं पश्यन्पश्यति ॥

नभसोंऽतर्गतस्य तेजसोंऽशमात्रमेतद्यदादित्यस्य मध्ये उदित्वा मयूखे भवतः । एतत्सवित्सत्यधर्म एतद्यजुरेतत्तप एतदग्निरेतद्वायुरेतत्प्राण एतदाप एतच्चंद्रमा एतच्छुक्रमेतदमृतं, एतद्ब्रह्मविषयं एतद्भानुरर्णवः तस्मिन्नेव यजमानाः सैंधव इव लीयन्ते । एषा वै ब्रह्मैकताऽत्र हि सर्वे कामाः समाहिता इति । अत्रोदाहरन्ति—

"अंशुधारय इवाणुवातेरितः
संस्फुरत्यसावंतर्गः सुराणाम् ।
यो हैवंवित्स सवित्स द्वैतवि-
त्सैकधामेतः स्यात्तदात्मकश्च ॥

ये बिंदव इवाभ्युच्चरन्त्यजस्रं
विद्युदिवाभ्रार्चिषः परमे व्योमन् ।
तेऽर्चिषो वै यशस आश्रयवशा-
ज्जटाभिरूपा इव कृष्णवर्त्मनः" ॥३५॥

(ध्यानाचे मंत्र)– "पृथिवीवर रहाणाऱ्या आणि पृथिवीलोकाचें स्मरण ठेवणाऱ्या अग्नीला नमस्कार असो; या यजमानासाठीं [यज्ञ करणाऱ्या मजसाठीं] लोक धारण कर. अंतरिक्षांत रहाणाऱ्या आणि अंतरिक्ष लोकाचें स्मरण ठेवणाऱ्या वायूला नमस्कार असो; या यजमाना-साठीं लोक धारण कर. स्वर्गलोकांत रहाणाऱ्या आणि स्वर्गलोकाचें स्मरण ठेवणाऱ्या आदित्याला नमस्कार असो; या यजमानासाठीं लोक धारण कर. सर्वत्र रहाणाऱ्या आणि सर्व लोकांचें स्मरण ठेवणाऱ्या ब्र-ह्माला नमस्कार असो; या यजमानासाठीं सर्व धारण कर. हिरण्मय पात्रानें सत्याचें मुख झांकलेलें आहे. हे आदित्या, तें तूं सर्वव्यापी [विष्णवे] सत्यधर्माकरितां उघड. हा जो आदित्याचे ठिकाणीं पुरुष आहे तो मी आहें."

आदित्याचें जें आदित्यत्व तोच हा सत्यधर्म. तें शुद्ध, पुरुष आणि लक्षणरहित आहे. आदित्याच्या मध्यें, डोळ्यांत आणि अग्नी-मध्यें जें तेज आहे तें आकाशव्यापी तेजाचा केवळ अंश होय. हेंच ब्रह्म, हेंच अमृत, हेंच तेज आणि हाच सत्यधर्म. आदित्याच्या मध्यें जें अमृत आहे, आणि चंद्र व प्राण ज्याचे अंकुर होत, तें आकाश-व्यापी तेजाचा केवळ अंश होय. हेंच ब्रह्म, हेंच अमृत, हेंच तेज आणि हाच सत्यधर्म. आदित्याच्या मध्यें जो यजुर्वेद प्रकाश पावत

आहे तो आकाशव्यापी तेजाचा केवळ अंश होय. हाच ॐ, उदक, तेज, रस, अमृत, ब्रह्म, भूः, भुवः आणि स्वः. आठ (दिशारूपी) पायांनीं युक्त, शुद्ध, हंस [=संचार करणारा], (ऋक्, यजु व साम या तीन सूत्रांनीं बद्ध ह्मणून) त्रिसूत्र, सूक्ष्म, क्षयरहित, पुण्यपापधर्मांनीं रहित, तेजोरूपी इंधनानें प्रकाशमान अशा आदित्याला जो पहातो तो सर्व पहातो.

आदित्यामध्यें उदय पावून जे किरण होतात ते आकाशव्यापी तेजाचा केवळ अंश होत. हाच सविता, हाच सत्यधर्म, हाच यजु, हेंच तप, हाच अग्नि, हाच वायु, हाच प्राण, हेंच उदक, हाच चंद्र, हाच शुद्ध, हाच अमृत, हेंच ब्रह्माचें स्थान, हाच प्रकाशाचा सागर. यज्ञ करणारे याच्यामध्येंच मिठाप्रमाणें लय पावतात. हें ब्रह्माशीं एकत्व होय, कारण यामध्यें सर्व काम ठेवलेले आहेत. याविषयीं आचार सांगतात— "थोड्याशा वाऱ्यानें प्रेरित अशा दीपाप्रमाणें देवांच्या अंतर्भागीं प्रविष्ट झालेला हा यजमान रहातो, म्हणजे सर्वदेवतात्मक होतो. जो याप्रकारें जाणतो तो ज्ञानी, तो द्वैत [=परापर ब्रह्मभेद] जाणणारा. तो एकरूप पावलेला आणि तदात्मक होतो. जीं आकाशांतलीं तेजें बिंदूप्रमाणें आणि विजेप्रमाणें सतत वर येत असतात, तीं (आपल्या) प्रकाशमान तेजाच्या आश्रयसामर्थ्यानें अग्नीच्या जटाच होत." ३५.

"नमोऽग्नये पृथिवीक्षिते॰" हे मंत्र किंचित् फरकानें तैत्तिरीयसंहितेमधून [७.५.२४.१], आणि "हिरण्मयेन पात्रेण" हा मंत्र ईशावास्योपनिषदांतून [१२] घेतला आहे. 'मयूखे' हें द्विवचन समजण्यापेक्षां बहुवचन समजून अर्थ केला आहे.

द्वे वाव खल्वेते ब्रह्मज्योतिषो रूपके शांतमेकं समृद्धं चैकम्। अथ यच्छांतं तस्याऽऽधारं खमथ यत्समृद्धमिदं तस्यान्नम्। तस्मान्मंत्रौषधाज्यामिषपुरोडाशस्थालीपाकादिभिर्यष्टव्यमंतर्वेद्याम् । आस्न्यवशिष्टैरन्नपानैश्चाऽऽस्यमाहवनीयमिति मत्वा, तेजसः समृद्ध्यै पुण्यलोकविजित्यर्थाय, अमृतत्वाय च। अत्रोदाहरन्ति—"अग्निहोत्रं जुहुयात्स्वर्गकामो, यमराज्यमग्निष्टोमेनाभियजति, सोमराज्यमुक्थेन, सूर्यराज्यं षोडशिना, स्वाराज्यमतिरात्रेण, प्राजापत्यमासहस्रसंवत्सरांतक्रतुनेति"।

"वर्त्याधारस्नेहयोगाद्यथा दीपस्य संस्थितिः।
अंतर्याण्डोपयोगादिमौ स्थितावात्मशुची तथा" ॥३६॥

तेजोरूपी ब्रह्माचीं दोन रूपें आहेत, एक शान्त व एक समृद्ध. जें शांत रूप त्याचा आधार आकाश, जें समृद्ध त्याचा आधार अन्न. म्हणून मंत्र, औषधी, तूप, मांस, पुरोडाश, भात इत्यादिकांनीं वेदीच्या आंत यजन करावें. अवशिष्ट राहील त्यानें व अन्नपानानें मुखाचें यजन—मुख आहवनीय अग्नि समजून—तेजाच्या समृद्धीकरितां, पुण्यलोक मिळविण्याकरितां, संपत्तीकरितां आणि मोक्षाकरितां —करावें. याविषयीं आधार सांगतात— "स्वर्गेच्छूनें अग्निष्टोम यज्ञ करावा,अग्निष्टोमानें यमलोक मिळतो, उक्थानें सोमलोक, षोडशीनें सूर्यलोक, अतिरात्रानें अप्रतिहत साम्राज्य, आणि एक हजार वर्षांनीं समाप्ति पावणाऱ्या क्रतूनें प्रजापतिलोक." वात, आधार आणि तेल यांच्या संयोगानें जसें दीपाचें अस्तित्व तसें अंड आणि ब्रह्मांड यांच्या संयोगानें हे आत्मा आणि (शुद्ध) आदित्य स्थित आहेत." ३६.

तस्मादोमित्यनेनैतदुपासीतापरिमितं तेजस्तत्त्रेधाऽभिहितमग्नावादित्ये प्राणे। अथैषा नाड्यन्नबहुलमित्येषाऽग्नौ हुतमादित्यं गमयत्यतो यो रसोऽस्रवत्स उद्गीथं वर्षति, तेनेमे प्राणाः, प्राणेभ्यः प्रजा इति। अत्रोदाहरन्ति---यद्धविरग्नौ हूयते तदादित्यं गमयति तत्सूर्यो रश्मिभिर्वर्षति तेनान्नं भवत्यन्नात् भूतानामुत्पत्तिरिति। एवं ह्याह—

"अग्नौ प्रास्ताऽऽहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठते।
आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः" ॥३७॥

म्हणून या अपरिमित तेजाची ॐकारानें उपासना करावी. हें तेज तीन प्रकारांनीं सांगितलें आहे—अग्नि, आदित्य व प्राण. अग्नीमध्यें केलेलें हवन अन्न वाढविणारी नाडी आदित्याप्रत नेते. तेथून जो रस निघतो तो उद्गीथाप्रमाणें पर्जन्यरूपानें पडतो. त्यानें हे प्राण होतात आणि प्राणांपासून संतति होते. याविषयीं आधार सांगतात—"जो हवि अग्नीमध्यें हवन केला जातो तो आदित्याप्रत जातो, सूर्य आपल्या किरणांनीं त्याचा वर्षाव करतो, त्यानें अन्न होतें आणि अन्नापासून भूतांची उत्पत्ति होते." असें म्हटलें आहे कीं, "अग्नीमध्यें योग्य प्रकारें दिलेली आहुति आदित्याप्रत जाते. आदित्यापासून वृष्टि होते, वृष्टीपासून अन्न आणि त्यापासून प्रजा" [मनु. ३.७६] ३७.

३८ ब्रह्मदर्शन—

अग्निहोत्रं जुह्वानो लोभजालं भिनत्ति, अतः संमोहं छित्त्वा न क्रोधान्स्तुन्वानः। काममभिध्यायमानस्ततश्चतुर्जालं ब्रह्मकोशं भिंदत्। अतः परमाकाशम्। अत्र हि सौरसौम्याग्नेयसात्त्विकानि मंडलानि भित्त्वा ततः शुद्धः सत्त्वांतरस्थमचलममृतमच्युतं ध्रुवं विष्णुसंज्ञितं सर्वापरं धाम सत्यकामसर्वज्ञत्वसंयुक्तं स्वतंत्रं चैतन्यं स्वे महिम्नि तिष्ठमानं पश्यति। अत्रोदाहरन्ति—

" रविमध्ये स्थितः सोमः सोममध्ये हुताशनः ।
तेजोमध्ये स्थितं सत्त्वं सत्त्वमध्ये स्थितोऽच्युतः ॥

शरीरप्रादेशांगुष्ठमात्रमणोरप्यणुं ध्यात्वाऽतः परमतां गच्छत्यत्र हि सर्वे कामाः समाहिता इति । अत्रोदाहरन्ति—

" अंगुष्ठप्रादेशशरीरमात्रं
प्रदीपप्रतापवद्विस्त्रिधा हि ।
तद्ब्रह्माभिष्टूयमानं
महो देवो भुवनान्याविवेश " ॥३८॥

ॐ नमो ब्रह्मणे नमः ॥
इति षष्टः प्रपाठकः ॥

अग्निहोत्राचें हवन करणारा लोभाचें जाळें तोडून टाकतो. नंतर संमोहाला छेदून क्रोधाची प्रशंसा करीत नाहीं [=क्रोध टाकून देतो]. (मोक्षरूपी)कामाचें सतत ध्यान करीत तो (अन्न, प्राण, मन आणि विज्ञानरूपी) चार प्रकारच्या जाळ्यांचा ब्रह्मकोश तो छेदतो. तेथें श्रेष्ठ आकाशाप्रत जातो. तेथें सूर्य, चंद्र, अग्नि आणि सत्त्व यांचीं मंडलें भेदून नंतर शुद्ध होत्साता सत्त्वाच्या अंतर्भागीं असणारें, अचल, अमृत, अढळ, स्थिर, ज्याला विष्णु [=व्यापनशील] अशी संज्ञा आहे, सर्वश्रेष्ठ स्थान, सत्यकाम व सर्वज्ञत्व यांनीं युक्त, स्वतंत्र असें चैतन्य स्वतःच्या महिम्यामध्यें स्थित असें पहातो. याविषयीं आधार सांगतात— 'रवीमध्यें चंद्र स्थित आहे, चंद्रामध्यें अग्नि स्थित आहे, तेजामध्यें [=अग्नीमध्यें] सत्त्व स्थित आहे, आणि सत्त्वामध्यें अच्युत स्थित आहे. शरीरामध्यें वीतभर किंवा अंगठ्याएवढा किंवा अणूहून अणु अशा रूपानें त्याचें ध्यान करून नंतर परमत्वाप्रत जातो. यामध्यें सर्व काम समाविष्ट

आहेत. याविषयीं आधार सांगतात "अंगुष्ठ किंवा वीत या परिमाणाचें ज्याचें शरीर, दिव्याच्या ज्योतीप्रमाणें असलेलें, दोन किंवा तीन प्रकारांनीं विभागलेलें, असें जें ब्रह्म—ज्याची आह्मी स्तुति करीत आहोंत, तोच महान् देव. तो या सर्व भूतांमध्यें प्रवेश करून राहिला आहे." ३८.

---

## प्रपाठक सातवा.

१—७ आत्म्याचें विश्वरूप—

अग्निर्गायत्रं त्रिवृद्रथंतरं वसंतः प्राणो नक्षत्राणि वसवः पुरस्तादुद्यन्ति तपन्ति वर्षन्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरेणेक्षान्ते । अचिंत्योऽमूर्तो गभीरो गुप्तोऽनवद्यो घनो गहनो निर्गुणः शुद्धो भास्वरो गुणभुग्भयोऽनिर्वृत्तिर्योगीश्वरः सर्वज्ञो माघेऽप्रमेयोऽनाद्यंतः श्रीमानजो धीमानानिर्देश्यः सर्वसृक्सर्वस्याऽऽत्मा सर्वभुक्सर्वस्येशानः सर्वस्यांऽऽतरांतरः ॥१॥

अग्नि, गायत्री छंद, त्रिवृत् ऋचा, रथंतर साम, वसंत, प्राण, नक्षत्रें आणि वसु पूर्वेकडे उदय पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (सूर्यमंडलाच्या) आंत प्रवेश करतात, आणि त्या मंडलरूपी द्वारांतून पहातात. तो (सवितृरूपी आत्मा) अचिंत्य, अमूर्त, खोल, गुप्त, पुण्यपापरहित, घन, गहन, निर्गुण, शुद्ध, तेजस्वी, गुणांचा भोक्ता, भयंकर, अकार्य, योगीश्वर, सर्वज्ञ, पूज्य, अप्रमेय, अनादि, अनंत, श्रीमान्, अज, धीमान्, अनिर्देश्य, सर्वस्रष्टा, सर्वात्मा, सर्वभोक्ता, सर्वांचा स्वामी, आणि सर्वांच्या अंतरांतरांत असणारा असा आहे. १.

इंद्रस्त्रिष्टुप्पंचदशो बृहद्ग्रीष्मो व्यानः सोमो रुद्रा दक्षिणत उद्यन्ति तपन्ति वर्षन्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरेणेक्षन्ति । अनाद्यंतोऽपरिमितोऽपरिच्छिन्नोऽपरप्रयोज्यः स्वतंत्रोऽलिंगोऽमूर्तोऽनंतशक्तिर्धाता भास्करः ॥२॥

इंद्र, त्रिष्टुप छंद, पंचदश ऋचा, बृहत्साम, ग्रीष्म, व्यान, सोम, आणि रुद्र दक्षिणेकडे उदय पावतात, तपन पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (चंद्रमंडलाच्या) आंत प्रवेश करतात, आणि त्या मंडलरूपी द्वारांतून पहातात. तो (चंद्ररूपी) आत्मा अनादि, अनंत अपरिमित, अपरिच्छिन्न, दुसऱ्या कोणीं न केलेला, स्वतंत्र, अलक्षण, अमूर्त, अनंतशक्ति, उत्पन्नकर्ता, तेज देणारा असा आहे. २.

मरुतो जगती सप्तदशो वैरूपं वर्षा अपानः शुक्र आदित्याः पश्चादुद्यान्ति तपन्ति वर्षान्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरेणेक्षन्ति । तच्छांतमशब्दमभयमशोकमानंदं तृप्तं स्थिरमचलममृतमच्युतं ध्रुवं विष्णुसंज्ञितं सर्वापरं धाम ॥३॥

मरुत्, जगती छंद, सप्तदश ऋचा, वैरूप साम, वर्षा, अपान, शुक्र आणि आदित्य देव पश्चिमेकडे उदय पावतात, तपन पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (शुक्रमंडलाच्या) आंत प्रवेश करतात आणि त्या मंडलरूपी द्वारांतून पहातात. तें (ब्रह्म) शान्त, अशब्द, अभय, अशोक, आनंद, तृप्त, स्थिर, अचल, अमृत, अढळ, स्थिर, विष्णुनामक सर्वश्रेष्ठ धाम आहे. ३.

विश्वे देवा अनुष्टुबेकविंशो वैराजः शरत्समानो वरुणः साध्या उत्तरत उद्यान्ति तपान्ति वर्षन्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरेणेक्षन्ति। अंतःशुद्धः पूतः शून्यः शांतोऽप्राणो निरात्माऽनंतः ॥४॥

विश्वेदेव, अनुष्टुभ् छंद, एकविंश ऋचा, वैराज साम, शरत् समान, वरुण आणि साध्यदेव उत्तरेकडे उदय पावतात, तपन पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (आपल्या मंडलांत) प्रवेश करतात आणि त्या द्वारांतून पहातात. तो (आत्मा) अंतःशुद्ध, पवित्र, शून्य, शांत, अप्राण, निरात्मा आणि अनंत आहे. ४.

मित्रावरुणौ पंक्तिस्त्रिणवत्रयस्त्रिंशौ शाकररैवते हेमंतशिशिरा उदानोऽगिरसश्चंद्रमा ऊर्ध्वा उद्यान्ति तपन्ति वर्षान्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरेणेक्षन्ति। प्रणवाख्यं प्रणेतारं भारूपं विगतनिद्रं विजरं विमृत्युं विशोकम् ॥५॥

मित्रावरुण, पंक्ति छंद, त्रिणवत्रयस्त्रिंश ऋचा, शाकररैवत साम, हेमंतशिशिर ऋतु, उदान, अंगिरस आणि चंद्रमा वर उदय पावतात, तपन पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (आपल्या मंडलांत) प्रवेश करतात, आणि त्या द्वारांतून पहातात. तें (ब्रह्म) ॐकारनामक, नेता, प्रभारूप, निद्रारहित, जरारहित, मृत्युरहित आणि शोकरहित आहे. ५.

शनिराहुकेतूरगरक्षोयक्षनरविहगशरभेभादयोऽधस्तादुद्यान्ति तपन्ति वर्षन्ति स्तुवन्ति पुनर्विशन्त्यंतर्विवरणेक्षान्ति। यः प्राज्ञो विधरणः सर्वांतरोऽक्षरः शुद्धः पूतो भान्तः क्षान्तः शान्तः ॥६॥

शनि, राहु, केतु, नाग, राक्षस, यक्ष, मनुष्य, पक्षी, पिलें, हत्ती वगैरे खालीं उदय पावतात, तपन पावतात, वर्षाव करतात, स्तवन करतात, पुनः (आपल्या मंडलांत) प्रवेश करतात, आणि

त्या द्वारांतून पहातात. तो आत्मा प्राज्ञ, धारणकर्ता, सर्वांतर, अविनाशी, शुद्ध, पवित्र, तेजस्वी, क्षमायुक्त आणि शान्त आहे. ६.

एष हि खल्वात्माऽन्तर्हृदयेऽणीयानिद्धोऽग्निरिव विश्वरूपोऽस्यैवान्नमिदं सर्वमस्मिन्नोता इमाः प्रजाः । एष आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोकोऽविचिकित्सोऽविपाशः सत्यसंकल्पः सत्यकामः । एष परमेश्वर एष भूताधिपतिरेष भूतपाल एष सेतुर्विधरण एष हि खल्वात्मेशानः शंभुर्भवो रुद्रः प्रजापतिर्विश्वसृग्घिरण्यगर्भः सत्यं प्राणो हंसः शास्ताऽच्युतो विष्णुर्नारायणः । यश्चैषोऽग्नौ यश्चायं हृदये यश्चासावादित्ये स एष एकः । तस्मै ते विश्वरूपाय सत्ये नभसि हिताय नमः ॥७॥

खरोखर हा आत्मा हृदयाच्या अंतर्भागीं स्थित, अणूपेक्षां लहान, पेटलेल्या अग्नीप्रमाणें आणि विश्वरूप आहे. हें सर्व याचें अन्न आहे. या सर्व प्रजा यामध्यें विणलेल्या आहेत. हा आत्मा निष्पाप, अजर, अमर, अशोक, क्षुधारहित, पाशरहित, सत्यसंकल्प, सत्यकाम असा आहे. हाच परमेश्वर, भूताधिपति, भूतांचा पालनकर्ता, धारण करणारा सेतु, आत्मा स्वामी, शंभु, भव, रुद्र, प्रजापति, विश्वस्रष्टा, हिरण्यगर्भ, सत्य, प्राण, हंस, नियमनकर्ता, अढळ, विष्णु आणि नारायण आहे. जो हा अग्नीमध्यें आहे, जो हा हृदयामध्यें आणि जो हा आदित्यामध्यें तो हाच एक आहे. अशा त्या विश्वरूप आणि सत्य आकाशामध्यें (स्वत:ला) ठेवलेल्या तुला नमस्कार असो. ७.

अथेदानीं ज्ञानोपसर्गा राजन् । मोहजालस्यैष वै योनिर्यदस्वर्ग्यैः सह स्वर्ग्यस्यैषः । वाटचे पुरस्तादुक्तेऽप्यधःस्तंबेनाऽऽश्लिष्यन्ति । अथ ये चान्ये ह नित्यप्रमुदिता नित्यप्रवासिता नित्ययाचनका नित्यं शिल्पोपजीविनः, अथ ये चान्ये ह पुरयाचका अयाज्ययाचकाः

शूद्राशिष्याः शूद्राश्च शास्त्रविद्वांसः, अथ ये चान्ये ह चाटजटनटभटप्रव्रजितरंगावतारिणो राजकर्मणि पतितादयः, अथ ये चान्ये ह यक्षराक्षसभूतगणपिशाचोरगग्रहादीनामर्थं पुरस्कृत्य शमयाम इत्येवं ब्रुवाणा, अथ ये चान्ये ह वृथा कषायकुंडलिनः कापालिनः, अथ ये चान्ये ह वृथातर्कदृष्टांतकुहकेंद्रजालैर्वैदिकेषु परिस्थातुमिच्छन्ति। तैः सह न संवसेत्प्रकाशभूता वै ते तस्करा अस्वर्ग्या इति। एवं ह्याह—

"नैरात्म्यवादकुहकैर्मिथ्यादृष्टान्तहेतुभिः।
भ्राम्यल्लोको न जानाति वेदविद्यांतरं तु यत्" ॥८॥

हे राजा, आतां आत्मज्ञानाचीं विघ्नें तुला सांगतों. स्वर्गाला अयोग्य आणि स्वर्गाला योग्य अशा माणसांचा जो हा (इहलोकीं)संबंध येतो तोच मोहरूपी जाळ्याचें कारण होय. समोर मोठाल्या वृक्षांची बाग आहे असें सांगितलें असतांहि हे लहान झुडपालाच चिकटतात. कोणी नित्य हसणारे, नित्य भटकणारे, नित्य मागणारे, नित्य कारागिरींत गुंतलेले असतात. दुसरे कोणी शहरांतून भीक मागणारे, यज्ञ करण्याला अयोग्य अशा माणसांकरितां यज्ञ करणारे, शूद्रांचे शिष्य बनलेले, आणि शास्त्र जाणणारे असून शूद्र असे असतात. दुसरे कोणी दुष्टबुद्धि, जटाधारी, नट, भांडखोर, संन्यासाचें सोंग घेतलेले, बहुरूपी, राजांचे नोकर आणि पापी असतात. दुसरे कोणी यक्ष, राक्षस, भूतगण, पिशाच, नाग इत्यादिकांनीं केलेली बाधा आम्ही पैसे घेऊन घालवितों असें म्हणणारे असतात. दुसरे कोणी वृथा काळीं वस्त्रें धारण करणारे, कापालिक [= मृत माणसाच्या कपाळाच्या कवटींत भिक्षा घेणारे] असतात. दुसरे कोणी खोटें तर्कशास्त्र,

खोटे दृष्टान्त, हातचलाखी, जादूगिरी इत्यादि प्रकार करून वेदानुयायी लोकांमध्यें विघ्नें आणण्याची इच्छा करीत असतात. अशा लोकांच्या सहवासामध्यें राहूं नये. हे प्रत्यक्ष चोर होत. हे स्वर्गाला जाण्याला अयोग्य होत. असें म्हटलें आहे— "नैरात्म्यवादाच्या [=आत्मा नाहीं अशा मताच्या] हातचलाखीनें आणि खोटया दृष्टांतांनीं व अनुमानांनीं भ्रम पावणारे मनुष्य विद्या आणि अ–विद्या यांमधील भेद जाणीत नाहींत." ८.

सदाचारी आणि दुराचारी यांचा सहवास या लोकीं होतो व तोच मोहानें कारण होय असें जें वर सांगितलें तें जगाच्या अनुभवानें समजण्यासारखें आहे.

बृहस्पतिर्वै शुक्रो भूत्वेंद्रस्याभयासुरेभ्यः क्षयायेमामविद्यामसृजत तया शिवमशिवमित्युद्दिशन्त्यशिवं शिवमिति । वेदादिशास्त्रहिंसकधर्माभिध्यानमस्त्विति वदन्ति, अतो नैनामभिधीयेत, अन्यथैषा, वंध्येवैषा, रतिमात्रं फलमस्याः, वृत्तच्युतस्येव, नारंभणीयेति । एवं ह्याह—

"दूरमेते विपरीते विषूची
अविद्या या च विद्येति ज्ञाता ।
विद्याभीप्सितं नचिकेतसं मन्ये
न त्वा कामा बहवो लोलुपन्ते" ॥
"विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयं सह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते" ॥
"अविद्यायामंतरे वेष्टयमानाः
स्वयंधीराः पंडितंमन्यमानाः ।
दंद्रम्यमाणाः परियन्ति मूढा
अंधेनैव नीयमाना यथांधाः" ॥९॥

बृहस्पतीनें इंद्राच्या कल्याणाकरितां आणि असुरांच्या नाशाकरितां शुक्र होऊन ही अविद्या निर्माण केली. हिच्या योगानें शुभाला अशुभ आणि अशुभाला शुभ म्हणतात. वेदादिकांचा आणि शास्त्रांचा नाश करणाऱ्या धर्माचे ठिकाणीं ध्यान असावें असें हे म्हणतात. म्हणून या अविवेकडे लक्ष देऊं नये. ही खोटी आहे. वंध्येप्रमाणें आहे. तात्पुरतें सुख हेंच हिचें फळ. आचार सोडलेल्या माणसासारखेंच. हिचा प्रयत्न करूं नये. असें म्हटलें आहे—"ज्यांना विद्या व अविद्या म्हणतात त्या (एकमेकांपासून फार) दूर, विरुद्ध आणि भिन्न फल देणाऱ्या [विषूची= भिन्न गति देणाऱ्या] आहेत. हे नाचिकेता, (ज्या अर्थीं] नाना प्रकारचे काम तुला लुब्ध करूं शकले नाहींत (त्या-अर्थीं) तूं विद्येची इच्छा करणारा आहेस हें मी जाणतों"[कठ २.४]. "विद्या म्हणजे ज्ञान आणि अविद्या म्हणजे कर्म या दोहोंचा समुच्चय पाहिजे असें जो जाणतो तो कर्मानें संसार तरून ज्ञानानें अमृतत्वाची प्राप्ति करून घेतो" [ईश.११]. "अविद्येच्या मध्यें गुरफटून गेलेले, स्वतःला बुद्धिमान् आणि शास्त्रकुशल समजणारे, नाना प्रकारच्या मार्गांनीं जाणारे मूढ लोक (जन्ममरणादि अनेक दुःखांभोंवतीं) घिरट्या घालतात. जसे आंधळ्यानें नेलेले आंधळे लोक तद्वत्"[कठ.२.५; मुं.१.२.८].९.

देवासुरा ह वै य आत्मकामा ब्रह्मणोऽतिकं प्रयातास्तस्मै नमस्कृत्वोचुः। भगवन्वयमात्मकामाः, स त्वं नो ब्रूहीति। अताश्चिरं ध्यात्वाऽमन्यतान्यतात्मानो वै तेऽसुरा, अतोऽन्यतममेतेषामुक्तम्। तादिमे मूढा उपजीवन्त्यभिष्वंगिणस्तूर्याभिघातिनोऽनृताभिशंसिनः, सत्यमिवानृतं पश्यन्ति इंद्रजालवत्। इत्यतो यद्वेदेष्वाभिहितं तत्सत्यं,

यद्वेदेषूक्तं तद्विद्वांस उपजीवन्ति। तस्माद्ब्राह्मणो नावैदिकमधीयीतायमर्थः स्यादिति ॥१०॥

देव आणि असुर आत्मा जाणण्याची इच्छा करणारे होत्साते ब्रह्मदेवाच्या जवळ जाऊन त्याला नमस्कार करून ह्मणाले— भगवन्! आह्मांला आत्मा जाणण्याची इच्छा आहे, तो आह्मांला आपण सांगा. तेव्हां पुष्कळ काळ ध्यान करून त्यानें विचार केला कीं, या असुरांना आत्मा वेगळा पाहिजे आहे ह्मणून त्यांना त्यानें वेगळें सांगितलें. त्याप्रमाणें हे मूढ लोक अति आसक्त होत्साते, (संसार) तरण्याचें साधन सोडून आयुष्य घालवितात. जादूगिरीप्रमाणें खोटें खरें असें पहातात. ह्मणून जें वेदांमध्यें सांगितलें आहे तें सत्य. जें वेदांमध्यें सांगितलें आहे तें विद्वान् आचरतात. ह्मणून ब्राह्मणानें वेदाविरुद्ध कांहीं शिकूं नये. १०.

एतद्वाव तत्स्वरूपं नभसः खेऽन्तर्भूतस्य यत्परं तेजः। तत्त्रेधाऽभिहितमग्नाआदित्ये प्राणे। एतद्वाव तत्स्वरूपं नभसः खेऽन्तर्भूतस्य यदोमित्येतदक्षरम्। अनेनैव तदुद्बुध्यत्युदयत्युच्छ्वसित्यजस्रं, ब्रह्मधीयालंबं वा। अत्रैव एतत्समीरणे प्रकाशप्रक्षेपकौष्ण्यस्थानीयं, एतद्धूमस्येव समीरणे नभसि प्रशाखयैवोत्क्रम्य स्कंधात्स्कंधमनुसरति। अप्सु प्रक्षेपको लवणस्येव, घृतस्य चौष्ण्यमिव, अभिध्यातुर्विस्तृतिरिवैतादिति। अत्रोदाहरन्ति—"अथ कस्मादुच्यते वैद्युतः?" "यस्मादुच्चारितमात्र एव सर्वं शरीरं विद्योतयति तस्मादोमित्यनेनैतदुपासीतापरिमितं तेजः॥

पुरुषश्चाक्षुषो योऽयं दक्षिणेऽक्षिण्यवस्थितः।
इंद्रोऽयमस्य जायेयं सव्ये चाक्षिण्यवस्थिता॥

समागमस्तयोरेव हृदयांतर्गते सुषौ ।
तेजस्तल्लोहितस्यात्र पिंड एवोभयोस्तयोः ॥
हृदयादायना तावच्चक्षुष्यस्मिन्प्रतिष्ठिता ।
सारणी सा तयोर्नाडी द्वयोरेका द्विधा सती ॥
मनः कायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ।
मारुतस्तूरसि चरन्मंद्रं जनयति स्वरम् ॥
खजाग्नियोगाध्दृदि संप्रयुक्त-
मणोर्ह्यणुर्द्विरणुः कंठदेशे ।
जिह्वाग्रदेशे त्र्यणुकं च विद्धि
विनिर्गतं मातृकमेवमाहुः ॥
न पश्यन्मृत्युं पश्यति न रोगं नोत दुःखताम् ।
सर्वं हि पश्यन्पश्यति सर्वमाप्नोति सर्वशः ॥
चाक्षुषः स्वप्नचारी च सुप्तः सुप्तात्परश्च यः ।
भेदाश्चैतेऽस्य चत्वारस्तेभ्यस्तुर्यं महत्तरम् ॥
त्रिष्वेकपाच्चरेद्ब्रह्म त्रिपाच्चरति चोत्तरे ।
सत्यानृतोपभोगार्थो द्वैधीभावो महात्मन इति
द्वैधीभावो महात्मन इति ॥११॥ इति सप्तमः प्रपाठकः ॥

ब्रह्माकाशाच्या [नभसः] हृदयामध्यें [खे] अंतर्भूत असलेलें जें तेज तेंच वेदाचें स्वरूप होय. तें तीन प्रकारांनीं सांगितलें आहे—अग्नीमध्यें, आदित्यामध्यें आणि प्राणामध्यें. ब्रह्माकाशाच्या हृदयांत अंतर्भूत असलेलें तेज ह्मणजेच ॐ हें अक्षर. या अक्षरानेंच तें तेज वर येतें, उत्पन्न होतें आणि सतत श्वासोच्छ्वास करतें. हा प्रणवात्मक वेद ब्रह्मज्ञानाचा आधार होय. या अवस्थेमध्यें हें तेज प्राणवायु सहकारी असतां [समीरणे सहकारिणि संपन्ने सति] जठराग्नींतील उष्णतारूपी तेज प्रसृत करतें. आकाशामध्यें वायु वहात

असतांना धूम जसा (वृक्षाच्या) शाखेप्रमाणें वर जाऊन आणखी शाखा वाढावितो तद्वत्. अथवा उदकामध्यें मीठ टाकण्याप्रमाणें, अथवा तुपाला उष्णतेच्या स्पर्शाप्रमाणें, अथवा ध्यान करणाराच्या ध्यानाच्या प्रसाराप्रमाणें. याविषयीं (शिष्य) विचारतात—या वेदाला 'वैद्युत' कां म्हणतात? उत्तर–कारण उच्चार केल्याबरोबर हा सर्व शरीर विजेप्रमाणें प्रकाशवितो. म्हणून ॐकारानें या अपरिमित तेजाची उपासना करावी.

हा जो चाक्षुष पुरुष उजव्या डोळ्यामध्यें स्थित आहे तो इंद्र. याची जाया डाव्या डोळ्यामध्यें स्थित आहे. हृदयाच्या अंतर्भागीं असलेल्या जागेमध्यें त्यांचा समागम होतो. तेथें असलेला रक्ताचा गोळा तें त्या दोघांचें तेज. हृदयापासून निघालेली व चक्षूचे ठिकाणीं स्थित झालेली जी सारणी नामक नाडी ती एक असून द्विधारूपानें या दोघांचीहि आहे. मन शारीर अग्नीला चेतवितें, तो अग्नि वायूला प्रेरणा करतो. वायु उरामध्यें संचार करीत मंद आवाज उत्पन्न करतो. घर्षणाग्नीच्या योगानें हृदयामध्यें उत्पन्न झालेला तो आवाज सूक्ष्माहून सूक्ष्म असतो. कंठामध्यें (आल्यावर) तो द्विगुणित होतो आणि जिव्हेच्या अग्रामध्यें (आल्यावर) त्रिगुणित होतो असें जाण. हाच बाहेर आला म्हणजे याला मातृका [=मूळाक्षरें] म्हणतात. (याप्रमाणें यांत सांगितलेलें शब्द ब्रह्माचें तत्त्व) जो जाणतो त्याला रोग आणि दुःख होत नाहीं. हें जाणणारा सर्व जाणतो आणि त्याला सर्व प्रकारें सर्व मिळतें [छां.७.२६.२पहा] चक्षुनें पहाणारा [=जागृत], स्वप्नामध्यें संचार करणारा, झोंपीं गेलेला, आणि झोंपीं गेलेल्याहून पलीकडचा जो तो, असे या

आत्म्याचे (विश्व, तेजस, प्राज्ञ आणि तुर्य नामक) चार भेद आहेत. यांमध्यें (चवथें) तुर्य पद सर्वांत श्रेष्ठ आहे. पहिल्या तिघांमध्यें मिळून चतुर्थांश ब्रह्म संचार करतें, आणि चवथ्यामध्यें तीन चतुर्थांश ब्रह्म संचार करतें. सत्य आणि मिथ्या यांच्या उपभोगाकरितां हा महान् आत्म्याचा द्वैतीभाव आहे. ११.

प्रकाशप्रक्षेपकः = प्रकाशं प्रक्षिपति इति प्रकाशप्रक्षेपकः जठरकुहरचारी अग्निः ।

इति यजुर्वेदीया मैत्र्युपनिषत्समाप्ता ॥

---

# श्वेताश्वतरोपनिषत् ।

हें उपनिषत् कृष्ण यजुर्वेदाचें आहे. दशोपनिषदांच्या खालोखाल—किंबहुना त्यांच्या बरोबरीनेंहि—याचें महत्त्व मानतात. परंतु हें तितकें प्राचीन खास नव्हे. निदान हें ज्या स्वरूपांत आहे त्या स्वरूपांत तरी प्राचीन नव्हे. पहिल्या अध्यायांतले पहिले सहा मंत्र आणि अखेरचा सहावा अध्याय एवढेंच मूळचें उपनिषत् असावें असें कोणी म्हणतात. ऋग्वेद, यजुर्वेद व उपनिषदें यांतले मंत्र जसेच्या तसेच किंवा किंचित् फरकानें यांत बरेच ठिकाणीं आढळतात. सांख्यशास्त्राचा कर्ता कपिल व त्याचें सांख्यशास्त्र, यांचा यांत उल्लेख आहे. योगशास्त्राचें बरेंच वर्णन आहे. रुद्रदेवतेचा उल्लेख आहे, 'माया' व 'भक्ति' हे दोन विशिष्ट शब्द यांतच आले आहेत. या एकंदर प्रमाणांवरून हें उपनिषत् अर्वाचीन असावें. परंतु कांहीं मंत्र अगदीं स्वतंत्र असून त्यांचा पुढील भाष्यकारांनीं व टीकाकारांनीं अनेक ठिकाणीं आधार घेतलेला असल्यानें या उपनिषदाला पुष्कळ महत्त्व आहे. शंकराचार्यांनीं यांतल्या मंत्रांचे आधार बरेच वेळां घेतलेले आहेत. शंकराचार्यांनीं या उपनिषदावर भाष्य मात्र केलेलें नाहीं. शंकराचार्यांच्या नांवावर एक भाष्य विकलें जातें, परंतु त्या भाष्याची भाषा शंकराचार्यांच्या भाषेहून अगदीं कमी दर्जाची आहे, व त्यांत असलेले पुराणांचेहि उल्लेख शंकराचार्यांच्या भाष्यांच्या पद्धतीशीं विसंगत आहेत. हें भाष्य शंकराचार्यांचें आहे अशी कोणींहि समजूत करून घेऊं नये.

सहाव्या अध्यायांतल्या २१ व्या मंत्रावरून कर्त्यांच्या नांवावरून उपनिषदाला नांव मिळालें असें म्हणतां येतें.

## अध्याय पहिला.



ॐ ब्रह्मवादिनो वदन्ति—

किं कारणं ब्रह्म कुतः स्म जाता
जीवाम केन क्व च संप्रतिष्ठाः ।
अधिष्ठिताः केन सुखेतरेषु
वर्तामहे ब्रह्मविदो व्यवस्थाम् ॥१॥

ब्रह्मवादी म्हणतात—(सृष्टीचें) कारण काय आहे? ब्रह्म? आम्ही कोठून जन्मलों? आम्ही कशानें जगतों? आम्ही कोणत्या आधारावर आहोंत? हे ब्रह्मवेत्त्यांनों, कोणाच्या देखरेखीखालीं सुखांत व दुःखांत आम्ही आपल्या व्यवस्थेनें रहातों? १.

"किंकारणं ब्रह्म" याचे आणखी "सृष्टीचें कारण काय आहे? ब्रह्म म्हणजे काय?" किंवा "सृष्टीचें कारण जें ब्रह्म तें कसें आहे?" असेहि अर्थ होऊं शकतील.

कालः स्वभावो नियतिर्यदृच्छा
भूतानि योनिः पुरुष इति चिंत्यम् ।
संयोग एषां न त्वात्मभावा-
दात्माप्यनीशः सुखदुःखहेतोः ॥२॥

काळ, स्वभाव [प्रकृति], नियम, यदृच्छा [कारण नसतां घडलेली गोष्ट], पंचमहाभूतें, स्त्री, पुरुष [आत्मा] यांपैकीं कांहीं कारण आहे काय? यांचा संयोग काहे काय? नाहीं. कारण आत्मा आहे म्हणून [कारण संयोग आत्म्याच्या अस्तित्वावांचून होऊं शकणार नाहीं]. आत्मा देखील कारण नाहीं; कारण सृष्टीमध्यें सुख व दुःख आहेत. २.

ते ध्यानयोगानुगता अपश्य-
न्देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम् ।
यः कारणानि निखिलानि तानि
कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः ॥३॥

जो एक देव काळापासून आत्म्यापर्यंत अशा त्या सर्व कारणांवर देखरेख करतो त्या देवाची स्वतःच्या गुणांमध्यें झांकलेली अशी आत्मशक्ति ध्यानयोगामध्यें रत झालेले ते पहातात. ३.

ध्यानयोगामध्यें, किंवा 'ध्यानामध्यें आणि योगामध्यें' असाहि अर्थ होईल.

तमेकनेमिं त्रिवृतं षोडशांतं
शतार्धारं विंशतिप्रत्यराभिः ।
अष्टकैः षड्भिर्विश्वरूपैकपाशं
त्रिमार्गभेदं द्विनिमित्तैकमोहम् ॥४॥

तो असा— एक धांव असलेली रहाट किंवा चाक, त्याला तीन गुंडाळ्या, सोळा टोकें, पन्नास अरा, वीस प्रत्यरा म्हणजे आडव्या अरा, सहा अष्टकें, विश्वरूप हा एक पाश, तीन भिन्न मार्ग आणि दोन कारणांनीं उत्पन्न झालेला एक मोह याप्रमाणें आहेत. ४.

एक=कारणावस्था तीन=सत्त्व, रज, तम. सोळा=पांच भूतें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि मन. पन्नास=५विपर्यय, २८ अशक्ति, ९ तुष्टि, ८ सिद्धि. वीस=१०इंद्रियें त्यांचे१० विषय सहा अष्टकें=प्रकृत्यष्टक [पांच भूतें, मन, बुद्धि, अहंकार], धात्वष्टक [त्वचा, चर्म, मांस, रक्त, मेद, अस्थि, मज्जा, शुक्र], ऐश्वर्याष्टक [अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशित्व, वशित्व], भावाष्टक [धर्म, अधर्म, ज्ञान, अज्ञान, वैराग्य, अवैराग्य, ऐश्वर्य, अनैश्वर्य], देवाष्टक [ब्रह्मा, प्रजापति, देव, गंधर्व, यक्ष, राक्षस, पितर, पिशाच], आणि

गुणाष्टक [दया, क्षमा, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य, अस्पृहा]. तीन मार्ग=धर्म, अधर्म, ज्ञान. दोन कारणें=पुण्य व पाप.

पंचस्रोतोम्बुं पंचयोन्युग्रवक्रां
पंचप्राणोर्मिं पंचबुद्ध्यादिमूलाम् ।
पंचावर्तां पंचदुःखौघवेगां
पंचाशद्भेदां पंचपर्वामधीमः ॥५॥

पांच प्रवाह, पांच योनींनीं उग्र व वांकडी, पांच प्राणरूपी लाटा, पांच बुद्धि हें मूळ, पांच भोंवरे, पांच दुःखरूपी ओघांचा वेग, पन्नास प्रकार आणि पांच पर्वें असलेल्या नदीसारखा आम्ही त्याला जाणतों. ५.

प्रवाह=ज्ञानेंद्रियें, योनि=पंचमहाभूतें. बुद्धि=प्रत्येक ज्ञानेंद्रियाला होणारें ज्ञान. भोंवरे=विषय. दुःखें=गर्भ, जन्म, जरा, व्याधि, मरण. पन्नास प्रकार मागील श्लोकांत सांगितले तेच. पर्वें= अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश.

सर्वाजीवे सर्वसंस्थे बृहन्ते
तस्मिन्हंसो भ्राम्यते ब्रह्मचक्रे ।
पृथगात्मानं प्रेरितारं च मत्वा
जुष्टस्ततस्तेनामृतत्वमेति ॥६॥

आपण आणि आपणास प्रेरणा करणारा हे वेगळे आहेत असें मानून हंस म्ह० जीवात्मा सर्वांचें जीवन व सर्वांचा नाश ज्यामध्यें आहे अशा या विशाल ब्रह्मचक्रांत फिरतो. तो (प्रेरक) प्रसन्न झाला म्हणजे नंतर त्या प्रसादानें तो (जीव) अमृतत्व पावतो. ६.

उद्गीतमेतत्परमं तु ब्रह्म
तस्मिंस्त्रयं सुप्रतिष्ठाक्षरं च ।
अत्रांतरं ब्रह्मविदो विदित्वा
लीना ब्रह्मणि तत्परा योनिमुक्ताः ॥७॥

हें परम ब्रह्म असें गायिलेलें आहे. त्याच्यामध्यें (भोक्ता, भोग्य व प्रेरिता) हें त्रिकूट आहे. हीच (विश्वाची) प्रतिष्ठा [आधार]. हें अविनाशी आहे. हें आपल्या अंतरीं आहे. असें इहलोकीं जाणून ब्रह्मवेत्ते, ब्रह्मामध्यें लीन होत्साते व ब्रह्मपर होत्साते जन्ममरणापासून मुक्त होतात.

अत्रांतरं=अत्र+आंतरं. "अत्रांतरं ब्रह्म विदो विदित्वा" [=हें अंतरीं असलेलें ब्रह्म इहलोकीं जाणून ज्ञाते लोक] असेहि शब्द तोडतां येतील.

संयुक्तमेतत्क्षरमक्षरं च
व्यक्ताव्यक्तं भरते विश्वमीशः ।
अनीशश्चात्मा बध्यते भोक्तृभावा-
ज्ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥८॥

क्षर आणि अक्षर, व्यक्त आणि अव्यक्त अशा प्रकारें संयुक्त असें हें विश्व ईश्वर संभाळतो. ईश्वराविरहित मी आहें व मी भोक्ता असें जो आत्मा समजला तो बद्ध झाला. देवाचें ज्ञान झाल्यावर सर्वपाशांपासून मुक्त होतो. ८.

ज्ञाज्ञौ द्वावजावीशनीशा-
वजा ह्येका भोक्तृभोगार्थयुक्ता ।
अनंतश्चात्मा विश्वरूपो ह्यकर्ता

अयं यदा विंदते ब्रह्ममेतत् ॥९॥

ज्ञाता आणि अज्ञ, ईश्वर आणि अनीश्वर असे दोन अज [न जन्मलेले] आहेत. ती (प्रकृति देखील) न जन्मलेलीच असून भोक्त्याच्या भोगविषयांनीं युक्त आहे. आत्मा अनंत, विश्वरूप आणि अकर्ता आहे. जेव्हां हें त्रय मनुष्य जाणतो तेव्हां तोच ब्रह्म. ९.

क्षरं प्रधानममृताक्षरं हरः
क्षरात्मानावीशते देव एकः।
तस्याभिध्यानाद्योजनात् तत्त्वभावाद्-
भूयश्चांते विश्वमायानिवृत्तिः ॥१०॥

प्रधान म्हणजे प्रकृति किंवा दृश्य जग विनाशी आहे. हर म्हणजे परमात्मा अमर आणि अविनाशी आहे. त्याच्या सतत ध्यानानें, त्याच्याशीं युक्त झाल्यानें, आणि त्याचेंच रूप पावल्यानें अखेरीस सर्व प्रकारची माया नाश पावते. १०.

ज्ञात्वा देवं सर्वपाशापहानिः
क्षीणैः क्लेशैर्जन्ममृत्युप्रहाणिः।
तस्याभिध्यानात्तृतीयं देहभेदे
विश्वैश्वर्यं केवल आप्तकामः ॥११॥

देवाला जाणलें म्हणजे सर्व पाश नाहींसे होतात; आणि (त्यामुळें) क्लेश क्षीण झाले म्हणजे जन्म व मृत्यु यांचा नाश होतो. त्याच्या सतत ध्यानानें विश्वैश्वर्यरूपी तृतीय अवस्था देहाच्या नाशानंतर प्राप्त होते. तेव्हां तो एक (ब्रह्मरूप) होत्साता आप्तकाम होतो. ११.

एतज्ज्ञेयं नित्यमेवात्मसंस्थं
नातः परं वेदितव्यं हि किंचित्।
भोक्ता भोग्यं प्रेरितारं च मत्वा
सर्वं प्रोक्तं त्रिविधं ब्रह्ममेतत् ॥१२॥

हें नित्य तत्त्व (स्वतःच्या) आत्म्यामध्यें स्थित आहे हेंच जाणलें पाहिजे. याहून श्रेष्ठ असें दुसरें कांहींहि जाणण्यासारखें नाहीं. भोक्ता, भोग्य व प्रेरिता यांचें (हें) ज्ञान झालें म्हणजे सर्व बोलणें झालें. असें हें ब्रह्म त्रिविध आहे. १२.

वह्नेर्यथा योनिगतस्य मूर्ति-
र्न दृश्यते नैव च लिंगनाशः।
स भूय एवेंधनयोनिगृह्य-
स्तद्वोभयं वै प्रणवेन देहे ॥१३॥

ज्याप्रमाणें अग्नीच्या उत्पत्तिकारणाचे ठिकाणीं [काष्ठामध्यें] अग्नीचें रूप दिसत नाहीं, पण त्याच्या सूक्ष्म शरीराचा नाश झालेला नसतो, आणि तो पुनः इंधनरूपी कारणापासून घेतां येण्यासारखा असतो, तद्वत दोन्ही प्रकारचें ब्रह्म देहामध्येंच ॐकारानें समजण्यासारखें आहे. १३.

स्वदेहमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम्।
ध्याननिर्मथनाभ्यासाद्देवं पश्येन्निगूढवत् ॥१४॥

स्वतःचा देह ही खालची अरणि [अग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ] व ॐकार ही वरची अरणि करून ध्यानरूपी सतत मंथनानें गूढ रूपानें असलेला देव (प्रत्यक्ष) पहावा. १४.

तिलेषु तैलं दधनीव सर्पि-
रापः स्रोतस्स्वरणीषु चाग्निः ।
एवमात्मात्मनि गृह्यतेऽसौ
सत्येनैनं तपसा योऽनुपश्यति ॥१५॥

तिळांमध्यें जसें तेल, दह्यामध्यें जसें लोणी, नदीच्या कोरड्या ओघामध्यें जसें पाणी, आणि अरणींमध्यें जसा अग्नि, त्याप्रमाणें जो सत्यानें (म्हणजे ज्ञानानें) आणि तपानें याला शोधतो त्याला हा आत्मा स्वतःच्या आत्म्यामध्येंच घेतां (म्हणजे जाणतां) येतो. १५.

सर्वव्यापिनमात्मानं क्षीरे सर्पिरिवार्पितम् ।
आत्मविद्यातपोमूलं तद्ब्रह्मोपनिषत्परं
तद्ब्रह्मोपनिषत्परमिति ॥ १६ ॥
इति प्रथमोऽध्यायः ॥

दुधामध्यें जसें लोणी असतें तसा सर्वव्यापी आत्मा, आत्मज्ञान आणि तप हीं ज्याचें मूळ म्हणजे कारण आहेत असा जो तोच ब्रह्म होय. हीच सर्वांत श्रेष्ठ उपनिषत् म्हणजे गूढ विद्या होय. १६.

---

## अध्याय दुसरा.



१—७ सवित्याचें स्तवन—

युंजानः प्रथमं मनस्तत्त्वाय सविता धियः ।
अग्निर्ज्योतिर्निचाय्य पृथिव्या अध्याभरत् ॥१॥

प्रथम मन आणि बुद्धि तत्त्वाकरितां जोडणारा सविता अग्नीचें तेज जमवून पृथिवीवर आणता झाला. १.

युक्तेन मनसा वयं देवस्य सवितुः सवे ।
सुवर्गेयाय शक्त्या ॥२॥

(ब्रह्माचे ठिकाणीं) युक्त झालेल्या मनानें आणि सविता देवाच्या प्रेरणेनें आम्ही स्वर्गाकरितां आणि सामर्थ्याकरितां यत्न करावा. २.

युक्त्वाय मनसा देवान्सुवर्यतो धिया दिवम् ।
बृहज्ज्योतिः करिष्यतः सविता प्रसुवाति तान् ॥३॥

मनाचा इंद्रियांशीं संयोग करून बुद्धीनें तेजस्वी स्वर्गलोकीं जाऊं इच्छिणाऱ्या व मोठी प्रभा करूं इच्छिणाऱ्या त्यांना सविता प्रेरणा करो. ३.

युंजते मन उत युंजते धियो
विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः ।
वि होत्रा दधे वयुनाविदेक इन्
मही देवस्य सवितुः परिष्टुतिः ॥४॥

शहाणा, मोठा आणि ज्ञाता अशा सवित्याचे ठिकाणीं शहाणे लोक (आपलें) मन आणि (आपले) विचार युक्त करतात. कर्में जाणणाऱ्या त्यानें हवनकर्में नेमून दिलीं आहेत. ही सविता देवाची मोठी स्तुति होय. ४.

युजे वां ब्रह्म पूर्व्यं नमोभि-
र्विश्लोक यन्ति पथ्येव सूराः ।
शृण्वन्ति विश्वे अमृतस्य पुत्रा
आ ये धामानि दिव्यानि तस्थुः ॥५॥

तुमचें प्राचीन ब्रह्म (किंवा स्तवन) मी नमस्कारांनीं युक्त करतों. माझे श्लोक सूर्याप्रमाणें सर्व मार्गांनीं जातात. जे दिव्य धामांमध्यें रहात आहेत ते सर्व देवांचे पुत्र (माझें स्तवन) ऐकत आहेत. ५.

हे पांच मंत्र तैत्तिरीयसंहितेमधून घेतले आहेत [ ४.१.१.१-५ ]. शिवाय चवथा मंत्र ऋग्वेद [ ५.८१.१ ] वाजसनेयिसंहिता [ ५.१४ व ११.४ ] यांमध्यें, आणि पांचवा ऋग्वेद [ १०.१३.१ ] व वाजसनेयिसंहिता [ ११.५ ] यांमध्येंहि आहेत.

अग्निर्यत्राभिमथ्यते वायुर्यत्राभिरुध्यते ।
सोमो यत्रातिरिच्यते तत्र संजायते मनः ॥६॥

जेथें अग्नीचें मंथन केलें जातें, जेथें (त्याकरितां) वायु युक्त केला जातो, जेथें साम भरपूर असतो, तेथें मन प्रसन्न होतें. ६.

सवित्रा प्रसवेन जुषेत
तत्र योनिं कृण्वसे न हि ते पूर्वमक्षिपत् ॥७॥

सवित्याच्या प्रेरणेनें प्राचीन ब्रह्मामध्यें (किंवा स्तवनामध्यें) आनंद मानावा. तेथें आपलें जन्मकारण आहे असें जाण. कारण (एरवीं) तुझें पूर्वीचें कर्म तुला सुटत नाहीं. ७.

हा मंत्र ऋग्वेदामधून [ ६.१६.१८ ] घेतला आहे.

८–१३ योगाचे नियम व उपयोग—

त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं
हृदीन्द्रियाणि मनसा संनिवेश्य ॥
ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वा-
न्स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥८॥

(मस्तक, छाती व मान) हीं तीन उंच करून, शरीर सम ठेवून, मनासह इंद्रियांना हृदयामध्यें ठेवून, विद्वानानें ब्रह्मरूपी नौकेनें सर्व भयावह नद्या तरून जावें. ८.

**प्राणान्प्रपीड्येह संयुक्तचेष्टः**
**क्षीणे प्राणे नासिकयोच्छ्वसीत ।**
**दुष्टाश्वयुक्तमिव वाहमेनं**
**विद्वान्मनो धारयेताप्रमत्तः ॥९॥**

या शरीरांत [इह] प्राणांना दाबून (आहारविहारादि) कर्मे परिमित प्रकारें करणारा होत्साता नासिकेनें किंचित् प्राणानें श्वसन करावें. दुष्ट अश्वांनीं युक्त अशा रथाप्रमाणें हें मन विद्वानानें प्रमादयुक्त न होतां (स्वाधीन) ठेवावें. ९.

**समे शुचौ शर्करावह्निवालुका-**
**विवर्जिते शब्दजलाश्रयादिभिः ।**
**मनोनुकूले न तु चक्षुपीडने**
**गुहानिवाताश्रयणे प्रयोजयेत् ॥१०॥**

समान, पवित्र, गारगोट्या-अग्नि-व-वाळू यांनीं रहित, शब्द—जल—व—आश्रय इत्यादिकांनीं मनाला अनुकूल असलेल्या, चक्षूला पीडा न करणाऱ्या आणि गुहेंतल्या वारा न वहाणाऱ्या ठिकाणीं योगाचा अभ्यास करावा. १०.

**नीहारधूमार्कानिलानलानां**
**खद्योतविद्युत्स्फटिकशशीनाम् ।**

एतानि रूपाणि पुरःसराणि
ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे ॥११॥

योगामध्यें धुकें, धूर, सूर्य, वायु, अग्नि, काजवा, वीज, स्फटिक, चंद्र हीं रूपें पुढें दिसूं लागलीं म्हणजे तीं ब्रह्माचें दर्शन करणारीं होत. ११.

पृथ्व्यप्तेजोनिलखे समुत्थिते
पंचात्मके योगगुणे प्रवृत्ते ।
न तस्य रोगो न जरा न मृत्युः
प्राप्तस्य योगाग्निमयं शरीरम् ॥१२॥

पृथिवी, उदक, तेज, वायु व आकाश यांपासून निघालेला पांच प्रकारचा योगगुण प्रवृत्त झाल्यावर योगाग्निमय शरीर प्राप्त झालेल्या त्या योग्याला रोग, जरा आणि दुःख नाहींत. १२.

लघुत्वमारोग्यमलोलुपत्वं
वर्णप्रसादं स्वरसौष्ठवं च ।
गंधः शुभो मूत्रपुरीषमल्पं
योगप्रवृत्तिं प्रथमां वदन्ति ॥१३॥

हलकेपणा, आरोग्य, निरासक्ति, शरीरकांतीची प्रसन्नता, आवाजाचा चांगलेपणा, सुगंध आणि मूत्र—पुरीषांचें अल्पत्व हीं झालीं म्हणजे योगमार्गांतला पहिला मुक्काम झाला असें म्हणतात. १३.

यथैव बिंबं मृदयोपलिप्तं
तेजोमयं भ्राजते तत्सुधान्तम् ।

तद्वाऽऽत्मतत्त्वं प्रसमीक्ष्य देही
एकः कृतार्थो भवते वीतशोकः ॥१४॥

जसा मातीनें माखलेला आरसा चांगला धुतला म्हणजे तोच तेजस्वी होऊन लकलकतो, त्याप्रमाणें मनुष्य आत्मतत्त्व प्रत्यक्ष पाहून एक [भेदरहित], कृतार्थ आणि वीतशोक होतो. १४.

यदाऽऽत्मतत्त्वेन तु ब्रह्मतत्त्वं
दीपोपमेनेह युक्तः प्रपश्येत् ।
अजं ध्रुवं सर्वतत्त्वैर्विशुद्धं
ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥१५॥

दीपरूपी साधनानें जशी एखादी वस्तु पहातां येते, त्याप्रमाणें आत्मतत्त्वरूपी साधनानें योगाभ्यासी जेव्हां या लोकींच ब्रह्मतत्त्व पहातो, तेव्हां तो अज, ध्रुव, सर्व तत्त्वांनीं शुद्ध अशा देवाला जाणून सर्व पाशांपासून मुक्त होतो. १५.

एष ह देवः प्रदिशोऽनु सर्वाः
पूर्वो ह जातः स उ गर्भे अंतः ।
स एव जातः स जनिष्यमाणः
प्रत्यङ्जनांस्तिष्ठति सर्वतोमुखः ॥१६॥

हा देव सर्व दिशांच्या संमुख आहे; हा (सर्वांच्या) पूर्वीं उत्पन्न झाला आहे; हा गर्भामध्येंहि आहे. हा उत्पन्न झालेला आहे व होणारा आहे. हा सर्वतोमुख होत्साता लोकांच्या समोर उभा आहे. १६.

हा मंत्र वाजसनेयिसंहितेमधून [३२.४] घेतला आहे.

यो देवो अग्नौ यो अप्सु यो विश्वं भुवनमाविवेश ।
य ओषधीषु यो वनस्पतिषु तस्मै देवाय नमो नमः ॥१७॥

जो देव अग्नीमध्यें आहे, जो उदकामध्यें आहे, ज्यानें सर्व भुवनामध्यें प्रवेश केलेला आहे, जो ओषधींमध्यें आहे, जो वनस्पतींमध्यें आहे, त्या देवाला नमस्कार असो.

इति द्वितीयोऽध्यायः ॥२॥

---

## अध्याय तिसरा.

य एको जालवानीशत ईशनीभिः
सर्वाँल्लोकानीशत ईशनीभिः ।
य एवैत उद्भवे संभवे च
य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥१॥

जो एक जाळें पसरणारा (आपल्या) शक्तींनीं सत्ता चालवितो, शक्तींनीं सर्व लोकांवर म्हणजे जगतांवर सत्ता चालवितो, जो केवळ एकटाच विश्वाच्या उत्पत्तिकाळीं व संहारकाळीं रहातो, अशा देवाला जे जाणतात ते मरणरहित होतात. १.

एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थु-
र्य इमाँल्लोकानीशत ईशनीभिः ।
प्रत्यङ् जनास्तिष्ठति संचुकोपान्तकाले
संसृज्य विश्वा भुवनानि गोपाः ॥२॥

रुद्र खरोखर एक आहे. दुसऱ्या रुद्राकरितां कोणी तिष्ठत नाहीं. तो (आपल्या) शक्तींनीं या लोकांवर सत्ता चालवितो. तो लोकांच्या समोर उभा आहे. सर्व भुवनें उत्पन्न करून त्यांचें पालन करणारा तो (विश्वाच्या) अंतकाळीं खवळतो. २.

विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो
विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् ।
सं बाहुभ्यां धमति संपतत्रै-
र्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥३॥

सर्वत्र चक्षु असलेला आणि सर्वत्र मुख असलेला, सर्वत्र बाहु असलेला, सर्वत्र पाय असलेला हा एक देव, स्वर्ग आणि पृथिवी निर्माण करतांना आपल्या दोन बाहूंनीं आणि अनेक पंखांनीं भाता चालवितो. ३.

यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च
विश्वाधिपो रुद्रो महर्षिः ।
हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं
स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥४॥

जो देवांचें उत्पत्तिस्थान आणि देवांना उत्पन्न करणारा, जो रुद्र विश्वाचा अधिपति, जो महर्षि आहे, ज्यानें प्रथमतः हिरण्यगर्भाला उत्पन्न केलें, तो आह्मांला शुभ बुद्धीनें युक्त करो. ४.

या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी ।
तया नस्तनुवा शंतमया गिरिशन्ताभिचाकशीहि ॥५॥

हे रुद्रा, तुझी जी तनु कल्याणकारक, भयंकर नसलेली आणि पापाचा नाश करणारी आहे, त्या शांत तनूनें, हे गिरिनिवासा, आह्मांला दर्शन दे. ५.

यामिषुं गिरिशन्त हस्ते बिभर्ष्यस्तवे ।
शिवां गिरित्र तां कुरु मा हिँसीः पुरुषं जगत् ॥६॥

जो देव अग्नीमध्यें आहे, जो उदकामध्यें आहे, ज्यानें सर्व भुवनामध्यें प्रवेश केलेला आहे, जो ओषधींमध्यें आहे, जो वनस्पतींमध्यें आहे, त्या देवाला नमस्कार असो.

इति द्वितीयोऽध्यायः ॥२॥

---

## अध्याय तिसरा.

---

य एको जालवानीशत ईशनीभिः
सर्वाँल्लोकानीशत ईशनीभिः ।
य एवैत उद्भवे संभवे च
य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥१॥

जो एक जाळें पसरणारा (आपल्या) शक्तींनीं सत्ता चालवितो, शक्तींनीं सर्व लोकांवर म्हणजे जगतांवर सत्ता चालवितो, जो केवळ एकटाच विश्वाच्या उत्पत्तिकाळीं व संहारकाळीं रहातो, अशा देवाला जे जाणतात ते मरणरहित होतात. १.

एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थु-
र्य इमाँल्लोकानीशत ईशनीभिः ।
प्रत्यङ् जनास्तिष्ठति संचुकोपान्तकाले
संसृज्य विश्वा भुवनानि गोपाः ॥२॥

रुद्र खरोखर एक आहे. दुसऱ्या रुद्राकरितां कोणी तिष्ठत नाहीं. तो (आपल्या) शक्तींनीं या लोकांवर सत्ता चालवितो. तो लोकांच्या समोर उभा आहे. सर्व भुवनें उत्पन्न करून त्यांचें पालन करणारा तो (विश्वाच्या) अंतकाळीं खवळतो. २.

**विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो**
**विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात् ।**
**सं बाहुभ्यां धमति संपतत्रै-**
**र्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥३॥**

सर्वत्र चक्षु असलेला आणि सर्वत्र मुख असलेला, सर्वत्र बाहु असलेला, सर्वत्र पाय असलेला हा एक देव, स्वर्ग आणि पृथिवी निर्माण करतांना आपल्या दोन बाहूंनीं आणि अनेक पंखांनीं भाता चालवितो. ३.

**यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च**
**विश्वाधिपो रुद्रो महर्षिः ।**
**हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं**
**स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥४॥**

जो देवांचें उत्पत्तिस्थान आणि देवांना उत्पन्न करणारा, जो रुद्र विश्वाचा अधिपति, जो महर्षि आहे, ज्यानें प्रथमतः हिरण्यगर्भाला उत्पन्न केलें, तो आम्हांला शुभ बुद्धीनें युक्त करो. ४.

**या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी ।**
**तया नस्तनुवा शंतमया गिरिशन्ताभिचाकशीहि ॥५॥**

हे रुद्रा, तुझी जी तनु कल्याणकारक, भयंकर नसलेली आणि पापाचा नाश करणारी आहे, त्या शांत तनूनें, हे गिरिनिवासा, आम्हांला दर्शन दे. ५.

**यामिषुं गिरिशन्त हस्ते बिभर्ष्यस्तवे ।**
**शिवां गिरित्र तां कुरु मा हिँसीः पुरुषं जगत् ॥६॥**

हे गिरिनिवासा, जो बाण तूं फेकण्यासाठीं हातामध्यें धरला आहेत तो, हे पर्वताच्या पालनकर्त्या, कल्याणप्रद कर. मनुष्य किंवा पशु यांना मारूं नकोस. ६.

ततः परं ब्रह्मपरं बृहन्त
यथानिकायं सर्वभूतेषु गूढम् ।
विश्वस्यैकं परिवेष्टितार-
मीशं तं ज्ञात्वाऽमृता भवन्ति ॥७॥

याहून श्रेष्ठ ब्रह्म आहे. तें श्रेष्ठ आहे, मोठें आहे, सर्व भूतांचे ठिकाणीं त्या त्या शरीरांत गुप्त रूपानें आहे. सर्व विश्वाला व्यापणाऱ्या त्या एका ईश्वराला जाणून (जाणणारे) मरणरहित होतात. ७.

वेदाहमेतं पुरुषं महान्त-
मादित्यवर्णं तमसः परस्तात् ।
तमेव विदित्वाऽति मृत्युमेति
नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ॥८॥

आदित्याप्रमाणें वर्ण असलेल्या, तमाच्या पलीकडचा हा महान् पुरुष मी जाणतों. त्यालाच जाणून (जाणणारा) मृत्यूच्या पलीकडे जातो. मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं. ८.

यस्मात्परं नापरमस्ति किंचि-
द्यस्मान्नाणीयो न ज्यायोऽस्ति कश्चित् ।
वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येक-
स्तेनेदं पूर्णं पुरुषेण सर्वम् ॥९॥

ज्याहून श्रेष्ठ कांहीं नाहीं, कनिष्ठ कांहीं नाहीं, ज्याहून लहान कांहीं

नाहीं, ज्याहून मोठें कांहीं नाहीं; (जो) वृक्षाप्रमाणें स्तब्ध स्वर्गामध्यें एकटा उभा राहिला आहे; या पुरुषानें हें सर्व विश्व भरलें आहे. ९.

**ततो यदुत्तरतरं तदरूपमनामयम् ।**
**य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति**
**अथेतरे दुःखमेवापियन्ति ॥१०॥**

या जगाच्या जें पलीकडचें तें रूपरहित व रोगरहित आहे. हें जे जाणतात ते मरणरहित होतात. इतर दुःखाप्रतच जातात. १०.

**सर्वाननशिरोग्रीवः सर्वभूतगुहाशयः ।**
**सर्वव्यापी स भगवांस्तस्मात्सर्वगतः शिवः ॥११॥**

सर्वांचें मुख, सर्वांचें मस्तक, सर्वांची मान, सर्व प्राण्यांच्या बुद्धीचे ठिकाणीं राहिलेला, सर्व व्यापणारा असा तो भगवान् आहे. म्हणून सर्वत्र स्थित व कल्याणाकारक आहे. ११.

**महान्प्रभुर्वै पुरुषः सत्त्वस्यैष प्रवर्तकः ।**
**सुनिर्मलामिमां प्राप्तिमीशानो ज्योतिरव्ययः ॥१२॥**

हा पुरुष महान्, स्वामी, सत्त्वाचा प्रवर्तक, या अत्यंत निर्मल लाभाचा धनी, तेजोरूप व नाशरहित आहे. १२.

**अंगुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा**
**सदा जनानां हृदये संनिविष्टः ।**
**हृदा मन्वीशो मनसाऽभिक्लृप्तो**
**य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥१३॥**

अंगुष्ठप्रमाण पुरुष अंतरात्मा आहे व तो नेहमीं माणसांच्या हृदयामध्यें बसलेला आहे. हा ज्ञानाचा ईश आहे, हृदयानें आणि

मननानें समजणारा आहे, याला जे जाणतात ते मरणरहित होतात. १३.

या मंत्रांतले चरण कठोपनिषदांत निरानिराळ्या ठिकाणीं आले आहेत.

**सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।**
**स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलम् ॥१४॥**

पुरुषाला अनंत शिरें, अनंत डोळे, अनंत पाय आहेत. पृथिवीला सर्व बाजूंनीं व्यापून तो (आणखी) दहा अंगुळें उरलाच आहे. १४.

**पुरुष एवेदꣳ सर्वं यद्भुतं यच्च भव्यम् ।**
**उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ॥१५॥**

हें सर्व, जें मागें झालेलें आणि जें पुढें होणारें तें सर्व हा पुरुष होय. तसेंच हा अमृतत्वाचा स्वामी आहे. जें अन्नानें वाढतें त्याचाहि स्वामी आहे. १५.

१४ आणि १५ मंत्र ऋग्वेदांतील [१०.९०] पुरूषसूक्तांतले सर्वांच्या परिचयाचे आहेत.

**सर्वतःपाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतःश्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥१६॥**

हें सर्वत्र हस्तपाद असलेलें असें तें विश्वामध्यें सर्व व्यापून राहिलें आहे. १६.

हा श्लोक भगवद्गीतेंत [१३.१३] आला आहे.

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।**
**सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं बृहत् ॥१७॥**

सर्व इंद्रियांचे गुण याच्यामध्यें आहेत असें भासत असून सर्व इंद्रियांनीं हा रहित आहे. सर्वांचा राजा व सत्ताधारी आणि सर्वांचें मोठें आश्रयस्थान हें आहे. १७.

पहिली ओळ गीतेमध्यें [१३.१४] आहे.

नवद्वारे पुरे देही हंसो लेलायते बहिः ।
वशी सर्वस्य लोकस्य स्थावरस्य चरस्य च ॥१८॥

स्थावर आणि चर अशा सर्व जगताचा स्वामी नऊ द्वारें असलेल्या या (देहरूपी) नगरांत रहाणारा देही म्हणजे आत्मा हंस बाहेरचा व्यवहार करतो. १८.

कठ [ ५.१ ] पहा.

अपाणिपादो जवनो ग्रहीता
पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।
स वेत्ति वेद्यं न च तस्यास्ति वेत्ता
तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम् ॥१९॥

तो हस्तपादरहित असून घेणारा, वेगवान्, आहे. चक्षु नसून पहाणारा आहे. कान नसून ऐकणारा आहे. जाणण्याचा सर्व विषय तो जाणतो, पण त्याला जाणणारा कोणी नाहीं. त्याला सर्वश्रेष्ठ व पुराण पुरुष ह्मणतात. १९.

अणोरणीयान्महतो महीया-
नात्मा गुहायां निहितोऽस्य जंतोः ।
तमक्रतुं पश्यति वीतशोको
धातुः प्रसादान्महिमानमीशम् ॥२०॥

या सर्व प्राणिमात्राचा सूक्ष्माहून सूक्ष्म आणि स्थूलाहून स्थूल असा आत्मा बुद्धिरूपी गुहेमध्यें ठेवलेला आहे. जगत्स्रष्टयाच्या कृपेनें शोकरहित झालेला मनुष्य त्या अकर्त्या ईश्वराला आणि त्याच्या महिम्याला पहातो. २०.

तैत्तिरीय आरण्यकांत [१०.१०.१] हा मंत्र असून कठोपनिषदांत [२.२०] किंचित् फरकानें आहे.

वेदाहमेतमजरं पुराणं
सर्वात्मानं सर्वगतं विभुत्वात् ।
जन्मनिरोधं प्रवदन्ति यस्य
ब्रह्मवादिनो हि प्रवदन्ति नित्यम् ॥ २१ ॥

अजर, पुराण, सर्वांचा आत्मा, सर्वव्यापित्वामुळें सर्वांचे ठिकाणीं असलेला, ज्याला जन्म नाहीं असें ह्मणतात, आणि ब्रह्मवेत्ते नित्य ज्याच्याविषयीं बोलतात असा हा मी जाणतों. २१.

इति तृतीयोऽध्यायः ॥

---

## अध्याय चवथा.



य एकोऽवर्णो बहुधा शक्तियोगा-
द्वर्णाननेकान्निहितार्थो दधाति ।
वि चैति चान्ते विश्वमादौ स देवः
स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥१॥

जो एक आहे—व ज्याला कांहीं अर्थ साधावयाचा नाहीं असा स्वतः अवर्ण (किंवा अरूप) असतां आपल्या शक्तीच्या योगानें अनेक वर्ण

(किंवा रूपें) धारण करतो, आणि आरंभीं व अंतीं ज्याच्यामध्यें विश्व जातें तोच देव. तो आम्हांस शुभ बुद्धीनें युक्त करो. १.

तदेवाग्निस्तदादित्यस्तद्वायुस्तदु चंद्रमाः ।
तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदापस्तत्प्रजापतिः ॥२॥

तोच अग्नि, तोच आदित्य, तोच वायु, तोच चंद्र, तोच शुक्र, तोच ब्रह्म, तोच उदक आणि तोच प्रजापति.

हा मंत्र वाजसनेयिसंहितेमध्यें [३२.१] आहे.

त्वं स्त्री त्वं पुमानसि
त्वं कुमार उत वा कुमारी ।
त्वं जीर्णो दंडेन वंचसि
त्वं जातो भवसि विश्वतोमुखः ॥३॥

तूंच स्त्री, तूंच पुरुष, तूंच कुमार, तूंच कुमारी. तूं म्हातारा काठीनें चालतोस. तूं जन्मल्याबरोबर विश्वतोमुख होतोस. ३.

हा मंत्र अथर्ववेदांत [१०.८.२७] आहे.

नीलः पतंगो हरितो लोहिताक्ष-
स्तडिद्गर्भ ऋतवः समुद्राः ।
अनादिमत्त्वं विभुत्वेन वर्तसे
यतो जातानि भुवनानि विश्वा ॥४॥

निळा, हिरवा आणि तांबड्या डोळयांचा पक्षी तूं आहेस. मेघ तूं, ऋतु तूं, समुद्र तूं. आदिरहित व ज्याच्यापासून सर्व भुवनें निर्माण झालीं असा तूं सर्व व्यापून रहातोस. ४.

**अजामेकां लोहितशुक्लकृष्णां**
**बह्वीः प्रजाः सृजमानां सरूपाः**
**अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते**
**जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्यः ॥५॥**

पांढऱ्या, तांबड्या व काळ्या [=सत्त्व, रज व तम] रंगांनीं युक्त, पुष्कळ प्रजा निर्माण करणारी व स्वतःप्रमाणेंच अज म्हणजे जन्म-रहित असलेली जी एक (प्रकृति) तिला एक अज [जीव] प्रीतियुक्त होत्साता सतत भोगतो. दुसरा अज [शिव] ती भुक्तभोगा झाली म्हणजे सोडतो. ५.

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया**
**समानं वृक्षं परिषस्वजाते ।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्व-**
**त्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥६॥**

दोन पक्षी, जवळ रहाणारे, एकमेकाचे मित्र समान वृक्षाला मिठी मारून आहेत. त्यांपैकीं एक गोड फळ खातो; दुसरा न खातां बघतो. ६.

हा मंत्र ऋग्वेदामधून [१.१६४.२०] घेतला आहे. हा मुंडकोप-निषदांतहि [३.१.१] आलेला आहे.

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नो-**
**ऽनीशया शोचति मुह्यमानः**
**जुष्टं यदा पश्यत्यन्यमीश-**
**मस्य महिमानमिति वीतशोकः ॥७॥**

एकाच वृक्षांतला तो एक पुरुष (जीव) बुडालेला होत्साता स्वामित्व नाहींसें झाल्यामुळें मोहयुक्त होऊन शोक करतो. जेव्हां दुसरा (शिव) संतुष्ट आहे, स्वामी आहे व त्याचा हा महिमा आहे असें पहातो तेव्हां दुःखरहित होतो. ७.

हा मंत्र मुंडकोपनिषदांत [३.१.२] आहे.

ऋचो अक्षरे परमे व्योमन्—
न्यस्मिन्देवा अधि विश्वे निषेदुः ।
यस्तं न वेद किमृचा करिष्यति
य इत्तद्विदुस्त इमे समासते ॥८॥

अविनाशी व उंच आकाशामध्यें ऋचा (म्हणजे ऋग्वेद) आहेत. त्यांचे ठिकाणीं सर्व देव स्थित आहेत. पण जो तें (ब्रह्म) जाणीत नाहीं तो ऋचांनीं काय करणार ? जे तें जाणतात ते हे येथें बसले आहेत. ८.

हा मंत्र ऋग्वेदांतून [१.१६४.३९] घेतला आहे.

छंदांसि यज्ञाः क्रतवो व्रतानि
भूतं भव्यं यच्च वेदा वदन्ति ।
अस्मान्मायी सृजते विश्वमेत-
त्तस्मिंश्चान्यो मायया संनिरुद्धः ॥९॥

वेद, यज्ञ, क्रतु, व्रतें, भूत, भविष्य, आणि जें वेद सांगतात, तें हें सर्व विश्व ज्याच्यापासून मायी म्हणजे मायेचा स्वामी उत्पन्न करतो, त्याच्यामध्यें दुसरा (जीव) मायेनें बद्ध झालेला रहातो. ९.

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ।

तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥१०॥

माया ह्मणजेच प्रकृति आणि मायी ह्मणजे महेश्वर जाणावा. त्याच्या अवयवरूपी जीवांनीं हें सर्व जग व्यापलें आहे. १०.

यो योनिं योनिमधितिष्ठत्येको
यस्मिन्निदं स च वि चैति सर्वम् ।
तमीशानं वरदं देवमीड्यं
निचाय्येमां शांतिमत्यंतमेति ॥११॥

जो एकटा प्रत्येक उत्पत्तिकारणाचें अधिष्ठान आहे, आणि ज्याच्यामध्यें हें सर्व एकत्र होतें, व विभक्त होतें, त्या वरद, प्रकाशमान व पूजनीय अशा ईश्वराला जाणून ही शांति पूर्णपणें पावतो. ११.

यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च
विश्वाधिपो रुद्रो महर्षिः ।
हिरण्यगर्भं पश्यत जायमानं
स नो बुद्ध्या शुभया संयुनक्तु ॥१२॥

जो देवांचें उत्पत्तिस्थान आणि देवांना उत्पन्न करणारा, जो रुद्र विश्वाचा अधिपति, जो महर्षि आहे, ज्यानें हिरण्यगर्भ जन्मतांना पाहिला, तो आह्मांला शुभ बुद्धीनें युक्त करो. १२.

हा मंत्र किंचित् फरकानें पूर्वी [३ ४] तिसऱ्या अध्यायांत येऊन गेला आहे.

यो देवानामधिपो
यस्मिँल्लोका अधिश्रिताः ।
य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः
कस्मै देवाय हविषा विधेम ॥१३॥

जो देवांचा अधिपति, ज्याच्यामध्यें हे लोक आश्रय करून राहिले आहेत, जो या द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांवर सत्ता चालवितो, अशा कोणत्या देवाची आह्मीं हवि देऊन पूजा करावी ?

यांतले अखेरचे दोन चरण ऋग्वेदामधले [१०.१२१] आहेत.

सूक्ष्मातिसूक्ष्मं कलिलस्य मध्ये
विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम् ।
विश्वस्यैकं परिवेष्टितारं
ज्ञात्वा शिवं शान्तिमत्यंतमेति ॥१४॥

या जाळ्यामध्यें किंवा गोंधळामध्यें सूक्ष्माहून अति सूक्ष्म, विश्वाला उत्पन्न करणारा, अनेक रूपें असलेला, विश्वाचा एक गुंडाळणारा अशा शिवाला किंवा कल्याणकारकाला जाणून मनुष्य शांति पूर्णपणें पावतो. १४.

स एव काले भुवनस्य गोप्ता
विश्वाधिपः सर्वभूतेषु गूढः ।
यस्मिन्युक्ता ब्रह्मर्षयो देवताश्च
तमेवं ज्ञात्वा मृत्युपाशांश्छिनत्ति ॥१५॥

तोच (सर्व किंवा योग्य) काळीं या भुवनाचा पालनकर्ता, विश्वाचा अधिपति, व सर्व भूतांमध्यें गूढरूपानें राहिलेला व ज्याच्यामध्यें ब्रह्मवेत्ते आणि देव एकत्र झाले आहेत, अशा त्याला जाणून (जाणणारा) मृत्यूचे पाश तोडतो. १५.

घृतात्परं मंडमिवातिसूक्ष्मं
ज्ञात्वा शिवं सर्वभूतेषु गूढम् ।

विश्वस्यैकं परिवेष्टितारं
ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥१६॥

घृताहून अतिसूक्ष्म साय जशी चांगली, तद्वत् सर्व भूतांमध्यें गुप्तरूपानें असलेल्या, विश्वाला एकट्या वेष्टन करणाऱ्या शिवाला (किंवा कल्याणकारक) अशा देवाला जाणून (जाणणारा) सर्व पाशांपासून मुक्त होतो. १६.

एष देवो विश्वकर्मा महात्मा
सदा जनानां हृदये संनिविष्टः ॥
हृदा मनीषा मनसाऽभिक्लृप्तो
य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥१७॥

हा देव, विश्व हें ज्याचें कर्म, महात्मा, सर्वदा जनांच्या हृदयांत बसलेला, हृदयानें—बुद्धीनें—व—मनानें कल्पिलेला असा हा जे जाणतात ते मरणरहित होतात. १७.

यदाऽतमस्तन्न दिवा न रात्रि-
र्न सन्न चासञ्छिव एव केवलः ।
तदक्षरं तत्सवितुर्वरेण्यं
प्रज्ञा च तस्मात्प्रसृता पुराणी ॥१८॥

जेव्हां तमाचा किंवा अज्ञानाचा अभाव असतो तेव्हां दिवस नाहीं आणि रात्र नाहीं. ‘आहे’ नाहीं आणि ‘नाहीं’ नाहीं. केवळ शिवच आहे. तोच अविनाशी. सवित्याचें इष्ट तेज तेंच. हें प्राचीन ज्ञान त्याच्यापासूनच पसरलेलें आहे. १८.

नैनमूर्ध्वं न तिर्यञ्चं न मध्ये
न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः॥१९॥

याला वर किंवा खालीं किंवा मध्यें (कोणीं) जाणलेलें नाहीं. ज्याचें यश खरोखर मोठें, त्याला उपमा नाहीं. १९.

हा मंत्र वाजसनेयिसंहितेंत [३२.२] आहे.

न संदृशे तिष्ठति रूपमस्य
न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ।
हृदा हृदिस्थं मनसा य एन-
मेवं विदुस्ते ह्यमृता भवन्ति ॥२०॥

याचें रूप दृष्टीमध्यें रहात नाहीं, याला चक्षूनें कोणी पहात नाहीं. हृदयानें आणि मनानें जे याला हृदयांत रहाणारा आहे असें जाणतात ते मरणरहित होतात. २०.

हा मंत्र किंचित् फरकानें कठोपनिषदांत [६.९] आहे.

अजात इत्येवं कश्चिद्भीरुः प्रपद्यते ।
रुद्र यत्ते दक्षिणं मुखं तेन मां पाहि नित्यम् ॥२१॥

कोणी (मरणाला) भिणारा याला 'अजात' ह्मणून शरण जातो. हे रुद्रा, जें तुझें कल्याणकारक मुख त्यानें मला नित्य संभाळ. २१.

मा नस्तोके तनये मा न आयुषि
मा नो गोषु मा नो अश्वेषु रीरिषः ।
वीरान्मा नो रुद्र भामितो वधी-
र्हविष्मंतः सदमित्त्वा हवामहे ॥२२॥

हे रुद्रा, आमच्या मुलांसंबंधानें, मुलांच्या मुलांसंबंधानें, आयुष्यासंबंधानें, गाईच्या संबंधानें, अश्वांच्या संबंधानें आह्मांस उपद्रव देऊं नकोस. रागावून आमच्या वीरांस मारूं नकोस. हवि घेऊन आह्मी तुला घरीं हवि देतों. २२.

ऋग्वेदांत [१.११४.८] व तैत्तिरीयसंहितेंत [४.५.१०.३] रुद्राध्यायांत हा मंत्र आहे.

---

## अध्याय पांचवा.

द्वे अक्षरे ब्रह्मपरे त्वनंते
विद्याविद्ये निहिते यत्र गूढे ।
क्षरं त्वविद्या ह्यमृतं तु विद्या
विद्याविद्ये ईशते यस्तु सोऽन्यः ॥१॥

अविनाशी, अनंत व श्रेष्ठ ब्रह्मामध्यें विद्या व अविद्या या दोन गुप्तरूपानें ठेवलेल्या आहेत. अविद्या नाशवंत आहे, विद्या अमर आहे. विद्या व अविद्या या दोहोंवर जो सत्ता चालवितो तो वेगळा. १.

यो योनिं योनिमधितिष्ठत्येको
विश्वानि रूपाणि योनीश्च सर्वाः ।
ऋषिं प्रसूतं कपिलं यस्तमग्रे
ज्ञानैर्बिभर्ति जायमानं च पश्येत् ॥२॥

जो एकटा प्रत्येक उत्पत्तिकारणावर, सर्व रूपांवर आणि सर्व उत्पत्तिकारणांवर सत्ता चालवितो; पूर्व काळीं उत्पन्न झालेल्या कपिल ऋषीला ज्यानें ज्ञानानें युक्त केलें व जन्मलेला पाहिलें. २.

एकैकं जालं बहुधा विकुर्व-
न्नस्मिन्क्षेत्रे संहरत्येष देवः ।
भूयः सृष्ट्वा पतयस्तथेशः
सर्वाधिपत्यं कुरुते महात्मा ॥३॥

या जागीं हा देव एकेक जाळें बहुत प्रकारें पसरून त्याचा नाश करतो. पुनः यतींना (किंवा प्रजापतींना) निर्माण करून हा ईश होत्साता सर्वांचें आधिपत्य करतो. ३.

सर्वा दिश ऊर्ध्वमधश्च तिर्यक्
प्रकाशयन्भ्राजते यद्वनड्वान् ।
एवं स देवो भगवान्वरेण्यो
योनिस्वभावानाधितिष्ठत्येकः ॥४॥

ज्याप्रमाणें वर, खालीं आणि तिरकस सर्व दिशा प्रकाशवीत सूर्य प्रकाश पावतो, त्याप्रमाणें तो पूजनीय देव भगवान् एकटा सर्व उत्पन्न झालेल्यांवर अधिकार चालवितो ४.

यच्च स्वभावं पचति विश्वयोनिः
पाच्यांश्च सर्वान्परिणामयेद्यः ।
सर्वमेतद्विश्वमधितिष्ठत्येको
गुणांश्च सर्वान्विनियोजयेद्यः ॥५॥

तद्वेदगुह्योपनिषत्सु गूढं
तद्ब्रह्मा वेदते ब्रह्मयोनिम् ।
ये पूर्वदेवा ऋषयश्च तद्विदु-
स्ते तन्मया अमृता वै बभूवुः ॥६॥

विश्वाचें कारण, जो स्वभाव पक्क करतो, पक्क करण्यासारखीं सर्व जो पक्क करतो, या सर्व विश्वावर जो अधिकार चालवितो, आणि सर्व गुणांची योजना करतो, तो वेदांचें रहस्य जीं उपनिषदें त्यांमध्यें गूढ आहे, त्याला ब्रह्मदेव सर्वांचें कारण व ब्रह्म असें जाणतो. ज्या पूर्व काळाच्या देवांनीं आणि ऋषींनीं ह्याला जाणलें ते तन्मय व मरणरहित झाले. ५. ६.

गुणान्वयो यः फलकर्मकर्ता
कृतस्य तस्यैव स चोपभोक्ता ।
स विश्वरूपस्त्रिगुणस्त्रिवर्त्मा
प्राणाधिपः संचरति स्वकर्मभिः ॥७॥

गुणांशीं संबद्ध झालेला जो फल देणारीं कर्में करतो आणि त्या कर्मांचा उपभोग घेतो, तो विश्वरूप, त्रिगुणयुक्त, (धर्म, अधर्म व ज्ञान या) तीन मार्गांनीं युक्त, प्राणयुक्त, होत्साता आपल्या कर्मांच्या बरोबर संचार करतो. ७.

अंगुष्ठमात्रो रवितुल्यरूपः
संकल्पाहंकारसमान्वितो यः ।
बुद्धेर्गुणेनाऽऽत्मगुणेन चैव
आराग्रमात्रो ह्यपरोऽप्यदृष्टः ॥८॥

तो संकल्प व अहंकार यांनीं युक्त झाला असतां अंगुष्ठप्रमाण व सूर्याप्रमाणें दिसणारा आहे. पण बुद्धीच्या गुणांनीं व आत्म्याच्या गुणांनीं युक्त झालेला तो दुसरा आत्मा आरीच्या टोकाएवढा (ज्ञात्यांना) दिसलेला आहे. ८.

बालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च ।
भागो जीवः स विज्ञेयः स चाऽऽनंत्याय कल्पते ॥९॥

केसाच्या अग्राच्या शंभराव्या हिश्शाचा देखील भाग असा (सूक्ष्म) तो जीव जाणावा. तरी तो अनंत ह्मणण्यास लायक आहे. ९.

नैव स्त्री न पुमानेष न चैवायं नपुंसकः ।
यद्यच्छरीरमादत्ते तेन तेन स रक्ष्यते ॥१०॥

हा स्त्री नाहीं, पुरुष नाहीं, आणि हा नपुंसकहि नाहीं. तो जें जें शरीर घेतो त्या त्या शरीरानें तो रक्षण केला जातो. १०.

संकल्पनस्पर्शनदृष्टिमोहै-
र्ग्रासांबुवृष्ट्या चाऽऽत्मविवृद्धिजन्म ।
कर्मानुगान्यनुक्रमेण देही
स्थानेषु रूपाण्यभिसंप्रपद्यते ॥११॥

संकल्प, स्पर्श आणि दर्शन यांच्या मोहांनीं आणि खाणें पिणें व वृष्टि यांनीं जीवात्मा जन्म घेतो व वृद्धि पावतो. तो आत्मा त्या त्या स्थानांमध्यें (आपल्या) कर्मानुरूप शरीरें पावतो. ११.

स्थूलानि सूक्ष्माणि बहूनि चैव
रूपाणि देही स्वगुणैर्वृणोति ।
क्रियागुणैरात्मगुणैश्च तेषां
संयोगहेतुरपरोऽपि दृष्टः ॥१२॥

आत्मा आपल्या गुणांनीं स्थूल व सूक्ष्म अशीं बहुत रूपें स्वीकारतो. कर्मांचे गुण आणि देहाचे गुण हेहि त्यांच्या [=त्या रूपांच्या] संयोगाचें दुसरें कारण दिसलें. १२.

अनाद्यनंतं कलिलस्य मध्ये
विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम् ।
विश्वस्यैकं परिवेष्टितारं
ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥१३॥

या जाळ्यामध्यें किंवा गोंधळामध्यें अनादि, अनंत, विश्वाला उत्पन्न करणारा, अनेक रूपें असलेला आणि विश्वाचा एक गुंडाळणारा अशा देवाला जाणून मनुष्य सर्व पाशांपासून मुक्त होतो. १३.

हा मंत्र याच उपनिषदांत पूर्वी [४.१४] थोड्या फरकानें आलेला आहे.

भावग्राह्यमनीडाख्यं भावाभावकरं शिवम् ।
कलासर्गकरं देवं ये विदुस्ते जहुस्तनुम् ॥१४॥

भावरूपानें समजण्यासारखा, अशरीरी, भाव व अभाव यांचा कर्ता, शिव (किंवा कल्याणकारक), आपल्या अंशानें सृष्टि करणारा देव जे जाणतात ते देहापासून मुक्त होतात. १४.

इति पंचमोऽध्यायः ॥५॥

---

## अध्याय सहावा.

स्वभावमेके कवयो वदन्ति
कालं तथाऽन्ये परिमुह्यमानाः ।
देवस्यैष महिमा तु लोके
येनेदं भ्राम्यते ब्रह्मचक्रम् ॥१॥

कोणी तत्त्ववेत्ते (सृष्टीचें कारण) स्वभाव ह्मणजे प्रकृति आहे

असें ह्मणतात. दुसरे कोणी मोहानें भ्रमण करणारे काळ आहे असें ह्मणतात. ज्या महिम्यानें हें ब्रह्मचक्र विश्वामध्यें भ्रमण करण्यास लावलें आहे तो हा देवाचा महिमा आहे. १.

येनाऽऽवृतं नित्यमिदं हि सर्वं
ज्ञः कालकारो गुणी सर्वविद्यः ।
तेनेशितं कर्म विवर्तते ह
पृथ्व्याप्यतेजोनिलखानि चिंत्यम् ॥२॥

ज्यानें हें सर्व विश्व नित्य वेष्टिलेलें आहे, जो ज्ञाता, काळाचा कर्ता, गुणांचा स्वामी आणि सर्ववेत्ता आहे, त्याच्या सत्तेनें वागणारें कर्म पृथिवी, उदक, तेज, वायु व आकाश यांना फिरवितें असें समजावें. २.

तत्कर्म कृत्वा विनिवर्त्य भूय-
स्तत्त्वस्य तत्त्वेन समेत्य योगम् ।
एकेन द्वाभ्यां त्रिभिरष्टभिर्वा
कालेन चैवाऽऽत्मगुणैश्च सूक्ष्मैः ॥३॥

आरभ्य कर्माणि गुणान्वितानि
भावांश्च सर्वान्विनियोजयेद्यः ।
तेषामभावे कृतकर्मनाशः
कर्मक्षये याति स तत्त्वतोऽन्यः ॥४॥

जो तें कर्म करून आणि पुनः त्यापासून निवृत्त होऊन, तत्त्वाचा तत्त्वाशीं संयोग करून,— एकाचा दोहोंशीं [अव्यक्त व व्यक्त], तिहींशीं [सत्त्व, रज व तम], आठांशीं [पांच भूतें, मन, बुद्धि,

अहंकार], काळाशीं, आणि आत्म्याच्या सूक्ष्म गुणांशीं, —संयुक्त असीं कर्मे आरंभून, सर्व भावांची (त्या त्या ठिकाणीं) योजना करतो, तो त्यांच्या [गुणांच्या] अभावीं [= अभाव करून] केलेल्या कर्मांचा नाश करतो आणि कर्मांचा नाश झाला म्हणजे तत्त्वांपासून वेगळा होऊन जातो. ३.४.

आदिः स संयोगनिमित्तहेतुः
परस्त्रिकालादकलोऽपि दृष्टः ।
तं विश्वरूपं भवभूतमीड्यं
देवं स्वचित्तस्थमुपास्य पूर्वम् ॥५॥

स वृक्षकालाकृतिभिः परोऽन्यो
यस्मात्प्रपंचः परिवर्ततेऽयम् ।
धर्मावहं पापनुदं भगेशं
ज्ञात्वाऽऽत्मस्थममृतं विश्वधाम ॥६॥

तमीश्वराणां परमं महेश्वरं ।
तं देवतानां परमं च दैवतम् ।
पतिं पतीनां परमं परस्ता-
द्विदाम देवं भुवनेशमीड्यम् ॥७॥

तो (विश्वाचा) आरंभ, संयोगाचें निमित्तकारण, भूत—भविष्य—वर्तमान या तीन कालांच्या पलीकडचा व कालरहित असा दिसला आहे. विश्वरूप, संसाराचें कारण, पूजनीय आपल्या हृदयामध्यें रहाणारा, आरंभापासून असलेला अशा त्या देवाची उपासना करून —(संसाररूपी वृक्ष-काल-व-रूप यांहून श्रेष्ठ व वेगळा, ज्यांच्यापासून

हा पसारा उत्पन्न होतो, धर्म आणणारा, पापाचा नाश करणारा, ऐश्वर्याचा स्वामी, मरणरहित, अशा त्याला स्वतःमध्यें स्थित व विश्वाचें निवासस्थान असें जाणून;—ईश्वरांचा सर्वश्रेष्ठ महेश्वर, देवतांचें श्रेष्ठ दैवत, पतींचा श्रेष्ठ पति, विश्वाचा स्वामी व पूजनीय अशा त्या देवाला आह्मी प्राप्त करून घ्यावें. ५–७.

न तस्य कार्यं करणं च विद्यते
न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते ।
पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते
स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥८॥

त्याला कांहीं करावयाचें (उरलेलें) नाहीं, त्याला कांहीं साधन लागत नाहीं; त्याच्या बरोबरीचा किंवा त्याच्याहून अधिक कोणी दिसत नाहीं. त्याची श्रेष्ठ शक्ति अनेक प्रकारची आहे. त्याची ज्ञानाची व बळाची क्रिया स्वाभाविक आहे. ८.

न तस्य कश्चित्पतिरस्ति लोके
न चेशिता नैव च तस्य लिंगम् ।
स कारणं करणाधिपाधिपो
न चास्य कश्चिज्जनिता न चाधिपः ॥९॥

या विश्वामध्यें त्याचा कोणी रक्षणकर्ता नाहीं, त्याच्यावर सत्ता चालविणारा नाहीं, किंवा त्याची कांहीं खूण नाहीं. तोच सर्वांचें कारण आहे, सर्व साधनांच्या मुख्याचा मुख्य आहे. याला उत्पन्न करणारा किंवा याचा वरिष्ठ कोणी नाहीं. ९.

यस्तंतुनाभ इव तंतुभिः प्रधानजैः

स्वभावतो देव एकः स्वमावृणोत् ।
स नो दधाद्ब्रह्माप्ययम् ॥१०॥

प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या तंतूंनीं कोळ्याप्रमाणें जो एक देव स्वभावतः स्वतःला गुंडाळून घेतो तो आह्मांला ब्रह्मरूप करो. १०.

एको देवः सर्वभूतेषु गूढः
सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः
साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥११॥

एक देव सर्व भूतांमध्यें गूढरूपानें आहे. सर्व व्यापणारा, सर्व भूतांचा अंतरात्मा, कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचे ठिकाणीं अधिष्ठान असलेला, साक्षी, ज्ञाता, केवल आणि गुणरहित आहे. ११.

एको वशी निष्क्रियाणां बहूना-
मेकं बीजं बहुधा यः करोति ।
तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा-
स्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥१२॥

बहुत निष्क्रियांवर एकटा सत्ता चालविणारा, जो एक बीज बहुत प्रकारांनीं करतो, त्याला जे ज्ञाते स्वतःचे ठिकाणीं स्थित असा पहातात त्यांनाच शाश्वत सुख प्राप्त होतें, इतरांना नाहीं. १२.

नित्यो नित्यानां चेतनश्चेतनाना-
मेको बहूनां यो विदधाति कामान् ।

तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यं
ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥१३॥

नित्यांचाहि जो नित्य, चेतनांचाहि जो चेतन, जो एकटा बहुतांच्या इच्छा (पूर्ण) करतो, त्या, (सर्वांचें) कारण असलेल्या, सांख्यशास्त्र आणि योगशास्त्र यांनीं जाणतां येण्यासारख्या देवाला जाणून सर्व पाशांपासून (मनुष्य) मुक्त होतो. १३.

न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं
नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।
तमेव भान्तमनुभाति सर्वं
तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥१४॥

त्याच्या ठिकाणीं सूर्य प्रकाशत नाहीं, चंद्र आणि तारका प्रकाशत नाहींत, या विजा प्रकाशत नाहींत, मग अग्नि कोठून? तो प्रकाशत आहे ह्मणूनच त्याच्यामागून हें सर्व प्रकाशत आहे. त्याच्याच प्रकाशानें हें सर्व प्रकाशतें. १४.

एको हंसो भुवनस्यास्य मध्ये
स एवाग्निः सलिले संनिविष्टः ।
तमेव विदित्वाऽति मृत्युमेति
नान्यः पंथा विद्यतेऽयनाय ॥१५॥

या (सर्व) भुवनामध्यें तो एक हंस (ह्मणजे वावरणारा) आहे, तोच उदकामध्यें प्रविष्ट झालेला अग्नि आहे. त्यालाच जाणून (मनुष्य) मृत्यूच्या पलीकडे जातो. मोक्षाला दुसरा मार्ग नाहीं. १५.

स विश्वकृद्विश्वविदात्मयोनि-
र्ज्ञः कालकारो गुणी सर्वविद्यः ।
प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेशः
संसारमोक्षस्थितिबंधहेतुः ॥१६॥

तो विश्व करणारा, विश्व जाणणारा, स्वतःच (स्वतःचें) उत्पत्ति-कारण, काळाचा कर्ता, गुणांनीं युक्त, जो सर्ववेत्ता आहे, प्रकृति-क्षेत्रज्ञ ह्मणजे जीव—आणि—गुण यांचा स्वामी, आणि संसाराचा मोक्ष—स्थिति—व—बंध यांचा कारण आहे. १६.

स तन्मयो ह्यमृत ईशसंस्थो
ज्ञः सर्वगो भुवनस्यास्य गोप्ता ।
य ईशे अस्य जगतो नित्यमेव
नान्यो हेतुर्विद्यत ईशनाय ॥१७॥

तो तन्मय (ह्मणजे विश्वमय) आहे, मरणरहित, ईशाप्रमाणें रहाणारा, ज्ञाता, सर्वव्यापी, या भुवनाचा रक्षणकर्ता आहे; तो या जगावर सर्वदा राज्य करतो. राज्य करण्याला दुसरा कोणी कारण नाहीं. १७.

यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं
यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै ।
तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं
मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥१८॥

जो आरंभीं ब्रह्मदेवाळा निर्माण करतो, जो त्याच्याकडे वेदांना धाडतो, त्या आत्मबुद्धीनें ज्ञात होणाऱ्या देवाला, मोक्षाची इच्छा करणारा मी शरण जातों. १८.

निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम् ।
अमृतस्य परं सेतुं दग्धेंधनमिवानलम् ॥१९॥

निरवयव, क्रियारहित, शान्त, अनिंद्य, निर्लेप, अमरत्वाचा मोठा पूल, इंधन जाळलेल्या अग्नीप्रमाणें असलेल्या (देवाला मी शरण जातों.) १९.

यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यन्ति मानवाः ।
तदा देवमविज्ञाय दुःखस्यान्तो भविष्यति ॥२०॥

चामड्याच्या तुकड्याप्रमाणें जर मनुष्य आकाशाची गुंडाळी करूं शकले तरच देवाचें ज्ञान न होतां (त्यांच्या) दुःखाचा अंत होईल. २०.

तपःप्रभावाद्देवप्रसादाच्च
ब्रह्म ह श्वेताश्वतरोऽथ विद्वान् ।
अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं
प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टम् ॥२१॥

तपाच्या सामर्थ्यानें आणि देवाच्या प्रसादानें श्वेताश्वतर ब्रह्म जाणता झाला; आणि तें ऋषींच्या समुदायानें सेविलेलें परम पवित्र ब्रह्म आश्रमातीतांना उत्तम प्रकारें सांगता झाला. २१.

वेदान्ते परमं गुह्यं पुराकल्पे प्रचोदितम् ।
नाप्रशान्ताय दातव्यं नापुत्रायाशिष्याय वा पुनः ॥२२॥

पूर्वीच्या कल्पामध्यें सांगितलेलें हें वेदान्तशास्त्रांतलें परम गुह्य, जो शान्त नाहीं, जो पुत्र नाहीं किंवा जो शिष्य नाहीं त्याला देऊं नये. २२.

यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः
प्रकाशन्ते महात्मनः ॥२३॥

ज्याची देवाच्या ठिकाणीं परम भक्ति आहे, आणि जशी देवाच्या ठिकाणीं तशी गुरूच्या ठिकाणीं आहे, त्याला या महान् आत्म्याच्या गोष्टी सांगितल्या असतां स्पष्टपणें कळतात. २३.

ॐ पूर्णमदः ० । भद्रं कर्णेभिः ० ।
सह नाववत्विति शान्तिः इति षष्ठोऽध्यायः ॥६॥

इति कृष्णयजुर्वेदीया श्वेताश्वतरोपनिषत्समाप्ता ।

---

# परिशिष्ट.

## ब्रह्मसूत्रें आणि या भागांतील उपनिषदें.

---

या भागांतील उपनिषदांपैकीं, कौषीतकि, श्वेताश्वतर आणि जाबाल या उपनिषदांतील वचनें शंकराचार्यांनीं ब्रह्मसूत्रभाष्यामध्यें आधाराला घेतलीं आहेत.

(१) कौषीतकि उपनिषदांतील वचनें ८८ वेळां आलीं आहेत. या वचनांचे शंकराचार्यांनीं जे पाठ दिले आहेत त्यांतले कांहीं कलकत्याच्या प्रतींतल्या पाठांशीं जुळतात, कांहीं आनंदाश्रम प्रतींतल्या पाठांशीं जुळतात, आणि कांहीं दोन्ही प्रतींहून भिन्न आहेत. यांवरून शंकराचार्यांची कौषीतकि उपनिषदाची प्रत आणखी तिसरी असावी असें प्रो. डायसेन यांचें अनुमान आहे. ब्रह्मसूत्रभाष्य १. १. २८-३१ या सूत्रांमध्यें कौषीतकि उपनिषदापैकीं तिसऱ्या अध्यायांतील इंद्र-प्रतर्दन संवादाचा विशेष उल्लेख असून या सूत्रांना प्रतर्दनाधिकरण असें नांव आहे. पुढें १.४.१६-१८ या सूत्रांमध्यें अजातशत्रु-बालाकि संवादाचा [ ४.१८-१९ ] विशेष उल्लेख असून या सूत्रांना बालाक्यधिकरण असें नांव आहे.

(२) श्वेताश्वतरोपनिषदांतलीं वचनें ५२ वेळां शंकराचार्यांनीं आपल्या ब्रह्मसूत्रभाष्यात घेतलीं आहेत. शंकराचार्य याचा उल्लेख 'श्वेताश्वतराणां मंत्रोपनिषत्' असा करतात. सूत्रभाष्यांत या उपनिषदाचे विशेष उल्लेख पुढीलप्रमाणें आहेत.—

स कारणं॰ [६.९]=सूत्रभाष्य १.१.११.
अजामेकां॰ [४.५]= ,, १.४.८.
बालाग्रशतभागस्य [५.८]= ,, २.३.२२.

(३) जाबालोपनिषदांतलीं वचनें सूत्रभाष्यांत १३ वेळां आलीं आहेत. परंतु या १३ पैकीं ९ मात्र—तींहि पाठभेदानें—जाबालोपनिषदांत सांपडतात. ४ सांपडत नाहींत. शंकराचार्य याचा 'जाबालानां श्रुतिः' असा उल्लेख करतात व जाबालोपनिषत् शुक्ल यजुर्वेदाचें आहे असें म्हणतात. पण जें जाबालोप-

निषत् हल्लीं उपलब्ध आहे [या भागांत घेतलेलें] तें अथर्व वेदाचें म्हणून उपलब्ध आहे. ''य एषोऽनंतोऽव्यक्त० [१] याचा विशेष संबंध सूत्रभाष्य १.२.३२ मध्यें आहे.

---